॥ श्रीशं वंदे ॥

संगीत

# भावबंधन


लेखक

कै. राम गणेश गडकरी


गीतात्मक विवेचन


प्रा. शंकर केशव कानेटकर, एम्. ए.



व्हीनस बुकस्टॉल : पुणें २

पहिली आवृत्ति १९१७

आठवी आवृत्ति १९४७

किंमत रु. ३-४-०

ह्या पुस्तकाच्या या आवृत्तीचे हक्क रा. शंकर गणेश गडकरी,
यांजकडून घेऊन हा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे.

मुद्रकः—पृष्ठें ९७-१२८, श्री. गं. शं. दाते, कलागृह छापखाना,
पुणें व इतर सर्व श्री. न. वि. सरदेशपांडे, आदर्श मुद्रणालय,
सदाशिव पेठ, पुणें २.
प्रकाशकः—सदाशिव कृष्ण पाध्ये, व्हीनस बुक स्टॉल, अप्पाबळवंत
चौक, पुणें २.

# आमचीं प्रकाशनें

१ निबंधकार टिळक, संपादक न. चिं. केळकर १-०-०
२ चिमणरावांचे चऱ्हाट, (ति. आ.) प्रा. चिं. वि. जोशी छापत आहे.
३ विनोदसागर, कॅप्टन गो. गं. लिमये १-०-०
४ मधलहरी व इतर कविता, माधव ज्यूलियन १-०-०
५ स्त्रीजीवनविषयक कांहीं प्रश्न, प्रि. सौ. कमलाबाई टिळक २-१२-०
६ आम्बराई, गिरीश १-४-०
७ शारदाविहार २-८-०
८ निर्माल्य—आपटे २-०-०
९ पुनर्भेट भाग १, य. गो. जोशी, १-८-०
१० जोसेफ मॅझिनी, वि. दा. सावरकर ५-०-०
११ सं. एकच प्याला, रा. ग. गडकरी २-८-०
१२ अभिनव काव्यप्रकाश (दुसरी आवृत्ति) प्रा. रा. श्री. जोग ६-०-०
१३ मधुवट, संपादक प्रा. गं. भा. निरंतर २-८-०
१४ संगीत भावबंधन—रा. ग. गडकरी, प्रा. शं. के. कानेटकर यांच्या प्रस्तावनेसह ३-८-०
१५ अद्वैत सिद्धान्तदर्शन, पं. द. वा. जोग १०-०-०
१६ मॅट्रिक आसपासच्या वाटा (देशी व परदेशी उच्च शिक्षणक्रमाची माहिती) स. अ. गानू १-८-०
१७ नलदमयंती स्वयंवराख्यान, सं. श्री. रा. पारसनीस १-४-०
१८ दाजी भाग १ ला, ना. धों. ताम्हनकर ३-८-०
१९ सामान्य ज्ञानदीपिका, का. ना. भिडे १-८-०
२० ग्यानबाचें अर्थशास्त्र, (दुसरी आवृत्ति) न. वि. गाडगीळ ६-०-०

| | | |
|---|---|---|
| २१ | सभाशास्त्र, न. वि. गाडगीळ | ५-०-० |
| २२ | फलभार, गिरीश | १-८-० |
| २३ | बुद्धिबळाचा खेळ, पडसलगीकर | २-८-० |
| २४ | पौर्णिमा उत्तर रात्र साधुदास | १-४-० |
| २५ | वद्य प्रतिपदा ,, | २-८-० |
| २६ | वद्य द्वितीया ,, | २-८-० |
| २७ | रणविहार ,, | १-०-० |
| २८ | वनविहार ,, | १-०-० |
| २९ | गृहविहार ,, | १-०-० |
| ३० | मराठीची सजावट भाग १ | २-०-० |
| ३१ | ,, ,, २ | २-०-० |
| ३२ | निरंजन रघुनाथाचे ग्रंथ | ८-०-० |
| ३३ | बुद्धिबळाचा मार्गदर्शक | ०-४-० |

व्हीनस बुक स्टॉल
अप्पा बळवंत चौक · पुणें २

# निवेदन

'भावबंधन'ची ही आठवी आवृत्ति आज गडकरी स्मृतिदिनीं वाचकांचे हातांत देण्यास आम्हांस आनंद वाटत आहे. गेल्या वर्षी याच दिवशीं 'एकच प्याला'ची आवृत्ति आम्हीं प्रकाशित केली होती. हा एक योगायोगच म्हणायचा. 'एकच प्याला'स जोडलेल्या टीकात्मक विवेचनाप्रमाणेंच याही आवृत्तीस प्रा. शंकर केशव कानेटकर एम्. ए. (कवि गिरीश) यांनीं टीकात्मक विवेचन लिहिलें आहे. 'एकच प्याला'च्या विवेचनाकडे अनेक लोकांचें लक्ष वेधलें जाऊन त्यावर अनुकूल प्रतिकूल बरीच टीका झालेली आहे. आम्हीं सुरूं केलेल्या या उपक्रमाबद्दल अनेक लोकांचीं अभिनंदनपर पत्रें आलीं आहेत. 'एकच प्याला'प्रमाणें 'भावबंधन'ची ही नवीन आवृत्ति वाचकांस आवडेल अशी आशा आहे.

प्रकाशक

# प्रथमावृत्तीची प्रस्तावना

ज्या नाटकांत मजविषयीं एका स्थळीं प्रत्यक्षपणें सद्भाव दाखविला आहे, त्यांतील पद्यें व प्रस्तावना मींच लिहिणें सामान्य परिस्थितींत असदभिरुचीचें दर्शक मानलें जाईल. पण ज्या परिस्थितींत मला तीं लिहावीं लागलीं, तिचा विचार करितां तें क्षम्य वाटेल अशी आशा आहे.

या नाटकाचे कर्ते कै० राम गणेश गडकरी यांचा व माझा परम व अकृत्रिम स्नेह होता. उभयतांनीं मिळून एखादें नाटक लिहून तें उभयतांच्या नांवांनीं प्रसिद्ध करावें व या रीतीनें तीं नांवें धारण करणारांच्याप्रमाणें त्या नांवांचाही दृढ संबंध जुळवून आणावा अशी उत्कट इच्छा त्यांनीं कितीतरी वेळां प्रगट केली होती ! ती इच्छा संकल्पित प्रकारापेक्षां अगदींच निराळ्या प्रकारानें पूर्ण व्हाव- याची होती !

सन १९१८ सालचे नाताळांत रा० गडकरी पुणें येथें अस्वस्थ असतां मीं त्यांच्या भेटीला गेलों. आपण आतां फार दिवसांचे सोबती नाहीं हें त्यांस कळून चुकलें असल्यामुळें त्यांनीं त्या वेळीं आपल्या वाङ्मयविषयक संसाराची निरवा- निरव चालविली होती. त्यापूर्वीं त्यांनीं ‘ एकच प्याला ’ या नाटकाचें संपूर्ण गद्य, प्रस्तुत नाटकाच्या चार अंकांपेक्षां कांहीं अधिक भागाचें गद्य व दोन्हीं नाटकांतील कांहीं पदें स्वतः तयार केलीं होतीं. त्यांपैकीं कोणत्या नाटकाची पद्यावलि पुरी करणें मला आवडेल असा त्यांनीं प्रश्न केला असतां मीं प्रस्तुत नाटकाचे प्रकाशक रा० कृष्णाजी सखाराम हर्डीकर यांच्या व माझ्या स्वतःच्या इच्छेस अनुसरून प्रस्तुत नाटकाची पद्यावलि पूर्ण करण्याची इच्छा व्यक्त केली व त्यांनीं तें काम मजकडे सोंपविलें. त्या वेळीं खुद्द रा० गडकऱ्यांचीं पदें माझ्या अवलोकनांत आलीं नव्हतीं. यानंतर लवकरच ते आपल्या प्रेमळ मातुश्रींस, उभयतां बंधूंस व पत्नीस, अनेक स्नेह्यांस व व्यवसायबंधूंस आणि मराठी भाषेच्या असंख्य अभिमान्यांस शोकांत लोटून देऊन दिवंगत झाले. त्यांच्या मृत्यूमुळें मराठी भाषेचें व वाङ्मयाचें कधींही न भरून निघण्यासारखें नुकसान झालें आहे. माझा व त्यांचा जो जिव्हाळ्याचा संबंध होता त्यामुळें माझी हानि त्यांच्या कुटुंबीयांच्याइतकी नसली तरी त्यांच्यासारखीच अनन्यसाधारण वाटत आहे.

या नाटकांतील कांहीं पद्यें खुद्द कै० गडकऱ्यांच्या सरस लेखणींतून उतरलीं आहेत हें वर आलेंच आहे. तीं त्यांच्या रसाळ रचनेवरून रसिकांच्या ताबडतोब

आपले प्राण खर्ची घातले या एकाच गोष्टीवरून उघड होईल. मंडळीस त्यांच्या प्रतिभेचा अधिक लाभ झाला नाहीं हें दुर्दैव होय.

प्रस्तुत नाटकाच्या मुद्रणाकरितां छापखान्याकडे त्याच्या रंगावृत्तीची प्रत पाठविण्यांत आली होती. त्या प्रतींचें कै० गडकऱ्यांच्या मूळ प्रतीहून जें अंतर दिसून आलें तें पुरवणींत दिलें आहे. रंगावृत्तीची प्रत मूळ प्रतीशीं ताडितांना मला माझे व्यवसायबंधु व स्नेही रा० प्रभाकर गणेश धोपेश्वर व रा० केशव काशीनाथ जोशी यांचें जें अमोल साहाय्य झालें त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

या नाटकावरून कर्त्याचा एकदां हात फिरला असता तर तें झालें आहे त्यापेक्षांही सरस वठलें असतें. नाटक छापत असतांही त्यावरून त्याच्या जनकाची प्रेमळ नजर फिरणें इष्ट असतें, पण जन्मापासूनच जें अपत्य पितृप्रेमास आंचवलें त्याची पितृव्यादिकांनीं कितीही प्रेमानें जोपासना केली तरी त्याची आबाळ व्हावयाची चुकत नाहीं. त्यांतील कांहींजण त्याच्या खाण्यापिण्याची तरतूद करितात, तर दुसरे कांहींजण त्यास वस्त्रप्रावरणें पुरवितात व तिसरे कांहींजण त्यांचें लालन करितात प्रेमानें का होईना, एकजण त्यास शक्ति आणण्याकरितां अजीर्ण होईपर्यंत खाऊं घालतो, तर दुसरा त्याची प्रकृति निकोप रहावी म्हणून त्याची जवळ जवळ उपासमार करितो. एकजण त्याला शुद्ध हवेचा लाभ मिळावा म्हणून उन्हातान्हांतून हिंडवितो तर दुसरा त्याजवर उबदार वस्त्रें लादून त्याचा कोंडमारा करितो. असाच काहींसा प्रकार कै० गडकऱ्यांच्या या कृतीचा झाला आहे. नाटकाची मूळ प्रत, तिजवरून रंगभूमीकरितां तयार झालेली प्रत, तिजवरून छापखान्याकरितां तयार झालेली नक्कलखिळे जुळाविणारांनीं केलेली त्या नकलेची नक्कल, स्थूल मुद्रितें अनेकांच्या हातून जातांना त्यांत त्यांनीं केलेले फेरफार या सर्वांचे छापील प्रतीवर बहुविध संस्कार झाल्याकारणानें तिच्यांत शब्दाक्षरांसंबंधानें प्रमादबाहुल्य आणि शुद्धलेखनासंबंधानें व विरामांसंबंधानें बरेंच मतवैचित्र्य आढळून येईल. तथापि कै० गडकरी हयात असते तरीही त्यांना ही कृतिकन्या अखेरीस ज्या कनवाळु रसिकवृंदरूपी पतीच्या स्वाधीन करावी लागली असती त्याच्या औदार्यावर भिस्त ठेऊन व त्यानें तिला जनकनिर्विशेष प्रेमानें वागवावें अशी विनंति करून ती त्याच्याच चरणीं अर्पण करितों.

जळगांव, वऱ्हाड.
ता. १५-८-२०

**श्री. कृ. कोल्हटकर**

# प्रस्तावना

गडकऱ्यांनीं आपल्या उत्कृष्ट वाङ्मयानें लोकांच्या मनाला विलक्षण चटका लावला आहे ! आणि त्यांच्या अकाली मृत्यूनें त्यांच्याविषयींची हळहळ शतगुणित झाली आहे; आणि म्हणूनच आज त्यांना दिवंगत होऊन सव्वीस वर्षें झालीं तरी त्यांची स्मृति रसिकांच्या अंतःकरणांत अगदीं ताजी आहे. ज्या भूमीचे व मातेचे ते सत्पुत्र आहेत त्या भूमीचें व भाषेचें ऋण त्यांनीं उत्कृष्ट तऱ्हेनें फेडलें आहे. आपल्या सूक्ष्म निरीक्षणानें व उत्कट भावशीलतेनें त्यांनीं समाजाचीं सुखदुःखें जाणून घेतलीं व तींच आत्मसात् करून आपल्या प्रतिभाशाली व प्रभावी वाणीनें त्यानीं तीं चित्रित केलीं. कोणालाहि झालें तरी आपली दुःखें सहानुभूतीनें पाहणारा हवा असतो; त्यानें दीर्घायुषी व्हावें, त्यानें समाजाचें दीर्घकालपर्यंत मार्गदर्शन करावें, त्यानें आपली अमृतोपम गोड वाणी चिरंत ऐकवावी, असें त्याच्या वाचकांना वाटत असतें; त्यांत गडकरी म्हणजे जीवन जगून जीवनाचा अनुभव घेणारे व आपल्या व्यासंगशील रक्तानें वाङ्मय लिहिणारे लेखक. त्यामुळें त्यांच्या अकाली मृत्यूनें जनतेच्या हृदयाला फार मोठा धक्का बसला. त्यांच्याकडून जें मिळालें, त्यापेक्षां जें मिळणार होतें तें गमावलें, याची जनतेला फार खंत वाटली आणि म्हणून निर्मिलेल्या अमर वाङ्मयाविषयीं उत्कट आपुलकी व जें गमावलें त्याबद्दल तीव्र हळहळ अजूनहि जनतेच्या हृद्यांत जिवंतपणानें रसरसत असल्याचें दिसतें. गडकऱ्यांच्या लोकप्रियतेचें रहस्य त्यांच्या जनतेवरील या पकडींत सामावलेलें आहे.

कवि, विनोदी लेखक व नाटककार अशा तिहेरी भूमिकांनीं गडकरी जरी समाजाला प्रिय असले, तरी जनतेच्या मनाची खरी पकड त्यांनीं नाटककार या नात्यानेंच घेतली आहे व त्यांच्या नाट्यवाङ्मयांतच तिला खरा दिलासा वाटतो. याचा अर्थ त्यांचें इतर वाङ्मय कमी दर्जाचें आहे असा मुळींच

नाहीं; पण तें कितीहि उत्कृष्ट असलें तरी जनतेला आपल्या जीवनाचें खरें चित्रण व मार्गदर्शन त्यांच्या नाटकांतच वैपुल्यानें सांपडलें आणि म्हणूनच आपल्यासाठीं सर्वस्वानें जगलेल्या व मेलेल्या या महाभागासाठीं जनता आज सव्वीस वर्षांच्या प्रदीर्घकालानंतरहि अश्रु गाळल्यावांचून रहात नाहीं.

## गडकऱ्यांच्या नाट्यवाङ्मयांत असें काय आहे ?

गडकऱ्यांच्या नाट्यवाङ्मयांत अनेक गोष्टी आहेत. त्यांत प्रतिभेचा सर्वांगीणे साक्षात्कार आहे, जीवनाचा अनुभव आहे, ध्येयवाद आहे, सौंदर्य-प्रतीति आहे, कलाविलास आहे, वाङ्मयाचा गाढा व्यासंग आहे, भाषावैभव आहे, विविध मनुष्यस्वभावाचें रेखीव चित्रण आहे, उत्कृष्ट संवाद आहेत, अपूर्व घटना आहेत, अद्‌भुत प्रसंग आहेत, अनेक रस आहेत, इतकेंच नव्हे तर या सर्वांवर ताण करणारे हास्याचे उंच उंच फवारे आहेत. उलट त्यांत काय नाहीं असेंच विचारावेसें वाटेल. त्यांचें नाटक पाहून रडण्यासाठीं लोक येतात, तर उलट संसारांतील अनेकविध दुःखें विसरण्यासाठीं व घटकाभर पोटभर हसून मजा लुटण्यासाठींहि लोक येतात; त्यांचीं नाटकें दृश्य तशीं श्राव्य व वाचनीयहि आहेत. त्यामुळें ज्यांना त्यांचे प्रयोग पाहाणें शक्य झालें नाहीं किंवा होत नाहीं, ते एकान्तांत त्याचें वाचन करून त्यांतील गोडी चाखतात आणि आनंद पावतात. त्यांचें वाङ्मय वाचतांना वाचकाला आपण कुठल्यातरी वेगवान विमानांत बसलों आहों व त सृष्टीच्या निरनिराळ्या प्रदेशांतून व कालाच्या भूतभविष्यादि तिन्हीं प्रवाहांवरून भर्र भर्र आवाज करीत वेगानें चाललें आहे, असा क्षणोक्षणीं भास होतो व त्यांत विश्वप्रदर्शन घडल्याची प्रतीति येते. जीवनांतील अनेक अनुभव येतात, जगांतलें चांगलें-वाईट कळतें, शहाणपण येऊं लागतें व कांहीं अपूर्व गोष्टी पाहून आपण स्तिमितहि होतों. आणि हें सर्व पाहिल्यावर जेव्हां आपल्याला समजतें कीं या अद्‌भुत किमयागारानें जीवनाच्या शेवटच्या क्षणापर्यंत कष्ट, हाल, त्रास, यातना, वेदना सोसून जीवनाशीं प्रामाणिक राहून आपलें वाङ्मय निर्माण केलें, इतकेंच काय पण एका डोळ्यांतील प्राण गोठला व दुसऱ्या डोळ्यांतील

घुटमळला असतांनाहि 'भावबंधन' नाटकाचा शेवटचा प्रवेश पुरा केला व आपली जीवनयात्रा संपविली, त्या वेळीं मनाला सहस्र विंचू डसल्याप्रमाणें वेदना होतात व आपण गडकऱ्यांच्या व्यक्तिमत्वाकडे अधिक ओढलें जातों. मुलानें जन्मास यावें पण आईला मृत्यू यावा, अशीं घटना पाहिल्याचें आपणांस या वेळीं दुःख होतें. गडकऱ्यांच्या जीवनांतील व लेखनांतील किमया ही अशी आहे.

## नाट्य सेवा

गडकऱ्यांनीं एकूण सहा नाटकें लिहिलीं. त्यापैकीं 'प्रेमसंन्यास', 'पुण्य-प्रभाव', 'एकच प्याला' व 'भावबंधन' हीं पूर्ण व 'वेड्यांचा बाजार' व 'राजसंन्यास' हीं अपूर्ण आहेत. या खेरीज 'गर्वनिर्वाण, तोड ही माळ, पिंडप्रदान' 'तीन संन्यास' यांसारखीं आणखी किती तरी नाटकें संकल्पित स्वरुपांत होतीं. पूर्ण लिहिलेल्या नाटकांपैकीं पुण्यप्रभाव व भावबंधन या सुखांतिका आणि प्रेमसंन्यास व एकच प्याला या शोकांतिका आहेत. या खेरीज अगदीं लहान मुलांसाठीं 'सकाळचा अभ्यास' हें उत्कृष्ट प्रहसनहि त्यांनीं लिहिलें आहे. अशाच तऱ्हेचें एक पांच अंकीं नाटक लिहावें हीहि त्यांची मनीषा होती, पण त्यांच्या अनेक आशाआकांक्षाबरोबर त्याचीहि राखरांगोळी झाली! परंतु या सर्वांतून एक गोष्ट निःसंशय प्रत्ययाला येते ती हीच कीं, गडकरी हे हाडानें जातिवंत कवि व नाटककार होते. प्रतिभाशाली कवि किंवा नाटककार हा जन्मालाच यावा लागतो. या दृष्टीनें गडकऱ्यांचा लाभ महाराष्ट्राला झाला होता. त्याचें मन, त्यांची दृष्टि, त्याचें निरीक्षण, मनन, चिंतन, रेखाटन सर्व कांहीं एकाद्या थोर नाटककाराचें आहे आणि म्हणून गडकरी अल्पकाल जगले व त्यांनीं थोडीं नाटकें लिहिलीं, तरी जनतेला त्यांचें व्यक्तिमत्व अलौकिक वाटतें.

## पूर्वीची नाट्यसृष्टि व नाट्यदृष्टि

गडकऱ्यांना सुदैवानें उज्ज्वल परंपरेचें सद्भाग्य लाभलें होतें. नाट्य-वाङ्मयाच्या जन्मकालानंतर नाट्यकलेला लवकरच अनेक सत्पुत्र लाभले.

किर्लोस्कर, देवल, कोल्हटकर हेच ते भाग्यशाली सत्पुत्र. यांनीं नाट्यकलेचें भवितव्य नुसतें घडविलें इतकेंच नाहीं, तर तें अनेक दृष्टींनीं उज्ज्वल केलें. यांपैकीं प्रत्येक नाटककार हा आपापल्या काळांतील राजा होता. त्या नाटककाराच्या दशकांत त्याची प्रतिभा, कीर्ति, कला हीं शिगेला पोचलीं होतीं व त्यानें जनतेकडून आपल्या श्रेष्ठ अधिकाराची मान्यता मिळविलेली होती. या व यांच्या समकालीन नाटककारांनीं अनेक विषय व पाश्चात्य, पौर्वात्य अशीं अनेक तंत्रेंहि राबविलीं होतीं. त्यांत धार्मिक विषय होते, राजकीय होते, सामाजिक होते व ऐतिहासिकहि होते; इतकेंच काय पण पौराणिक व जुन्या संस्कृत व इंग्रजी वाङ्मयावरून घेतलेले किंवा अगदीं सर्वस्वीं कल्पनारम्य असेहि विषय होते. तंत्राच्या बाबतींत मराठी रंगभूमीनें जन्मकालीं कानडीचे, नंतर संस्कृत नाटकांचें व पुढें पाश्चात्य नाटकांचें विशेषतः शेक्सपियर,मोलियर यांचें अनुकरण केलें होतें, आणि पुढें पुढें ही पकड दृढ होत गेली; देवलांनीं 'दुर्गा' लिहितांना शेक्सपीयरच्या व फाल्गुनराव उर्फ संशयकल्लोळ लिहितांना मोलियरच्या तंत्राचें अनुकरण केलें; पण खाडिलकरांनीं 'सवाई माधवराव' निर्माण करतांना एकाच नाटकांत हॅम्लेट व यागो हीं दोन पात्रें माधवराव व केशवशास्त्र्याच्या रूपानें रंगभूमीवर अवतीर्ण केलीं. आधींच्या काळांतील सौभद्रासारखें सोज्ज्वळ पौराणिक नाटक व पुढील काळांतील देवल, कोल्हटकर व खाडिलकर यांची थोर व आकर्षक नाट्यसृष्टि यांचा संमिश्र परिणाम गडकऱ्यांच्या तरुण मनावर झाल्याखेरीज राहिला नाहीं. या सर्वांच्या परिपाकानें गडकऱ्यांचें मन खेचलें गेलें व पोसलें गेलें.

तथापि गडकऱ्यांना खरें अधिष्ठान लाभलें होतें तें म्हणजे कोल्हटकरांचें. फाल्गुनराव व शारदा यांची लोकप्रियता असामान्य असली व देवलांचें कर्तृत्व जरी श्रेष्ठ दर्जाचें असलें, तरी कोल्हटकरांच्या नाटकांतील नावीन्य व गुरु म्हणून त्यांचा लाभलेला सहवास यांनींच गडकऱ्यांचें मन विशेष भारलें गेलें व त्यांच्या मनाची घडण त्या अनुरोधानें होत गेली. याला दुसरेंहि एक कारण होतें. कोल्हटकर व गडकरी यांचा मनःपिंड एकजातीचा होता. दोघांच्याहि प्रतिभेनें रंगभूमीवर आपला स्वयंभू व स्वतंत्र आविष्कार केला असला, तरी

तिच्या विचार-मनन-चिंतनाची वा जीवनांचें निरीक्षण करून पात्रें, घटना, प्रसंग टिपण्याची तऱ्हा एकच होती, त्यामुळें गडकऱ्यांच्या मनाची घडण कोल्हटकरी पद्धतीनें घडत गेली असें म्हटलें असतां फारसें चुकणार नाहीं. अद्भुत नावीन्य व अलौकिक बुद्धिमत्ता हें कोल्टकरांचें वैशिष्ट्य. यांतूनच त्यांची कल्पनारम्यता निर्माण झाली. कोल्हटकरांच्या मनाची बैठक व नाटकाची घडण ही गडकऱ्यांनीं, किर्लोस्कर नाटक मंडळींत असतांना, अगदीं जवळून आपुलकीच्या भावनेनें पाहिल्यामुळें त्याचे परिणाम नकळत त्यांच्याहि मनावर होत गेले. गडकऱ्यांना कोल्हटकरांसारखी तीव्र बुद्धि लाभली होती; नावीन्याचे धडे त्यांना गुरुपासूनच मिळाले होते व एकाद्या विषयाच्या तळाशीं जाऊन तो आत्मसात कसा करावा याचें बाळकडूहि त्यांना त्यांच्यापासूनच मिळालें होतें. त्यामुळें त्यांच्या विचारसरणीस प्रथम कोल्हटकरी वळण लागलें. परंतु खरा प्रतिभाशाली नाटककार हा प्रथम अनुकरणशील असला, तरी स्वयंतेजहि असतो. गडकऱ्यांचें वरील बाबतींत जरी कोल्हटकरांशीं सपिंडत्व असलें तरी त्यांच्या प्रतिभेचे असे कांहीं स्वतंत्र गुण होतेच. त्यांची भावनोत्कटता जबरदस्त होती. त्यांची कल्पनाशक्ति गुरूलाहि मागें टाकील इतकी सामर्थ्यशील होती, त्यांचा व्यासंग गाढा होता; त्यांनीं अवलंबिलेली भाषा स्वयंनिर्मिति होती. त्यांची पात्रनिर्मिति, कथागुंफण व चित्रण यांतील शक्ति स्वयंभू होती, त्यांची प्रगतिशीलता अद्ययावत् होती; आणि त्यामुळें किर्लोस्कर-देवलांचे श्रेष्ठत्व त्यांनीं जरी मान्य केलें व कोल्हटकरांच्या परंपरेचे जरी ते वारसदार ठरले, तरी त्यांनीं मराठी नाटककारांत अनन्यसाधारण स्थान मिळविलें. हेंच गडकऱ्यांचें वैशिष्ट्य व यांतच त्यांचें व्यक्तिमत्व सामावलें होतें.

## सुखांतिकेची पीठिका

सुखांतिकेच्या बाबतींत मराठीनें प्रथम साधारणपणें संस्कृतचेंच वळण गिरविलें आहे. अगदीं आरंभींच्या काळांत मराठीपुढें संस्कृतचेच आदर्श होते. आणि संस्कृत नाट्यशास्त्राचें आद्य गुरु जे भरतमुनि त्यांनीं शक्य तो शोकांतिका लिहूं नये असा दंडक घातल्यामुळें संस्कृतमध्यें व त्यामुळें मराठीमध्यें सुखांतिकाच

लिहिण्याची प्रथा पडली. समाजधारणेच्या दृष्टीनें ही कितीहि चांगली गोष्ट असली, तरी मानवी स्वभावाचें सखोल ज्ञान होण्याचा एक मार्ग व कला या दृष्टीनें त्यानें वाङ्मयाची प्रगति थांबली. पण हा वादग्रस्त प्रश्न बाजूला ठेवला, तरी मराठीनें अगदीं आरंभींच्या काळांत हीच परंपरा सुरू केल्यानें नाट्यकलेला तेंच वळण लागलें. पुढें कांहीं सुशिक्षित व्यक्तींनीं जेव्हां नाट्यकलेचीं सूत्रें हातीं घेतलीं, त्या वेळीं शेक्सपीयर–मोलियर यांचे आदर्श पुढें आले व मराठींत सुखांतिका व शोकांतिका यांच्या कल्पना प्रसृत होऊं लागल्या. तोंपर्यंत मात्र नाटककारानें सुखांतिकाच ( आनंदपर्यवसायी ) लिहावी ही कल्पना होती. जनतेचेंहि मन तसेंच सरावलें असल्यामुळें नाटककारहि लोकांची ही प्रवृत्ति अवर्जून लक्षांत घेत असत. किर्लोस्करांच्या नाटकांचा जन्म यांतूनच झाला आहे. बाकीचीं नाटकें रूपांतरें असलीं तरी सौभद्रासारखी सुखांतिका लिहिण्याच्या पाठीमागें हीच दृष्टी आहे.

या दृष्टीनें मराठींतील स्वतंत्र, कलात्मक व लोकप्रिय नाटकांत सौभद्र हीच पहिली सुखांतिका होय. आज पन्नास वर्षें तिनें लोकांना रिझविलें आहे. अर्थात् या नाटकाच्या जन्मकालीं सुखांतिकेचें तंत्र नाटककारांना सर्वस्वी माहित होतें असें नाहीं; पण तरीहि किर्लोस्करांच्या प्रतिभेचा तो एक सुंदर आविष्कार आहे एवढें म्हटलेंच पाहिजे. तंत्राची कल्पना किर्लोस्करापेक्षां देवलांना विशेष आली. दुर्गा, संशयकल्लोळ ( फाल्गुनराव ) किंवा शारदा लिहितांना त्यांनीं शेक्सपीयरपद्धतीची शोकांतिका व मोलियर पद्धतीची सुखांतिका यांची जाणीव ठेवल्याचें त्यांच्याच प्रस्तावनांत उल्लेख सांपडतात. त्यामुळें सुखांतिकेच्या तंत्राचा विचार देवलांपासून सुरू झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. तरीदेखील संशयकल्लोळसारख्या लोकप्रिय नाटकाचें स्वरूपहि कांहीं ठिकाणीं प्रहसनवजा वाटतेंच. शारदा हें नाटक प्रमेयात्मक असल्यामुळें त्यांत गंभीर प्रश्नांची चर्चा व वैवाहिक प्रश्नावरील विनोदी चित्रण या ऊनपावसाचा खेळ अधूनमधून चाललेला दिसतो. तरीहि जनतेला सुखांतिका हवी होती व नाटककाराचें मन शोकांतिकेकडे खेचलें जात असावें असें वाटतें. या परिस्थितींत कोल्हटकर आले व त्यांनीं एका स्वतंत्र मनूला सुरवात केली. त्यांनीं सामाजिक दोषांचें

विनोदी पद्धतीनें आविष्करण करणारीं नाटकें शेक्सपीयर–मोलियरच्या पद्धतीनें लिहिण्यास सुरुवात केली आणि जरी कल्पकता, कला वगैरे दृष्टींनीं तीं कल्पनारम्य नसलीं, तरी लोकरंजनाच्या व लोकादराच्या बाबतींत तीं संपूर्ण यशस्वी ठरलीं. विशेषतः मूकनायकानें अलोट लोकप्रियता मिळविली. कोल्हटकरांनंतर खाडिलकर आले, पण त्यांच्या डोळ्यांपुढें शेक्सपीयरचा–विशेषतः त्याच्या शोकांतिकांचा आदर्श होता. परंतु त्यांच्या गंभीरस्वरूपी प्रतिभेनें कांचनगडची मोहना, मानापमान यांसारखेहि अनेक वळसे घेतलेले आहेत. खाडिलकरांची प्रकृति गंभीर असल्यामुळें त्यांचा विनोद अगदींच नीरस व कृत्रिम उतरे आणि त्यांत तो कोल्हटकरांनीं गाजविलेल्या रंगभूमीवर आलेला. त्यामुळें तो फारच फिका पडला. खाडिलकरांच्या सुखांतिका त्यांतील विनोदापेक्षां इतर गुणांनींच रंगत; पण त्यांच्या शोकांतिकांना जशी रंगत आली तशी ती त्यांच्या सुखांतिकांना कधींच आली नाहीं. यामुळें कोल्हटकरांच्या परंपरेंत तयार होत असलेल्या गडकऱ्यांच्या मनाला आपल्या प्रतिभेचा आविष्कार करण्यास एकप्रकारें उत्तम पार्श्वभूमि तयार होत होती. गडकरी नाटकें लिहूं लागण्यापूर्वी सुखांतिकेचें स्वरूप साधारणपणें असें होतें. शेक्सपीयर किंवा मोलियर याला आदर्श म्हणून पुढें ठेवला तरी त्यांच्या पद्धतीची शंभर टक्के विनोदी, निर्भेळ, शास्त्रशुद्ध तंत्रानें नटलेली सुखांतिका मराठी रंगभूमीवर अजून अवतरली नव्हती. तिचें स्वरूप मधेंच कुठें तरी गंभीर व्हावें, किंवा विनोद तरी नीरस व्हावा, तिला प्रहसनात्मक दर्जा यावा किंवा कथानकांत अद्भुतता वा कल्पनारम्यता तरी असावी असें कांहीं तरी होत होतें. आणि याचें कारण पाश्चात्य नाटकांचें विशेषतः सुखांतिकेचें तंत्र पुरतें आत्मसात् झालेला नाटककार अजून जन्माला आलेला नव्हता, हेंच होय.

आणि याच वेळेला गडकऱ्यांचा वाङ्मयीन अवतार झाला. अर्थात् गडकऱ्यांनीं देखील सुखांतिकेचें पाश्चात्यतंत्र पुरतें आत्मसात् केलें होतें असें म्हणतां येत नाहीं. त्यांच्यापुढें देखील सुखांतिका लिहिणारे म्हणून किर्लोस्कर, देवल, कोल्हटकर व खाडिलकर हेच आदर्श होते. त्यांत किर्लोस्कर हे पाश्चात्य तंत्राला सर्वस्वी पारखे होते, एवढेंच नव्हे तर त्यांच्यावर संस्कृत नाट्यतंत्राचीच

छाप विशेष होती. देवल हे श्रेष्ठ नाटककार असूनहि त्यांना फाल्गुनराव सारखी सुखांतिका लिहितांना त्यांतील प्रहसनात्मक छटा टाळतां आल्या नाहींत. कोल्हटकर हे कुशल नाटककार असले तरी ते केवळ कल्पनासृष्टींत वावरत होते आणि खाडिलकरांचें लक्ष सुखांतिकेपेक्षां शोकांतिकेशीं अधिक समरस होत असे. त्यामुळें गडकऱ्यांच्यापुढें साक्षात् शेक्सपीयर-मोलियरपेक्षां मराठी रंगभूमीचे हे हे सेवकच आदर्श म्हणून राहिले, आणि त्यांच्या सुखांतिकांचा त्यांच्या मनोरचनेवर परिणाम झाल्याखेरीज राहिला नाहीं. गडकऱ्यांच्या लिखाणांत प्रहसनात्मक वृत्ति कशी डोकावत असे याचें उत्तम उदाहरण म्हणजे 'वेडयांचा बाजार' येथें त्यांनीं पूर्वनाटककारांच्या पदांची उडवलेली राळ हें होय. तसेंच संशयकल्लोळ नाटकांतील लपवालपवी, बुरख वगैरे साधनांचा पुण्यप्रभावमध्यें केलेला उपयोग हें त्याचेंच द्योतक आहे. इतकेंच काय, पण आरंभीं आरंभीं गडकऱ्यांच्या तरुण मनाची झेप शास्त्रशुद्ध तंत्रापेक्षां विस्मित करणारे, भयानक, प्रक्षोभक, अद्भुतरम्य किंवा कल्पनारम्य प्रसंग या गोष्टींकडेच विशेष असे, असें दिसून येतें. प्रेमसंन्यासचा शेवट गोड किंवा आनंदपर्यवसायी होण्यास मुळींच हरकत नव्हती किंवा पुण्यप्रभावच्या शेवटचा देखावा कल्पना सृष्टींतलाच आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. त्यामुळें हीं नाटकें लिहिण्याचे वेळीं पाश्चात्य नाट्यतंत्रापेक्षां कोल्हटकर-खाडिलकर यांच्या तंत्राचाच त्यांच्यावर फार परिणाम झालेला दिसतो.

मात्र हें जरी असलें तरी त्यांत गडकऱ्यांची स्वयंभू प्रतिभा व पृथगात्मताहि दिसून येते. कोल्हटकरांचे ते शिष्यच होते व खाडिलकरांच्या त्यावेळच्या प्रभावी परिणामांतून सुटणें त्यांनाच काय पण कुणालाहि अशक्य होतें; पण त्यांतदेखील गडकऱ्यांनीं या दोन महान् नाटककारांचें केवळ अनुकरण केलें असें दिसणार नाहीं. त्यांच्या परंपरेंत मन घडलें जाणें ही गोष्ट वेगळी व त्यांच्यासारखें अगदीं हुबेहूब लिहिणें हें वेगळें. गडकऱ्यांनीं हें कधींच केलें नाहीं. त्यांच्या नाटकांच्या अभ्यासाचा त्यांच्यावर अप्रत्यक्ष काय परिणाम झाला असेल तेवढाच. नाहींतर अगदीं आरंभापासून त्यांच्या प्रतिभेनें अस्मानांत उड्डाण करण्यासाठीं पंख पसरलेले होते. इतकेंच काय पण ते जसजसे लिहीत

गेले तसतसा त्यांचा नाट्यशास्त्राचा व तंत्राचा अभ्यास वाढत गेला, जीवनांतले अनुभव व सहानुभूती याहि व्यापक झाल्या आणि म्हणूनच त्यांच्या पुढील कलाकृति म्हणजे ‘ एकच प्याला ’ व ‘ भावबंधन ’ या सरस वठत गेल्या. कोल्हटकर व खाडिलकर यांचा गुरु व मार्गदर्शक म्हणून गडकऱ्यांना उपयोग झालाच; पण त्याहिपेक्षां प्रेरक म्हणून गडकऱ्यांना ते विशेष उपकारक ठरले. याच प्रेरणेच्या पोटीं सद्भावनाप्रेरित अशी एक ईर्ष्याहि त्यांच्या ठिकाणीं उद्भूत झाली व या इर्ष्येमुळेंच शोकांतिका काय, सुखांतिका काय किंवा नाट्यतंत्र काय यांच्या बाबतींत त्यांनीं आपल्या पूर्वसूरींपेक्षांहि एक पाऊल पुढें टाकलें.

## कल्पनारम्य वातावरणांतून भूतलावर

वास्तविक पाहतां ‘ एकच प्याला ’ ही शोकांतिका लिहिण्याच्या वेळींच गडकरी आपल्या प्रतिभेनें निर्माण केलेल्या कल्पनारम्य वातावरणांतून भूतलावर उतरले होते. आपलें जीवन, आपला समाज व आपलें राष्ट्र यांकडे त्यांची दृष्टि वळली व मानवी जीवनांतील हरघडीचीं सुखदुःखें कोणतीं तें सूक्ष्मपणानें पाहण्यांत त्यांचें मन गुंतलें. उत्तम नाटककार हा जितका वस्तुनिष्ठ तितकाच आत्मनिष्ठ असतो व त्यानें अशावेळीं वापरलेली दृष्टि समावेशक व सहानुभूतीची असते. ‘ एकच प्याला ’ व ‘ भावबंधन ’ हीं नाटकें लिहितांना गडकऱ्यांना हीच दृष्टि प्राप्त झाली होती; याचें आणखी एक कारण असें आहे कीं, अनुभवानें व व्यासंगानें ते जीवनाच्या अगदीं जवळ आलेले होते व त्यांत त्यांच्या प्रतिभेला तन्मयतेनें रमावेसें वाटूं लागलें होतें. यामुळें प्रेमसंन्यास व पुण्यप्रभाव यांतील कल्पनारम्य वातावरण या पुढील नाटकांत दिसत नाहीं; आणि म्हणून प्रेक्षकांना देखील हीं नाटकें पाहतांना आपण आपलें किंवा आजूबाजूचेंच जीवन पाहत आहों असें वाटतें. यालाच मी ‘ ते भूतलावर उतरले ’ असें म्हणतों. कोल्हटकर व खाडिलकर यांच्या छापेंतून सुटून त्यांची प्रतिभा स्वतंत्र निर्मिति करूं लागली ती इथेंच व याच कलाकृतींनीं त्यांचें नांव अजरामर केलें. मूकनायकाचें राजदरबारी किंवा विद्याहरणचें पौराणिक वातावरण पाहिलें आणि मग

'एकच प्याला 'चें सामाजिक, रोजच्या जीवनांतील वातावरण पाहिलें म्हणजे मी काय म्हणतों त्याचें प्रत्यंतर येईल.

जी परिस्थिति शोकांतिकेच्या बाबतींत तीच भावबंधनासारख्या सुखांतिकेच्या बाबतींत झालेली आहे. भावबंधनाचें चित्रण करतांना गडकऱ्यांनीं आपल्या आजूबाजूच्या जगांतील कांहीं चित्रें व कांहीं कल्पनानिर्मित चित्रें यांचा सुंदर मिलाफ करून जीवनाचें काव्यात्म ( Romantic ) चित्रण केलें आहे.

## भावबंधनाचा जन्म

कोल्हटकरांचे ' सहचारिणी ' नाटक वाचल्यावर त्यांतील रंगराव व व्हिलन या पात्रांवर श्री. वि. सी. गुर्जर यांच्याशीं चर्चा करीत असतां गडकऱ्यांच्या प्रतिभेनें एकदम आकाशांत एक क्षणभर उड्डाण केलें व त्या तन्मयतेंत असतांनाच भावबंधन नाटकाचा *' जर्म ' गडकऱ्यांच्या मनांत एकदम अंकुरला. प्रतिभेला कुठें काय दिसेल व तें केव्हां मिळेल हें सांगतां येत नाहीं. गडकऱ्यांची प्रतिभा या जातीची होती. तिची तल्लख दृष्टि एकाद्या विद्युल्लतेप्रमाणें हृदयाकाशांत एकदम चमकून भावबंधनाच्या कथानकांतील प्रमुख दृश्यावरून क्षणमात्रांत फिरत गेली असली पाहिजे. हा साक्षात्कार गडकऱ्यांसारख्यांना होणें मुळींच अशक्य नाहीं. या क्षणमात्राच्या अलौकिक समाधींतूनच भावबंधनाचा जन्म झाला.

---

*" माझा हात धरून अंग थरारल्यासारखें करून मास्तर म्हणाले, " थांबा अण्णा ! माझ्या मनांत या क्षणीं एका नव्या प्लॉटचा ' जर्म ' ( बीज ) पडला आहे. मीच या जर्मवर एक नाटक टाकतों. एका पक्क्या व्हिलनच्या तावडींत एक भाबडा म्हातारा सांपडला आहे या कल्पनेवर एक सुंदर आणि चटकदार कॉमेडी लिहितां येईल, असें मला वाटतें. " ( श्री. वि. स. खांडेकरकृत " गडकरी व्यक्ति आणि वाङ्मय " पृ. १९५ आवृत्ति पहिली. )

## कथानकाचें पृथक्करण

‘ एक सुंदर आणि चटकदार कॉमेडी ’ रचावयाची ही गडकऱ्यांची मूळ भूमिका आहे. यांत जीवनाकडे केवळ खेळाडू दृष्टीनें पहावयाचें असा त्यांचा दृष्टिकोन असावा असें या उद्‌गारावरून वाटतें; आणि सुखांतिकेमध्यें हीच दृष्टि हवी. पण तींत केवळ ही एकच दृष्टि असते असें मात्र नाहीं व गडकऱ्यांनींहि केवळ तीच ठेवली आहे असेंहि दिसत नाहीं. खेळाडू वृत्तीनें निर्माण होणाऱ्या हास्योत्पादक वातावरणांत त्यांनीं प्रथम मधून मधून गंभीरपणाहि निर्माण केला आहे; आणि गंभीरपणा व हें हास्योत्पादक वातावरण एकमेकांच्या पार्श्वभूमीवर फार उठावून दिसत असल्यामुळें कथानकाला शेवट-पर्यंत रंगत येत गेली आहे. शेक्सपीयरच्या कांहीं सुखांतिकांत आपणांस हा ऊनपावसांचा खेळ दृष्टीस पडतो. या तंत्राबरोबर त्यांनीं शेक्सपीयरचें आणखी एक तंत्र यांत अवलंबिलें आहे. तें म्हणजे कथानकाच्या गुंतागुंतीचें. खरें म्हणजे सुखांतिकेला भरगच्च व ठाशीव कथानकाची जरूरी असतेच असें नाहीं. या ठिकाणीं जीवनाच्या सखोल पाण्यांत आपण जात नाहीं. पृष्ठभागावर कांहीं निमित्तानें क्षणमात्र उठलेलीं वादळें शमविण्याकडेच आपली प्रवृत्ति असते. परंतु गडकऱ्यांनीं मात्र भरगच्च कथानक, एकाद्या शोकांतिकेला शोभण्याइतकी गुंतागुंत व सखोल दृष्टि यांचा उपयोग केला आहे. त्यामुळें शेक्सपीयर आपल्या काव्यांत ऊर्फ सौंदर्यवादी सुखांतिकेंत ( Romantic Comedy ) जें तंत्र वापरतो त्याच तंत्राचा गडकऱ्यांनीं उपयोग केला आहे असें वाटतें. अर्थात् हा उपयोग जाणून केला आहे कीं अजाणतां केला आहे कीं कोल्हटकर-खाडिलकर ( विशेषतः खाडिलकर ) यांच्या तंत्रांतून अप्रत्यक्ष-पणें आला आहे हें सांगणें कठिण आहे. पण हास्योत्पादन, खेळाडूपणा, घटनाशील सदोष स्वभावविशेष हीं सुखांतिकेचीं सर्वमान्य तत्त्वें व शेक्स-पीयरच्या सौंदर्यवादी सुखांतिकेचीं, कथानकप्राधान्य, कल्पनाशील चित्रण वा काव्यात्मप्रेम यासारखीं कांहीं तत्त्वें यांचें मिश्रण केलें आहे; किंवा भावबंधन-मध्यें तें झालें आहे असें वाटतें. वस्तुस्थिति कांहींहि असली तरी हें मिश्रण

आमूलाग्र सुंदर झालें आहे व यांतच गडकऱ्यांचें मोठेपण सामावलेलें आहे. कथानकाचें पृथक्करण करतांना ही दृष्टि आपण ठेवली कीं त्यांतील हें सौंदर्य आपणांस दिसूं लागतें.

शेक्सपीयरच्या तंत्रापैकीं आणखी एका विशेष तंत्राचा गडकऱ्यांनीं प्रामुख्यानें अवलंब केला आहे. तें म्हणजे कथानक सुरू करतांना प्रथम कांहीं निरनिराळीं सत्रें सोडीत जायचें; यांपैकीं प्रत्येक धागा हा स्वतंत्र असावयाचा. मग त्यापैकीं दोन तीन सूत्रें घ्यावयाचीं; त्यांची थोडी गुंफण करावयाची मग दुसरीं दोन तीन घ्यावयाचीं; मग तिसरीं दोन तीन घ्यावयाचीं किंवा पूर्वींच्या सूत्रांपैकीं आलटून पालटून निरनिराळीं घ्यावयाचीं व त्यांची गुंफण करावयाची; ही गुंफण करतांना हातांत घेतलेल्या सूत्रांची एक सुंदर वीण पडत जाते व त्यांतून कथानकाच्या गोफांचें सौंदर्य प्रतीत होत जातें. अशा रीतीनें तिसऱ्या अंकापर्यंत जावयाचें किंवा नाट्यसूत्रांतील जो शिरोबिंदु असेल तेथपर्यंत पोचावयाचें व नंतर तेथून त्या गोफाची वीण उलगडण्यास सुरवात करून सर्व सूत्रें मोकळीं मोकळीं करावयाचीं. रासक्रीडेंतील जणू कांहीं हा गोफाचा खेळच. या तंत्रामुळें पीळ किंवा वीण पडत जातांना पीळ पडतो म्हणुन आकर्षकता उत्पन्न होते व उलगडतांना तो उलगडत जातो म्हणून रंगत येते. रासक्रीडेंतील ही कलात्मकता जशी शेक्सपीयरच्या कथागुंफणींत दिसते त्याप्रमाणें ती गडकऱ्यांच्या नाटकांतहि दिसते. जणुं कांहीं प्रत्येक पात्र म्हणजे एक धागा व त्याची भावना म्हणजे त्याच्या हातांतील टिपरी. या टिपऱ्यांचे निरनिराळ्या टिपऱ्यांशीं ज्याप्रमाणें संवादी वा विसंवादी ठोके पडतील त्या मानानें कथानकाच्या गोफगुंफणींत संवादी वा विसंवादी भावांची वीण निर्माण होत जावयाची आणि शिरोबिंदु गांठतांच परत ती उलगडत जावयाची; आणि मनुष्यजीवनाची प्रतीति यांतूनच यावयाची. हीच गडकऱ्यांची कला.

भावबंधन नाटकांत हीं सूत्रें गडकऱ्यांनीं कसकशीं सोडलीं आहेत व त्यांची गुंफण ते कसकशी करीत गेले आहेत हें पाहणें त्या दृष्टीनें मौजेचें आहे.

या नाटकांत मुख्य पात्रें धुंडिराज, घनःश्याम व लतिका हीं होत. दुय्यम पात्रें प्रभाकर, मालती, धनेश्वर व मनोहर; आणि गौण पात्रें म्हणजे महेश्वर, इंदु, बिंदु, मोरेश्वर, फौजदार वगैरे होते. भावबंधनांत गडकऱ्यांनीं या बारा पदरी पात्रांचा गोफ गुंफून परत तो उलगडून दाखविला आहे. या गोफाला जसा पात्रांच्या भावनांचा ताल आहे तसा सूर व गाणें हीं गडकऱ्यांच्या अंतर्भावनेचीं आहेत. त्यामुळेंच आपणांस कुठें पात्रें, कुठें समाज व कुठें गडकरी यांच्या लौकिक जीवनाची प्रतीति येते.

पहिल्या अंकांत घनश्यामची मालतीला लग्नाची मागणी, तिला लतिका-मालतीकडून नकार, तो देत असतां लतिका व मालती यांजकडून घनश्यामचा जहरी अपमान, धनेश्वराचें पापी मन व विवाहेच्छा यांतील ओढाताण व धुंडिराजची सरळ सत्वस्थवृत्ति या महत्त्वाच्या घटना दाखवून गडकऱ्यांनीं नाटकाला मोठ्या कौशल्यानें सुरुवात केली आहे. कौशल्यानें म्हणण्याचें कारण हें कीं या पांच घटनांच्या मागें अनेक निरनिराळ्या स्वभावाचीं माणसें त्यांनीं प्रथम उभीं करून मग त्यांचा संघर्ष घडविण्यास सुरुवात केली आहे. त्यांतहि घनश्यामचा जहरी अपमान म्हणजे एकाद्या विद्युत्पातानें घडून येणाऱ्या जाळपोळीसारखा व मोडतोडीसारखा आहे. अगोदर खूप ऊन पडावें, मग पावसाचा वर्षाव होऊन मन आनंदित व तृप्त व्हावें, इतक्यांत मेघगर्जना होऊन वीज कडकडावी व कुठें तरी उत्पात होऊन सर्वत्र धक्के बसावेत तसें पहिल्या अंकांत झालें आहे. घनश्याम मालतीला मागणी घालतो, धुंडिराजला तें थोडेंफार मानवतें, लतिकाप्रभाकर, मालती-मनोहर यांच्या जमावांत त्याची घोषणा होते, तोंच लतिका-प्रभाकर घनश्यामवर तुटून पडतात, एकाद्या जंगली जनावराला जखमी करावें तसें त्याला घायाळ करतात व वर उपहासानें हंसतात, मौज करतात, म्हणजेच या जखमेंत मीठ भरतात; या घटनेनें घनश्याम विव्हळ होऊन निघून जातो, धुंडिराज त्रासून जातो; मात्र आपण काय केलें याची त्यांपैकीं कुणालाहि कल्पना नसते. यांत जो विरोधजन्य विसंवाद दाखविला आहे त्यांत खरें नाट्य आहे व तेंच श्रोत्यांना हंसवीत हंसवीत विव्हल करून त्यांच्या मनाची पकड घेतें. नाट्याचें व नाटकाचें खरें बीज पेरलें जातें तें येथेंच आणि म्हणूनच सूडाच्या

कल्पनेनें बेहोष झालेल्या घनश्यामला पहिल्या अंकांच्या चवथ्या प्रवेशांत महेश्वरासारखा मूर्ख, अजागळ विवाहेच्छु भेटतांच, स्वभाव ओळखण्यांत पटाईत असलेला घनश्याम त्याला साधन म्हणून वापरण्याचें एकदम ठरवितो. इथूनच गडकऱ्यांनीं म्हटल्याप्रमाणें नाटकाच्या 'ॲक्शनला' सुरुवात होते आणि त्याच हिकमतींत धुंडिराजची चोरीबद्दल जबानी घेतली जाते. म्हणजे पहिल्या प्रवेशानें अतिशय बहारीच्या विनोदाचे हास्याचे फवारे उडविले जातात; त्यांत लतिका, प्रभाकर यांच्या विरोधी प्रेमांतून निर्माण होणाऱ्या हार्दिक हास्याची भर पडते न पडते तोंच घनश्यामच्या अपमानाचें सांवट पडून तें हास्य मावळतें व अंकाच्या शेवटीं तर धुंडिराजसारख्या निरपराध्यास पेंचांत पकडल्याबद्दल आपणांस तीव्र तळमळ वाटते; आणि याच दुःखांत तळमळत असतांना अंकाचा पडदा पडतो.

भावबंधन नाटकांत पुढें घडणाऱ्या सर्व विनोदी व गंभीर घटनांचीं बीजें पहिल्या अंकांत पेरण्यामधें गडकऱ्यांनीं फार मोठी कलात्मकता दाखविली आहे. सुखांतिकेचें मूळ बीज जें मनुष्यस्वभाव व त्यांतील वैयक्तिक उणीवा त्याचें दर्शन या अंकांत भरपूर घडतें. पुढच्या चारी अंकांच्या इमारतीचा पहिला अंक पाया असल्यानें व तो अशा रीतीनें भरभक्कम भरला गेल्यानें पुढील इमारत कशी होणार त्याची कल्पना येऊन श्रोत्यांना उत्कंठा लागून रहाते. सुखांतिका लिहिण्यांतील गडकऱ्यांचें हें कौशल्य आपणांस भरपूर प्रमाणांत इथें प्रतीत होतें. धुंडिराजचा विसराळू स्वभाव, पाल्हाळ व भोळा सत्वस्थपणा, घनश्यामची तरल बुद्धिमत्ता व तीव्र मानीपणा, लतिकेचा बेजबाबदार फटकळपणा, प्रभाकरची नसती दुबळी लुडबूड, मालतीचा सौजन्यशील नकार, मनोहरचें वकीली उत्तर, धनेश्वराची पापनिष्ठ चळलेली बुद्धि, महेश्वराचा मिगरगट्ट उल्लूपणा या सर्व विविध स्वभावांचें दर्शन पहिल्या अंकांत घडतें; त्यांत सप्तरंगी इंद्रधनुष्यांतील विविध रंगांचीं सुंदर खुलावट दिसते व लगेंच हे सर्व रंग ढगाळून फिके किंवा नामशेष होणार काय ही काळजीहि उत्पन्न होते; किंवा असेंहि वाटतें कीं या त्रिविध कुटुंबांतील इतके विचित्र व विविध स्वभाव एकत्रित आल्यावर यांचें पुढें कसें व्हायचें ? यांतून कोणता बनाव

बनायचा ? लतिका व प्रभाकर यांचें जमेल का ? घनश्याम कांहीं भलतेंसलतें करणार नाहींना ? गरीब बिचारी मालती मनोहराला मिळेल ना ? धुंडिराज आपल्या भोळेपणानें आणखी कोणकोणतीं संकटें आणणार ? आणि महेश्वराचा मूर्खपणा व त्याची निधडी छाती कोणते अनर्थ घडविण्यास मदत करणार ? अशा अनेक विचारांचा मनांत कल्लोळ माजतो, व अंकाचा पडदा पडून पुन्हा तो वर जाण्याची वेळ आली, तरी आपण उत्कंठेनें डोळे फाडून पडद्याकडे याच तन्मयतेनें पहात व याच प्रश्नांचीं उत्तरें देण्यांत स्वतांशीं रमून जातों. गडकऱ्यांची पहिल्या अंकांतील करामत अशी आहे.

दुसऱ्या अंकांतील पडदा वर गेल्यावर आपणांस याच सूत्रांची गुंफण होत असलेली दिसून येऊं लागते. सर्व पात्रांशीं संघर्ष होणारें पात्र म्हणजे घनश्याम. या पात्रानें आतां जोरानें निरनिराळ्या संयोजना करण्याचें ठरविल्यामुळें कथानकाला गति प्राप्त होते व घनश्याम ज्या वेगानें क्रिया करीत जातो, त्या वेगानें प्रतिक्रियेचे खटकेहि उडत जातात. परंतु सर्वच क्रिया घनश्याम करतो असें नाहीं. कांहीं वेळ प्राप्त परिस्थितीमुळें कांहीं गोष्टी घडतात, व त्यांचा आपल्या संयोजनेच्या कामीं उपयोग करून घेण्यास मात्र घनश्याम चुकत नाहीं. उदाहरणार्थ शिकून मुली उर्मट होतात म्हणून धनेश्वर मराठी भाषेला घरांत बंदी करतो; यामुळें घनश्यामला महेश्वर म्हणजे कामण्णा हें आपलें पात्र त्याच्या घरांत आभावितपणें घुसवून पुढील बेत साधतां येतात; याच प्रसंगामुळें प्रभाकरला रूपांतर करून तिथें वावरता येतें; याचमुळें 'इंदूबिंदूंना लग्नाची आशा उत्पन्न होते व यांतूनच नाटकांतील प्रसंगनिष्ठ विनोद निर्माण होतो. गडकऱ्यांनीं या सूत्रांची गुंफण करण्यास सुरवात करतांना हा पहिला तिढा जो घेतला आहे, तो फारच बेमालूम आहे. कोणतीहि महत्त्वाची घटना ही क्रियागर्भ असली पाहिजे; म्हणजे ती एक गोष्ट घडल्यावर तीमधून शेकडों निरनिराळ्या घटना निर्माण झाल्या पाहिजेत; कुलपी गोळा एकच पडतो; पण तो फुटून त्यातील शक्ति बाहेर पडल्यावर ती किती तरी गोष्टींची मोडतोड करते. नाटकांतील महत्त्वाची घटना ही तशी असावी लागते. एक मराठीला बंदी झाल्याबरोबर घनश्याम, कामण्णा, इंदु, बिंदु, गिरसप्पा यांचा धनेश्वराच्या घरांत

धुडगूस कसा सुरू होतो हें पहाण्यासारखें आहे. म्हणून ही घटना दुसऱ्या अंकाच्या पहिल्या प्रवेशांत घडविण्यांत गडकऱ्यांनीं फार मोठें औचित्य साधलें आहे.

घनश्यामच्या सांगीवरून धनेश्वर मालतीशीं लग्न करण्यास तयार होतो. धुंडिराज जमदग्नीचा अवतार आणून मालतीला या लग्नाला संमति देण्याविषयीं आग्रहानें सांगतो, लग्नगांठ घट्ट करण्यासाठीं याच वेळीं मालती मनोहरास विवाहाचें वचन देते, महेश्वराला मराठी येतें हें इंदूला कळतें व त्यामुळें ती त्याला जवळ करते व तो तिचा पुढील कार्याच्या कामीं उपयोग करण्याचें ठरवतो, प्रभाकर प्रतिकारास तयार होतो व मालती पितराज्ञेनें मनोहराला दिलेलें वचन परत घेऊन धनेश्वराशीं लग्न करण्यास कबूल होते, महेश्वराचा पुन्हां बिंदूजवळ आपण आंधळे नसल्याचा स्फोट, मालती-मनोहरांचा प्रेमाच्या बाबतींत स्वप्नभंग या घटना घडवून गडकऱ्यांनीं सूत्रांची गुंफण दाणीदार पण बरीच गुंतागंतीची केली आहे. पहिल्या अंकांतील प्रेक्षकांच्या उत्कंठेला या ठिकाणीं विवंचनेचें स्वरूप येतें व विनोदबीजाला चांगले अंकुर फुटून त्याला भलताच जोम येतो. कथानकाची गुंफण करतांना गंभीर घटनेच्या बाबतींत प्रेक्षकांना अस्वस्थ करणें व विनोदी घटनेनें त्याच्या मुरकुंडया वळावयास लावणें हीं दोन कार्यें साधावयाचीं असतात. गडकऱ्यांनीं हीं दोन्हीहि कार्यें दुसऱ्या अंकांत साधलीं आहेत. इतकेंच नव्हे, तर या अंकांतील घटनांनीं आतां पुढें आणखी कांहीं तरी विलक्षण घडणार अशी प्रेक्षकांच्या मनाची खात्री होते व त्यांची वृत्ती कथानकाशीं समरस होऊन पुढील अंकाकडे लागते.

गडकऱ्यांच्या कथारचनेंत तिसऱ्या म्हणजे मधल्या अंकाला फार महत्त्व असतें. हा तिसरा अंक म्हणजे एकाद्या भव्य पुलाच्या कमानीच्या मधल्या दगडासारखा ( Key-stone ) असतो. कमानीच्या रचनेला निराळी दिशा मिळावयाची असली तर ती येथूनच मिळावयाची असते. चढत्या कमानीला आपला शिरोबिंदु गाठावयाचा असल्यानें कथानक या अंकांत अधिक गतिमान होतें; त्यांत खलनायकाच्या हातून एकामागून एक भराभर चुका होत जातात व कथानकाला कलाटणी मिळण्याचीं पूर्वचिन्हें दिसूं लागतात. घनःश्यामच्या

योजनांचा कळस व प्रभाकराच्या प्रतियोजनेची सुरुवात हें या अंकाचें उद्दिष्ट आहे व तें त्यांनीं उत्कृष्ट साधलें आहे. शिवाय धनेश्वराचें मालतीशीं लग्न होण्याची निश्चिति व घनश्यामची लतिकेस हुकमी मागणी यांनीं सबंध कथानकास भलतीच गति दिली आहे. या अंकांत पूर्वीच्या अंकांतील पदर एकांत एक गुंतवून गडकऱ्यांनीं अंकाची वीण गुंफली आहे. यांत घनःश्यामनें खोटे कागद स्मशानांत पुरणें व खोटी हुंडी जवळ ठेवणें, इंदू-बिंदूच्या मनांत लग्नाचे संशय निर्माण होणें, प्रभाकराचें म्हणजे गिरसप्पाचें लतिकेजवळ प्रकटीकरण होणें, बिंदूकडून प्रभाकराला म्हणजे गिरसप्पाला महेश्वराचें खरें स्वरूप कळणें, प्रभाकरनें मनोहरला त्याच्यावर नीट नजर ठेवण्यास सांगणें, घनश्यामनें लतिकेस हुकमी मागणी घालणें व धनेश्वरावर मालतीशीं लग्न करण्याची घनश्यामनें सक्ति करणें या घटना घडलेल्या आहेत. यापैकीं धनेश्वर व लतिका यांवर आपल्या हुकुमाची अंमलबजावणी करण्याचें बोलून दाखविण्यांत घनःश्यामनें आपल्या अंतःकरणांतील सूडाचें थोडेसें विष मूर्खपणानें ओकलें आहे व आपण जो दुष्टावा साधणार आहों त्याची पूर्वसूचना दिली आहे. पण यांतून त्याचें रहस्य प्रकट होऊन त्याची पर्यायानें प्रभाकरला मदत होण्याची आशाहि उत्पन्न झाली आहे. घनश्यामच्या अतिरेकी वृत्तीनें व प्रभाकराच्या दक्षतेनें आतांपर्यंतचा डाव कदाचित् उलटेल अशी थोडीशी आशा निर्माण केली आहे व यांतच पुढील अंकाचीं बीजें आहेत. दुसऱ्या अंकाच्या शेवटीं बसलेला ताण यानें किंचित् सैल झाला आहे; पण मनांतली भीति मात्र कमी झालेली नाहीं. त्यामुळें प्रेक्षक भीतिगर्भ हसऱ्या चेहऱ्यानें व थोड्या आशेनें आपल्या मनांतील अपेक्षा आतां पुढील अंकांत सफल होतील या दृष्टीनें तिसऱ्या अंकाच्या पडलेल्या पडद्याकडे पाहूं लागतो.

चवथ्या अंकांत या गुंतागुंतीचा उलगडा होणार अशी आशा वाटणारी पहिलीच घटना म्हणजे मनोहरला स्मशानांत घनश्यामनें पुरलेले कागद सांपडणें ही होय. पण लगेंच पुढें धनेश्वराचा आत्महत्त्येचा बेत व त्याचा मालतीजवळ ओझरता स्फोट, मालतीकडून लतिकेची कानउघाडणी, लतिकेची घनश्यामला

शरणागति, प्रभाकर-लतिकांना महेश्वर व इतर पात्रें यांजकडून घनश्यामच्या कुलंगड्याचें आणखी अधिक ज्ञान या बऱ्यावाईट घटनांनीं पुन्हा ऊनपावसाचा खेळ सुरू केलेला आहे. पण आतापर्यंत पार्श्वभूमींत वावरणारा प्रभाकर आतां प्रामुख्यानें पुढें आला आहे. घनश्यामची पीछेहाट होणार हें स्पष्ट दिसत आहे. त्यानें उभीं केलेलीं त्याचीं पापें त्यालाच खाणार कीं काय असें वाटूं लागतें. विशेषत: घन:श्यामच लतिकेशीं लग्न करणार आहे ही गोष्ट महेश्वराला प्रत्यक्ष लतिकेकडून जेव्हां कळते, तेव्हां त्याला आपण कसें बनलों हें कळतें व लतिकेच्या अभिलाषानें तो घनश्यामविरुद्ध कारवाई करण्यास प्रवृत्त होतो. कथानकांत महेश्वरासारख्या लवचिक पात्राचें महत्व फार असतें. कथानकाला कलाटणी देण्याच्या कामीं त्याचा फार उपयोग होतो. गडकऱ्यांनीं महेश्वरमार्फत घनश्यामचा डाव त्याच्याच अंगावर फार सफाईनें व कौशल्यानें उडविला आहे. महेश्वराचें हें परिवर्तन म्हणजे पांचव्या अंकाचें बीज आहे. किल्ली हरवल्यानंतर कित्येक वेळां खिळ्यानें देखील कुलूप निघतें; तेंच महेश्वराच्याबाबत झालें आहे. त्याला किल्लीचें महत्व नसलें, तरी खिळ्याचें महत्व खास आहे. आणि म्हणूनच लतिकेला घनश्यामनें रडवून पुरतें शरण आणण्यासारखी अघोर घटना या अंकांत झाली असली, तरी प्रेक्षकांच्या मनांत या अंकाचा पडदा पडतांना जबरदस्त आशावाद निर्माण झालेला असतो व अपेक्षापूर्तीच्या संभवनीयतेचा आनंद होऊन त्या तन्मयतेंत तो पुढील अंकाकडे दृष्टि लावून बसतो. प्रेक्षकांमध्यें ही पुढील अंकांतील घटनेविषयीं वेळोवेळीं जी अपेक्षागर्भ तीव्र मनोवृत्ति किंवा उत्कंठा गडकऱ्यांनीं निर्माण केली आहे तींतच त्यांच्या रचनाकौशल्याचें रहस्य साठलेलें आहे.

पांचवा अंक अवघा दोन प्रवेशांचाच आहे. पैकीं पहिल्या प्रवेशांत इंदूबिंदूंना महेश्वराचा लग्नाला सरळ नकार, महेश्वराच्या सांगण्यावरून घनश्याम परत पोलिसवेशांत येत आहे ही बातमी, विष व सरबत यांची अदलाबदल करण्याविषयींची लतिकेची महेश्वरास सूचना व महेश्वराचा इतक्या बुद्धिमान मुलीबरोबर लग्न करण्यास आपण होऊन नकार, या घटना घडलेल्या दाखविल्या आहेत. या घटना म्हणजे गुंफलेलीं सूत्रें वेगळीं वेगळीं करून उलगडून

दाखविण्याचा एक मार्गच आहे. कारण इंदू-बिंदूंची लग्नाच्या बाबत निराशा झाल्यानें त्यांचे चाळे म्हणजे पर्यायानें त्यांच्या हालचाली संपल्याच; महेश्वरानें विषाची व सरबताची अदलाबदल करण्यानें धनेश्वराचा जीव वांचला; घनश्याम पोलिसवेषांत येण्यानें त्याचा कांटेपिंजरा तयार होऊन त्याच्या दुष्टाव्यास खीळ बसली; व प्रत्यक्ष महेश्वरानेंच लतिकेचा नाद सोडल्यानें त्याबाबत येणारी अडचण अनायासें दूर झाली. अशा रीतीनें गुंतवलेलीं सूत्रें किंवा घातलेली वीण उलगडून परंत सर्व धागे मोकळे करण्याचा प्रयत्न या प्रवेशांत केला आहे. आतां प्रेक्षकांना जें होणार असें सारखें वाटतें आहे, तें झालेलें पाहाण्याचा आनंद हवा असतो, व तोच त्यांना पुढील प्रवेशांत मिळतो. नाटकांतील शेवटच्या प्रवेशांत पर्यवसान असतें व सुखांतिकेंत तर ते कधीं कधीं एकाद्या अपूर्व चमत्कारानेंहि झालेलें दाखविण्याचा पाश्चात्य नाटककारांचा प्रघात आहे. प्रेक्षकांना मात्र त्यासंबंधीं पूर्ण अज्ञान असतें. भावबंधनमध्येंहि गडकऱ्यांनीं हेंच केलें आहे. शेवटच्या प्रवेशांत घनश्याम पोलिसवेशांत पकडला जातो; व धुंडिराजची खोटी जबानी हा लेखी पुरावा पुढें करण्यांत येतो. पण प्रभाकराच्या सांगण्यावरून धुंडिराज तो कागद फाडून टाकतो व मूळ पुरावा एकदम नष्ट करतो. हें पाहातांच घनश्यामला निरपेक्ष दयेची प्रतीति येते व तो धुंडिराजपुढें एकदम गोगलगाय बनतो. या दोन छोट्या घटनांनीं सर्व संविधानकाचा कळस केला आहे. प्रेक्षकहि या चमत्कारानें एकदम स्तिमित व आनंदित होतात.

भावबंधन नाटकाचें हें अंतर्बाह्य शिल्प पाहिलें म्हणजे तें एकाद्या सुंदर देवालयासारखें वाटतें. पानांची संख्या जरी पाहिली तरी ती, पहिला अंक ५५, दुसरा अंक ५३, तिसरा अंक ३०, चवथा अंक २८ व पांचवा अंक ८ अशी आहे. पहिल्या अंकाचा ऐसपैस रूंद पाया, त्यावर दुसऱ्या अंकाचा जरा कमी रुंद चौथरा, त्यावर तिसऱ्या अंकाचा आणखी कमी रुंद असलेला गाभारा, त्यावर त्या चवथ्या अंकाचा निमुळता भाग व शेवटीं पांचव्या अंकाचा कळस अशी शिल्पसुंदर व रेखीव बांधणी आपणांस दिसूं लागते. गाभाऱ्यांत देखील प्रत्येकाच्या मनोमय भावाची मूर्ति बसविल्यासारखी वाटते. कळसाचें

दर्शन होतांच घनःश्यामाला निरपेक्ष दयेची प्रतीति येते व तो आंतील निर्मळ भावाला शरण जातो.

पण गडकऱ्यांनीं हें कथानक जुळवितांना त्यांच्या हातून गुणांबरोबर कांहीं दोषहि घडले आहेत. या बाबी किरकोळ असल्या तरी त्या आपणांस दिसल्याखेरीज राहात नाहींत. स्वभावधर्माची माहिती करून देतांना कांहीं कांहीं पात्रांतील विशेष मनोधर्म, पुढील अंकांतील घटना लक्षांत घेऊन, त्यांच्या सोयीसाठीं अगोदर मुद्दाम सांगितल्यासारखे वाटतात. उदाहरणार्थ, महेश्वराला स्मशानांत जाण्याची भीति वाटते, किंवा मनोहर हा भूगर्भशास्त्राचा विद्यार्थी होतो, किंवा स्मशानांत नेमका हिरवा दगड दिसतो या गोष्टी सहज वाटत नाहींत. कथानक जुळवितांना वाटेंत येणाऱ्या अडचणी दूर करण्यासाठीं त्या मागाहून उत्पन्न केल्यासारख्या वाटतात. कारण हे स्वभावविशेष उत्पन्न केले नसते किंवा दिग्दर्शित केले नसते तर पुढील कांहीं घटना घडण्यास पंचाईतच पडली असती. उदाहरणार्थ, स्मशानांत कागद महेश्वरानें कां पुरले नाहींत ? मग महेश्वराच्या हातीं अंतिम रहस्य गेलें असतें; म्हणून त्याच्यासाठीं स्मशानाची भीति निर्माण झाली, आणि घनश्याम स्वतःच स्मशानांत गेला. घनश्यामाला कागद पुरण्याला जागा स्मशानांतच कां सांपडली ? त्याच्यासारख्या पाताळयंत्री खलनायकाला इतरत्र कुठेंहि जागा मिळाली असती. स्वतःच्या घरांत मिळाली असती; पण मग मनोहर तिथें कसा गेला असता ? बरें, मनोहर स्मशानांत गेला तरी त्याला पुरलेले कागद कसे सांपडले असते ? त्यासाठीं हिरवा दगड व हिरव्या दगडाचें आकर्षण होण्यासाठीं भूगर्भशास्त्राचें ज्ञान, अशी ही उलटी युक्तिबाज सांखळी आहे. म्हणजे या गोष्टी नाटकांत सहज ओघांत नैसर्गिक रीतीनें आल्यासारख्या वाटत नाहींत.

कांहीं घटनांच्या बाबतींत देखील असेंच झालें आहे. उदाहरणार्थ, घनश्यामनें पोलिसवेशांत स्टेशनसारख्या सार्वजनिक जागीं येणें, धुंडिराजला धाकदपटशा देऊन तिथें त्याचेकरवीं खोटी जबानी लिहून घेणें व परत शेवटीं त्यानें पोलिसवेशांत येणें या घटना स्वाभाविक वाटत नाहींत. स्टेशनवर किती तरी प्रकारचे चौकस लोक असतात; खऱ्या पोलिसांचा पहारा असतो व असलीं

कांहीं कुलंगडीं असलीं तर तीं शोधून काढण्याला त्यांचे सरावलेले शोधक डोळे टपलेले असतात. पण हे खोट्या जबानीचें काम निर्वेधपणें पार पडतें, त्याला तिथें कांहींहि अडथळा येत नाहीं; तसेंच घनश्याम परत पोलिसवेशांत आला तर त्याला धनेश्वर ओळखणार नाहीं का ? मागें धुंडिराजनें त्याला ओळखला नाहीं, कारण धुंडिराज विसराळू होता; पण धनेश्वर तसा नव्हता; शिवाय घनश्याम त्याच्याकडे रोज येणारा जाणारा; मग आपणांस धनेश्वर कदाचित् ओळखील हीं भीति हुशार व बुद्धिवान घनश्यामास कशी वाटली नाहीं ? पण ही शंका घनश्यामच्या किंवा प्रेक्षकांच्या मनांत येऊं नये अशीच गडकऱ्यांची इच्छा होती.

लतिकेच्या शरणागतीनें, धुंडिराजच्या विनवणीनें किंवा धनेश्वराच्या धमकावणीनें वठणीस न येणारा किंवा न वळणारा घनश्याम पुराव्याचा कागद फाडतांच एकदम शरण येतो व स्वाभिमान सोडतो हें मानसशास्त्रदृष्ट्या चमत्कारिक वाटतें; पाश्चात्य सुखांतिकेचें एक तंत्र म्हणून हें ठीक आहे; पण त्याला मानसशास्त्रीय कसोटी लावल्यावर तो पुण्यप्रभावच्या परंपरेंतलिच एक चमत्कार ठरतो, असें म्हणणें भाग पडतें. महेश्वराचा धनेश्वराच्या घरांत प्रवेश करून देतांना घनश्यामला बरेच कष्ट पडले आहेत; तसेंच कागदांची चोरी करण्यासाठींच जर हें करावयाचें होतें, तर तें काम इंदू किंवा बिंदू यांपैकीं कोणत्याहि ‘ पोरीनें ’ केलें. असतें. त्यांच्यासारख्या मूर्ख पोरींना नुसतें लग्नाचें वचन पुरें होतें; पण इंदूबिंदूंच्या सहवासांत महेश्वराला आणून त्यांना हास्यरस निर्माण करावयाचा होता, हें त्यांतील खरें मर्म आहे. अर्थात् महेश्वर या पात्राला एकदां धनेश्वराच्या घरांत घुसविल्यावर त्याचा उपयोग झाला नाहीं, असें मात्र नाहीं.

### नायक कोण ?

या नाटकांत खलनायक व नायिका आहेत; पण नायक नाहीं. नायक नाहीं म्हणजे आद्यंत एक नायक नाहीं. पूर्वार्धांत धुंडिराज व उत्तरार्धांत प्रभाकर हे नायक ठरतील. शेवटच्या प्रवेशांत प्रभाकर धुंडिराजला पुराव्याचा कागद

फाडण्यास सांगतो. हा द्राविडी प्राणायाम करण्याचें कारण गडकऱ्यांना प्रभाकराला विशेष महत्त्व देऊन नाटकाचा नायक ठरवावयाचा होता असें वाटतें. धुंडिराजालाच ही कल्पना स्वयंस्फूर्तीनें सुचली असती तर तें अधिक परिणामकारी दिसलें असतें. कारण "अरे मुलांना कां पुढें करावयाचे?" असें म्हणणाऱ्याला हें सुचणें अगदीं शक्य होतें; पण मग ते श्रेय प्रभाकराला मिळालें नसतें, व त्याच्या नायकत्वांत तो एक दोष राहिला असता; म्हणून गडकऱ्यांनीं हा वळसा घेऊन ही घटना घडविली. कथानकाचे गुणाहि तितकेच उच्च दर्जाचे आहेत. उत्कृष्ट गुंतागुंत, मनोवेधक प्रसंगांची एकसारखी निर्मिति, वाचकांच्या अपेक्षांना धक्के व त्यामुळें शेवटपर्यंत निर्माण झालेला संभ्रम हा प्रमुख गुण म्हणून सांगतां येईल. कथानकाला एक कांहींतरी निश्चित आराखडा आहे व त्यांत चढउतार हे ठराविक अंतरावर ठेवलेले आहेत. त्यामुळें त्यांत प्रमाणबद्धता येऊन कलात्मकता साधली गेली आहे. कथानक नुसतें गतिमान नसून प्रगतिमान आहे. त्यामुळें शेवटीं घडून येणारें पर्यवसान स्वाभाविक वाटतें. अनेक पात्रांचे अनेक स्वभाव व त्यांच्या संघर्षांतून निर्माण झालेले खटके यामुळें अनेक घटना निर्माण झाल्या आहेत व त्यांनीं कथानक परिपोषित होत गेलें आहे. नवीन काव्यमय कल्पना, हास्योत्पादक कोटया, रसपरिपोषक प्रसंग, बुद्धीला व हृदयाला कमालीचें आकर्षित करणारें प्रत्येक पानांवरील कांहींतरी, व करुण व हास्य यांच्या आळीपाळीनें होणाऱ्या खेपा या गोष्टी आपलें मन रिझवितात व शेवटपर्यंत पकडून ठेवतात. पात्रांचें रेखीव स्वभावचित्रण, खटकेबाज संवाद, पोटफोडया विनोद व कथानकाची मनोरंजक गुंफण यांनीं भावबंधन नाटकाला लोकप्रिय नाटकांत उच्च स्थान मिळवून दिलें आहे व तें कायम टिकणारें आहे.

## स्वभावरेखाटन

**१ घनश्याम :** हा मानी, खुनशी, सूडवृत्तीचा, निर्दय, निरपेक्ष दयेसाठीं आसावलेला पण दुसऱ्यावर ती दया न करणारा, धाडसी, कृतघ्न व अकारण द्वेष करणारा असा असून या नाटकांतील खलनायक आहे. तो बुद्धि

मान असूनहि त्याला कधीं कधीं साध्या गोष्टी कळत नाहींत, या दृष्टीनें तो 'अतिशहाणा' आहे. मानी असणें व निरपेक्ष दयेची आशा धरणें, हें त्याच्या गरिबीला शोभण्यासारखे गुण आहेत; पण बाकीचे दोष अंगीं धारण करतांना 'आपण कधीं कोणावर निरपेक्ष दया केली आहे काय? ती जर केली नाहीं— आणि तशी संधी आली असतांनाहि जर केली नाहीं—तर आपणांस अशा दयेची अपेक्षा करण्याचा हक्क कसा पोंचतो, हें त्यास कळावयास पाहिजे होतें. पण त्याला तें कळलें नाहीं, कीं उमगलें नाहीं हीच त्याच्या स्वभावांतील उणीव; व ही सुखांतिकेच्या तंत्राला सर्वस्वी शोभणारी व म्हणूनच पोषक असल्यानें त्याचें चित्रण उठावदार झालें आहे. शिवाय तो जसा सगळा चांगला नाहीं तसा सगळा वाईटहि नाहीं. गडकऱ्यांच्या वृंदावनाप्रमाणें तो मोठा सहृदयाहि आहे. म्हणूनच तो "कळी कुसकरतांना गुलाब दुखावला तर त्याला मीं काय करूं?" व "बाण जिथून सुटतो तिथें त्याची कांहींच साक्ष रहात नाहीं; पण जिथें जाऊन भिडतो तिथें जखम होते आणि जखम बरी झाली तरी कायमचा वण तरी रहातोच." या सारखीं परस्पर विरोधी वाक्यें बोलतो. हीं दोन वाक्यें म्हणजे त्याच्या स्वभावाचीं दोन अंगें किंवा दोन टोकें आहेत. त्याच्या या गुणदोषांमुळें तो एकाद्या सुखांतिकेचाच खलनायक शोभण्यासारखा आहे. त्याच्या सर्व दुर्वृत्ती नाहींशा होऊन तो शेवटीं दीन होतो, हें त्याचेंच द्योतक आहे. तो संपूर्ण दुष्ट असता तर असा नमला नसता व त्यानें भावबंधनाची शोकांतिकाच घडवून आणली असती. पण गडकऱ्यांनीं प्रथम पासूनच त्याला तसें रंगविलें नाहीं. त्यामुळें विसंवाद निर्माण होऊनहि भावबंधन नाटकाची एकसूत्रता बिघडली नाहीं.

**२ धुंडिराज :** या पात्राला जवळ जवळ मध्यवर्ति पात्राचें महत्त्वाचें स्थान देतां येईल. अतिशय गोष्टीवेल्हाळ, पेंचपाच नसलेला, अव्यावहारिक पण भावडा, वत्सल अंतःकरणाचा, उदार व त्यागी असा तो आहे. तो जुन्यांचे अनुभव सांगतो, पण नव्याची त्याला आवड आहे. आपल्या कुटुंबियांस तो फार प्रिय असतो व त्याच्या वत्सल स्वभावामुळें त्याच्यासाठीं कसलाहि त्याग करण्यास प्रत्येकजण तयार असतो. तो भावडा असल्यामुळें श्रोत्यांनाहि

त्याच्यासंबंधीं सहानुभूति वाटते. त्याच्या उदार व समावेशक वृत्तीमुळें त्यानें प्रभाकरसारखीं माणसें जोडलीं आहेत व त्यामुळें त्याच्या कुटुंबाला विलक्षण नैतिक बळकटी आली आहे. आपलीं मुलें त्याला जीव कीं प्राण वाटतात व त्यांच्यासाठीं तो कसलाहि त्याग करण्यास तयार असतो. मालतीसारखी सालस कन्या, प्रभाकरासारखा सत्त्वस्थ आश्रित व इतर लडिवाळ मुलें हें त्याला आपल्या घराचें खरें वैभव आहेसें वाटतें. आणि त्यांच्यासाठीं केलेल्या त्यागाचें शेवटीं त्याला फळहि मिळतें. गोष्टीवेल्हाळपणा, अव्यावहारिकता किंवा भावडे-पणा हे त्याचे दोष सुखांतिकेला व विनोदाला पोषक झाले आहेत. त्याच्या चुकीमुळें व अदूरदर्शित्वामुळें हास्य व करुण हे रस निर्माण झाले आहेत. तो चांगला पण भावडा असल्यानें व त्याला मालतीसारखी सालस कन्या असल्यानें अनेक घटनांचें तो मध्यवर्ति स्थान झाला आहे. मूळ नाटकाला सुरुवातच, त्याच्या मुलीस घनश्यामनें घातलेल्या मागणीपासून व तिच्या नकारापासून होते. या दोन घटना पुढील अनेक घटनांचें मूळ असल्यानें पुढील सर्व कथानकांत धुंडिराजाला अव्वल दर्जाचें महत्त्व प्राप्त झालें आहे. धुंडिराजच्या ठिकाणीं वार्धक्यसुलभ विसराळूपणा, भावडेपणा वगैरे अनेक दोष आहेत, पण हे विमा-एजंटाला शोभण्यासारखे नाहींत. •विमाएजंट हा अनेक ठिकाणीं फिरल्या-मुळें त्याला मनुष्यस्वभावाची उत्तम माहिती व पारख असते; पण नेमका याच गोष्टीला तो पारखा असतो व ही त्याच्या स्वभावरेखाटनांत विसंगति किंवा अस्वाभाविकता वाटते. स्टेशनासारख्या सार्वजनिक जागीं तो न केलेल्या अप राधाचा कबूलीजबाब एका सर्वस्वी अनोळखी खोट्या पोलिसास लिहून देतो, हें विमाएजंटाच्या चौकस स्वभावाला जुळणारें नाहीं. त्यामुळें तो विमाएजंट आहे असें जेव्हां गडकरी सांगतात, त्यावेळीं आपणांस चमत्कारिक वाटतें. पण ही विसंगति सोडली, तर धुंडिराजाचें पात्र सुसूत्र आहे. त्यानें आरंभीं हास्य नंतर करुण व शेवटीं शांत रस निर्माण केला आहे. गडकऱ्यांनीं रंगविलेला हा रसक्रम मानसशास्त्राला धरून आहे. तो जात्या सरळ, गोष्टीवेल्हाळ व विसराळू असल्यान विनोद निर्माण होणें क्रमप्राप्तच होतें. पण कबुलीजबाब देऊन चोरीच्या आरो-पाची तलवार डोक्यावर गुप्त रूपानें सारखी टांगत राहिल्यावर त्याच्या जीवनां-

तील हास्योत्पादक सहज प्रवृत्ति एकदम नाहींशा होतात व जीवन ही एक गंभीर करुण शोकांतिका आहे, असें त्याला वाटूं लागतें. त्याच वृत्तीमुळें पुढें कारुण्य निर्माण झालें; शेवटीं त्याची स्वभावसुलभ व औदार्यशील निरपेक्ष दया प्रगट होते तेव्हां जिकडे तिकडे शांतरस निर्माण होतो. सत्त्वस्थपणा हा त्याचा स्थायीभाव आहे व त्यामुळेंच घनश्यामसारखा कट्टर खलनायकहि त्याच्यापुढें नमतो. धुंडिराज हा याच गुणांमुळें श्रोत्यांची सहानुभूति आपल्याकडे ओढून घेतो. गडकऱ्यांनीं हें अलौकिक अभिनव पात्र निर्माण करून वाचकांना हसवणें, रडविणें व पुनः त्यांची वृत्ति समधौत करणें हा चमत्कार केला आहे.

**३ लतिका :** ही श्रीमंत व धूर्त बापाची एकुलती एक, लाडांत वाढलेली मातृहीन आवडती लेक. श्रीमंतीचा उद्दामपणा तिच्या अंगीं पुरेपूर भरलेला आहे. अनुवंशिकतेनें आलेला उद्दामपणा व आतताईपणा महाविद्यालयीन शिक्षणानेंहि शमला नाहीं, उलट तिची जीभ सैल होती ती अधिकच सैल सुटत चालली. याचा परिणाम असा झाला कीं तिनें स्वतांवर व आपल्या आप्तेष्टांवर अनेक नसतीं संकटें ओढवून घेतलीं. घनःश्यामसारख्या खुनशी माणसावर वाटेल तसें तोंड टाकण्यानें, तिनें सापाच्या शेपटीवर पाय दिल्यासारखेंच झालें. त्यामुळें तिच्या जीवनाची शोकांतिका होते कीं काय, अशी प्रथम भीति वाटते; पण तिच्या स्वभावाला एवढीच एक बाजू नाहीं. त्याला अनेक पैलू आहेत, व हे बाकीचे पैलू चमकदार आहेत. तिच्या ठिकाणीं पितृप्रेम आहे, मैत्रीची गाढी भावना आहे व प्रियकरासंबंधीं उत्कट प्रेम आहे. ती जातीची निष्कपट, निरागस वृत्तीची असून तिचें अंतःकरण स्त्रीस्वभावानुसार हळुवार आहे. पण या सर्वांवर विशेष चमकून दिसणारा तिचा गुण म्हणजे चूक कळल्यानंतर तीव्र पश्चात्ताप पावणारें असें तिचें मन आहे. इतकेंच काय, पण चुकीची दुरुस्ती करण्यासाठीं ती नंतर परमावधीचा स्वार्थत्याग करण्यासहि तयार होते, हा तिच्या स्वभावधर्मांतील विशेष आहे. तडफदार फटकळ माणसें विनम्र क्वचितच असतात; पण ती मात्र आपलें डोकें चुकीच्या प्रायश्चित्तार्थ शत्रूपुढेंहि नमविण्यास तयार होते, हा तिचा सद्गुण आहे. या तिच्या त्यागशीलतेमुळेंच तिचीं संकटें नरमतात व तिच्या जीवनाला उजळा मिळतो. घनःश्याम जसा सगळा वाईट

नाहीं, तशी लतिका ही सगळी चांगली नाहीं; पण घनःश्यामच्या पश्चात्तापानें तो जसा संपूर्ण चांगला माणूस होतो, तशी लतिकाहि पश्चात्तापानें शुद्ध होऊन संपूर्ण चांगली होते. पूर्वीच्या तडफदारपणानें नाटकाच्या पूर्वार्धात ती खळबळ उडविते, तर समजूतदारपणाच्या शरणवृत्तीनें ती पुढें येणाऱ्या संकटांना तोंड देते. प्रसंग पडला तर ती सावधगिरीहि किती ठेवते, हें तिच्या महेश्वराशीं वागण्याच्या धोरणावरून स्पष्ट कळतें. तिच्या तीव्र बुद्धिमत्तेपुढें महेश्वरहि शेवटीं विचलित होतो व तिच्याशीं आपला लग्नाचा कलेला निश्चय सोडून देतो. लतिकेच्या स्वभावाचा आणखी एक पैलू आहे व त्याचें तेज विशेष असून त्यांत तिच्या वृत्तीचें खरें तेज सांठविलेलें आहे. हा म्हणजे तिचें प्रभाकरावरील निःसीम प्रेम. हें प्रेम काव्यात्म, अढळ व उत्कट आहे. पण त्याच्या प्रकटी-करणाची पद्धत आधुनिक जीवनांत सर्वथा नवीन आहे. लतिका व प्रभाकर यांच्यामधील भावबंधन विरोधी स्वरूपाचें आहे. ‘ तुझं माझं पटेना व तुझ्या-वांचून गमेना ’ या म्हणीचें पुरेपूर प्रत्यंतर म्हणजे या दोघांचें प्रेम. जेव्हां तीं भेटतात तेव्हां तीं भांडतात; हीं भांडणें फार क्षुल्लक कारणांवरून होत असल्यानें, त्याला ‘पेल्यांतील वादळापेक्षां ’ अधिक महत्त्व नाहीं; पण हीं ‘ पेल्यांतील वादळें ’ आहेत म्हणूनच या सुखांतिकेला तीं फार पोषक झालीं आहेत. नाटकांतील हास्यरसाला त्यांनीं भरपूर मदत केली आहे. त्यांच्या वृत्तीमध्यें खरोखरीच विरोध किंवा विसंवाद असता तर शेवटीं चवथ्या व पांचव्या अंकांत त्यांनीं ज्या संयोजना केल्या त्या करण्यास तीं एकत्र आलीच नसतीं. धनेश्वरासारख्या दुःखी पित्यावरील संकट, धुंडिराजसारख्याला घनश्यामनें घातलेला पेच व त्यामुळें मालतीसारख्या जिवलग मैत्रिणीवर ओढवलेली आपत्ति हीं पाहतांच, ती आपलें कर्तव्य करण्यास व त्या कामीं कमालीचा त्याग करण्यास तयार झाली यांतच तिच्या स्वभावाची खरी बाजू दिसते. ती प्रभाकराबरोबर भांडते व त्याच्याशीं वाद घालते याचें कारण तिला त्याला चिडवणें आवडतें. तो रागावला व दोन शब्द बोलला कीं तिला बरें वाटतें. हा तिच्या अल्लड, खोडकर पण खेळकर स्वभावाचा एक धर्म आहे. या सर्व गुणदोषांमुळें लतिकेचें पात्र अभिनव व आकर्षक झालें आहे. लतिकेआधीं या स्वभावाची थोडीशी चुणुक

केळकरांच्या ‘ त्राटिकेनें ’ व प्रो. वामनराव जोशी यांच्या ‘ उत्तरेनें ’ दाखविली होती. तरी परंतु गडकऱ्यांनीं निर्माण केलेली स्त्रीस्वभावाची ही प्रत अप्रतिमच वठली आहे. लतिकेचे दोष कळूनहि आपणांस ती आवडते; याचें कारण सुशिक्षित स्त्रियांमधून दुर्मिळपणें दिसणारा निरागसपणा, तडफदारपणा व ध्येयवादीपणा तिच्या ठिकाणीं आहे व म्हणूनहि दुबळ्या सौजन्यशील मालतीपेक्षां अशा लतिकाच समाजांत निर्माण व्हावयास हव्यात असें आपण म्हणतों.

**४ प्रभाकर :** हा जात्या अतिशय भावनाप्रधान, वाङ्मयीन वृत्तीचा, उतावीळ पण प्रेमळ वृत्तीचा आहे. धुंडिराजसारख्या त्यागी सत्वशील व प्रेमळ माणसाच्या घरांत तो लहानाचा मोठा झाल्यानें त्याच्या मनावर सर्व चांगले संस्कार झालेले आहेत. तो अत्यंत सत्प्रवृत्त असून त्याचें बोलणें सद्धेतुमूलक असतें. पण फाजील भावनाशीलता व उतावीळपणा हे त्याचे दोन दोष आहेत. अर्थातच या दोन उणीवांमुळें त्याचें बोलणें, चालणें, वागणें पोरकटपणाचें वाटतें; पण या तारुण्यसुलभ पोरकटपणांतूनच सुखांतिकेच्या विनोदाचा परिपोष होऊन निरनिराळ्या घटनांना रंगत आली आहे. त्याचें लतिकेवरील प्रेम व धुंडिराजबद्दलची कृतज्ञता सखोल आहे; पण त्याला संयम नाहीं त्यामुळें तो कुठें काय बोलेल त्याचा नियम नाहीं. लतिका आपल्या फटकळपणानें आपल्यावर संकट ओढवून घेते तर प्रभाकर कारण नसतां तिच्या मदतीस धावून त्या आगींत तेल ओततो. वाङ्मयाभिरुचि असलेल्या तरुण प्रेमिकाची वृत्ति क्वचित् किती उतावीळ व संयमशून्य असते हें गडकऱ्यांना दाखवावयाचें असावें. व त्या दृष्टीनें प्रभाकराचें पात्र तंतोतंत स्वाभाविक वठलेलें आहे. पण लतिकेवरची अढळ निष्ठा व धुंडिराजाविषयींची गाढी कृतज्ञता या दोन गुणांच्या-बाबत त्याला नांवें ठेवण्यास जागा नाहीं. या दोन गुणांपुढें त्याचे दोष व त्यामुळें निर्माण झालेलीं वादळें किरकोळ वाटतात. या दोन गुणांनींच त्याला वांचविलें आहे. प्रभाकर हा आपल्या दोषांपासून जेव्हां अलिप्त असतो, त्यावेळचि त्याच्या बुद्धीची चतुराई उठाव घेते व ती कार्य करतांना दिसूं लागते; आणि ही शक्ति त्याला संकटकालीं प्राप्त होते. त्याला अत्यंत प्रिय असलेल्या व्यक्तीवर म्हणजे लतिकेवर व धुंडिराजावर संकट ओढवलें आहे, हें समजतांच त्याच्या

अंगांत वीरश्री संचारते, तो गंभीर होतो, कार्यप्रवण होतो व एकाद्या नायका‑प्रमाणें तो नाटकाचीं सर्व सूत्रें चालवूं लागतो. अशा प्रसंगीं तो लतिका, मनोहर, मालती यांच्याशीं कांहीं बेत करतो व ते चतुराईनें पार पाडतो. शेवटीं देखील घनश्यामच्या विरुद्ध जाणारा पुराव्याचा कागद फाडून टाका ही सूचना धुंडिराजास तो करतो. त्यामुळें नाटकाच्या पूर्वार्धांत तो दुबळा दिसला तरी उत्तरार्धांत एकाद्या नायकाला शोभेल असा कर्तृत्ववान दिसतो. घनःश्यामसारख्याचें शत्रुत्व तो आपल्यावर उतावळेपणानें ओढवून घेतो. पण तो त्याचा प्रतिकार चतुरस्रपणान व निरागस औदार्यानें करतो, हें त्याचें वैशिष्ट्य आहे. नाट्यतंत्राच्या दृष्टीनें त्याला नायक म्हणावयास हवें.

**५ मालती :** ही सौम्य व शांतवृत्तीची असून, गोड स्वभाव, सोशिकपणा व त्यागी वृत्ति यामुळें धुंडिराजाला सर्वथैव शोभणारी अशी सालस कन्या आहे. लग्नाचा जो नकार लतिकेनें फटकळपणानें दिला, तोच ती अगदीं सौम्यपणानें देते यांत आपणांस तिचें स्वभाववैशिष्ट्य दिसतें. तिचें मनोहरावर अढळ प्रेम असतें, पण घनश्यामनें पेच घालतांच ती पित्यासाठीं त्याचा त्याग करण्यास तयार होते. पित्यावर तिची पराकाष्ठेची निष्ठा असते व त्यासाठीं काय वाटेल तें करावयास तयार होणें हा तिचा स्वभावधर्म आहे. हा त्याग करतांना मनोहरला दिलेलें वचन परत घेण्याचीहि ती तयारी दाखविते व त्याला तसें धीटपणानें सांगते. इतर कांहीं संकट असतें तर तिनें त्याला धैर्यानें तोंड दिलें असतें; पण तिच्या प्रेमावरच घाला आला व तोहि सालस पित्याच्या हिताकरतां; म्हणूनच तिनें आपल्या स्वभावधर्मांत गूढरूपानें असलेली त्यागबुद्धि दाखविली. तिचा दुसरा गुण म्हणजे धनेश्वर व लतिका यांच्या मनावर आपल्या व्यक्तिमत्वानें छाप टाकून, ती त्यांचें परिवर्तन घडवून आणते हा होय. विशेषतः स्वभाव‑विषयक परिवर्तन ही कथानकाच्या दृष्टीनें फारच महत्त्वाची असलेली घटना ती घडवून आणते. पण इतकें करून ती फारशी क्रियाशील दिसत नाहीं. लतिकेची जिवलग मैत्रीण, मनोहरची प्रिया व विशेषतः म्हणजे धुंडिराजची निष्ठावंत कन्या असें तिचें तिहेरी स्थान आहे. नाटकांत ती प्रथम दिसते ती घनः‑श्यामची अभिप्रेत वधू म्हणून; नाट्याच्या दृष्टीनें तिचें हें स्थान फार महत्त्वाचें

आहे; पण एकंदरींत सबंध नाटकांत तिची भूमिका दुय्यम दर्जाची आहे. लतिकेच्या तडफदारपणाला अगदीं विरोधी असलेला तिचा सौम्य व शांत स्वभाव पाहून आपल्या मनाला एक प्रकारचें समाधान वाटतें. या सालसपणानेंच ती श्रोत्याची सहानुभूति आपणांकडे ओढून घेते. तिला सर्व नाटकांत दुय्यम स्थान असलें तरी भावबंधनमधील मूळ नाट्याचें बीज ती आहे, हें आपणांस विसरून चालणार नाहीं.

**६ मनोहरः**—मालतीप्रमाणेंच हेंहि दुय्यम दर्जाचें पात्र आहे. मालतीचा प्रियकर, प्रभाकराचा मित्र व धनेश्वराचा आश्रित अशा तिहेरी नात्यांनीं तो नाटकांत वावरतो. पण त्याच्याकडे महत्त्वाची अशी कोणतीच स्वतंत्र भूमिका नाहीं. मालतीवर प्रेम करणें, त्या प्रेमाची शंका येतांच त्याची तिच्याकडून निश्चिति करून घेणें व त्याबद्दल निराशा होतांच हळुवार हृदयानें हळहळणें हें याचें भावबंधन आहे. पुढें प्रभाकराचा मदतनीस म्हणून तो सर्व धागे सुसंगतपणें जुळवतो, पण तोहि स्वतांच्या बुद्धीनें नाहीं. त्यामुळें त्याच्या संबंधीं सहानुभूति वाटली तरी इतकी आत्मीयता वा आकर्षकता वाटत नाहीं. मालतीसारख्या त्यागशील सत्त्वस्थ तरुणीला सर्वस्वी शोभणारा तुल्यबल वर तो वाटत नाहीं. तथापि घनश्यामच्या विरोधी पात्रांत त्याची दुय्यम पात्र म्हणून जरुरी मात्र आहे. त्याला भूगर्भशास्त्राचा विद्यार्थी करण्यामध्यें स्मशानांतील हिरवा दगड ओळ-ण्यापलीकडे त्याचें कांहींहि काम नाहीं; उलट विनोदासाठीं त्याला दगडाच्या जातींत जावें लागलें आहे. पण ही भूमिका त्याच्या स्वभावाची द्योतक नसून गडकऱ्यांनीं त्याच्यावर लादलेल्या कृत्रिम पण सहेतुक भूमिकेची द्योतक आहे. त्यामुळें तो प्रथमपासून शेवटपर्यंत फिकाच वाटतो. गडकरी त्याला नायकाच्या जोडींत स्थान देतात पण तें खरें नाहीं.

**७ धनेश्वर :** लतिकेचा विधुर पिता, मोरेश्वराच्या वडिलांचा भागीदार पेढीवाला व घनश्यामचा धनी या भूमिकेनें तो भावबंधनमधें वावरतांना दिसतो. मनानें प्रेमळ, कर्तृत्वानें लबाड, वृत्तीनें अनिश्चयी, खऱ्याखोट्याचा फारसा विधि-निषेध न बाळगणारा असा हा धनेश्वर घनश्यामाच्या तावडींत आपल्या गुप्त कारवायांनीं सांपडतो आणि मग त्याची मान धुंडिराजाप्रमाणें घनश्यामच्या पुढें

पदोपदीं वाकूं लागते. घनःश्याम त्याचा नोकर, पण धनेश्वराची पापेंच त्याला सारखीं भेडसावतात व तीं सर्व माहित असलेल्या घनश्यामापुढें त्याला शब्द बोलूं देत नाहींत. 'पापी माणसांचीं मुलें त्याच्या कह्यांत रहात नाहींत' याचा त्याला अनुभव येतो व सर्वस्वीं पकडींत सांपडलेला तो, घनश्याम सांगेल तेव्हां व त्या पद्धतीनें उतारवयांतहि लग्न करण्यास तयार होतो; आणि शेवटीं शेवटीं हें लग्न त्याला नको असलें तरी घनश्यामाला पाहिजे असतें, म्हणून होणार असतें. परंतु मालतीसारख्या सत्वस्थ मुलीचा त्याच्या मनावर फार परिणाम होतो. पापी पण प्रेमळ माणसांच्या अंतःकरणाचा एक कोपरा सहृदयतेनें भरलेला असतो. त्याला त्यांनीं कुलूप लावलेलें असतें, परंतु एकाद्यावेळीं तें मालती-सारखीच्या अश्रूंनीं जादूप्रमाणें उघडून, त्यांतून दडलेली सहृदयता आवेगानें बाहेर पडते. धनेश्वराच्या बाबतींत असेंच झालें आहे. त्याची सहृदयता जागी होते व सर्व अनिष्ट गोष्टींचा शेवट करण्यासाठीं तो स्वतःचाच शेवट करण्याचें ठरवितो. कोणत्याहि गोष्टीची उशिरानें जाग येणें हा त्याच्या स्वभावाचा धर्म आहे. पण वाईटांतून चांगलें या दृष्टीनें त्याच्या स्वभावाचा हाच विशेष सुखां-तिकेला पोषक झाला आहे. या सहृदयतेमुळें मालतीजवळ आत्मनाशाचा स्फोट व स्फोटामुळें रक्षण, अशी घटना घडून सर्वांवरचें अरिष्ट टळलें आहे. धुंडिराजाचें पितृप्रेम व मालतीची त्यागी वृत्ति यांनीं त्याच्या जीवनांत क्रांति केली आहे, पण ती होऊं देण्याइतका तो सहृदय आहे हेंच त्याच्या स्वभावाचें रहस्य आहे.

**८ महेश्वर :** आचरट पण धाडसी, पापपुण्याचा विधिनिषेध न बाळगणारा, लग्नासाठीं हुरळून गेलेला व सर्वस्वीं परावलंबी वृत्तीचा असा महेश्वर विनोदी पात्र म्हणून भावबंधनमधें वावरतो. घनश्यामच्या खिशांत जीं अनेक कुलंगडीं व माणसें असतात त्यांतली ही एक अजब चीज आहे ! घनश्यामचा स्वभाव समजण्याइतकें त्याला शहाणपण नाहीं, त्यामुळें त्याच्या थापांना तो भुलतो व आंधळा व मराठी बोलतां न येणारा कानडी गवयी 'कामण्णा' म्हणून धनेश्वराच्या घरांत वावरतो. खोटें आंधळेपण, मराठीची लपवालपवी, लग्नाची आशा व शहाणपणाचा अभाव या चार उणीवांमुळें तो पदोपदीं फसतो आणि इंदू-बिंदूसारख्या काळ्या विवाहातुर मुलींशीं गांठ पडल्यामुळें विनोदाची

खैरात होते. धनेश्वराचे कागद चोरणें हें त्याचें काम व तें करण्यासाठींच त्याची योजना झालेली असते; पण हुरळ्या वृत्तीमुळें तो घनश्यामच्या आहारीं जातो; शेवटीं तो लतिकेच्या सहवासांत वावरतो व घनश्यामनें आपणांस फसविलें हें कळतांच तो लतिकेला जाऊन मिळतो. अपकर्म करण्यासाठीं लतिकेच्या घरांत घुसवून दिलेलें हें पात्र अपकर्म केल्यावर जागृति येऊन सत्कर्माला प्रवृत्त होतें. त्यामुळें महेश्वरानें घनश्यामची बाजू सोडून लतिकेची बाजू घेणें व तिला सर्वस्वीं मदत करणें हें सुखांतिकेला पोषक झालें आहे. त्याचें पक्षांतर होण्यानें गंभीर घटनांचें रूपांतर होण्यास मदत केली आहे. शेवटीं लतिकेसारख्या बुद्धिवान, तल्लख मुलीच्या सहवासांत आल्यावर तो तिच्याशीं लग्न करण्याचा नाद आपण होऊन सोडून देतो, हें त्याला खरें शहाणपण आल्याचें लक्षण आहे. महेश्वरानें केलेलें दुसरें महत्वाचें कार्य, म्हणजे भावबंधन नाटकांत प्रेक्षकांच्या मनाला वेळोवेळीं गंभीर घटनांचा जो ताण बसत गेला आहे, तो त्याच्या विनोदानें सैल झाला आहे, व त्याची प्रेक्षक-प्रियता व नाटकाची रंगत वाढत गेली आहे हें होय. महेश्वर हें "मकरंद, शर्विलक, दुष्यंत व माधव" यांच्या स्वभावांतील उणिवांच्या परिपाकांतून गडकऱ्यांनीं तयार केलेलें, एक अजब रसायन असून मराठी रंगभूमीवरील विनोदी पात्रांतील तें एक अपूर्व व अमर पात्र आहे.

**९ इंदू-बिंदू :** या दोन पात्रांची योजनाहि विनोदासाठींच आहे. त्यांच्या स्वभावांत महेश्वराचा हुरळेपणा, मूर्खपणा व आचरटपणा आहे. लग्नाच्या बाबतींतील त्यांची उल्लू वृत्ती ही महेश्वराच्या स्वभावाशीं जुळती आहे, म्हणून त्यांचें त्यांचें सूत जमतें. पण कांहीं बाबतींत महेश्वरामध्यें असलेला अर्कटपणा त्यांच्यामध्यें नाहीं, त्यामुळें स्त्रीस्वभावाला अनुसरून त्यांची फसगत होते व त्या अधिक हास्यास्पद व त्यांच्या संबंधाचे प्रवेश अधिक हास्योत्पादक होतात. त्यांच्याबद्दल सहानुभूति वाटली तरी ती प्रेक्षकांच्या मनांतून मावळून जाण्यास त्यांचें चोरीसारखें अपकृत्य हेंच कारण आहे. त्या कृतज्ञ वा सत्प्रवृत्त नाहींत, यामुळेंच त्यांच्या तोंडीं शेवटीं घातलेलें "जगांत गुणांची कुठें पारखच नाहीं" हें वाक्य कमालीचें हास्यास्पद होतें. परंतु त्यांच्या स्वभावांतील दोष सुखां-

तिकेला फार उपकारक झाले असून महेश्वराप्रमाणें त्यांनींहि गंभीर घटनांचा ताण सैल करण्यास मदत केली आहे. इंदू-बिंदू हे देखील मराठी वाङ्मयांत 'नमुने' म्हणून नांवारूपाला येऊन अमर झाले आहेत.

**१० मोरेश्वर :** गडकऱ्यांच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे हें नुसतें 'नांवापुरतें' पात्र आहे हें नांव म्हणजे साक्षीसाठीं घनश्यामनें धुंडीराजाच्या कबुलीजबाबावर करून घेतलेली सही व मधूनमधून भागीदारीच्या उल्लेखासाठीं उच्चारलेलें अभिधान होय. तो बावळट व सांगकाम्या असून धनेश्वराचा धनलोभीपणा दाखविण्यासाठीं गडकऱ्यांनीं उभें केलेलें एक नाममात्र बाहुलें आहे. त्याच्या स्वभावांत विशेष कांहीं नसलें तरी श्रीमंत बापाचा बावळट पुत्र एवढी त्याची भूमिका धनेश्वर, लतिका व घनश्याम यांची बुद्धि विचलित करण्यास पुरेशी आहे. हें पात्र स्वतः रेखीव स्वभावाचें नसलें व तें नांवापुरतेंच असलें, तरी घनश्याम, धनेश्वर व लतिका यांच्या स्वभावांतील सूक्ष्म रेषा समजण्यासाठीं त्याच्या नांवाचा उल्लेख करण्यास एक बुजगबाहुलें म्हणून फार उपयोग होतो.

## वातावरण पात्रप्रधान कीं कथानकप्रधान ?

पात्रांचे हे स्वभाव लक्षांत घेतल्यानंतर गडकऱ्यांच्या मनांत प्रथम कोणत्या गोष्टी निर्माण झाल्या याची कल्पना येते. त्यांच्या मनांत 'कॉमेडीचा जर्म' पडल्याबरोबर एक 'पक्का व्हिलन' व 'एक भाबडा म्हातारा' यांच्या मूर्ती त्यांच्या डोळ्यापुढें उभ्या राहिल्या आणि नंतर लतिका, धनेश्वर, प्रभाकर, मनोहर, मालती, महेश्वर, इंदु-बिंदु व मोरेश्वर हीं पात्रें निर्माण होत गेलीं; अर्थात् सर्वच पात्रें एकदम डोळ्यापुढें प्रथम उभीं राहिलीं नसतील; पण घनश्याम, धुंडिराज, मालती, लतिका, प्रभाकर, मनोहर एवढी सामुग्री तरी त्यांच्या मनांत नंतर प्रथम उद्भूत झाली असेल, आणि याच पात्रांच्या अनुषंगानें व कथानकाच्या धोरणानें बाकीचीं पात्रें निर्माण झाली असतील. पण त्यांची जुळणी व रचना 'एक चटकदार व सुंदर कॉमेडी' लिहावयाची या धोरणानें झालेली आहे. हे स्वभावविशेष आधी निर्माण होणें किंवा ते तसे रेखीवपणानें दाखविणें हा पात्रप्रधान सुखांतिकेचा (Comedy of characters) एक

महत्त्वाचा भाग आहे. यामुळेंच गडकऱ्यांनीं जे स्वभावविशेष निर्माण केले ते आज मराठी वाङ्मयांत नमुने म्हणून अमर होऊन राहिले आहेत.

मनुष्य हा पूर्णतेला पोंहोचलेला प्राणी नाहीं. प्रत्येकजण कुठें तरी अपुरा असतोच. प्रत्येकामधें कांहींना कांहीं उणीव असते. स्वभावांतील या उणीवेकडे सुखांतिकेच्या दृष्टीनें पाहावयास एक विशेष दृष्टि लागते. गडकऱ्यांच्या ठिकाणीं ही दृष्टि सूक्ष्म होती व त्या दृष्टीनें त्यांचा अभ्यास सखोल होता. सुखांतिकेला पोषक असें वातावरण उत्पन्न करण्यासाठीं या उणीवेकडे त्यांनीं सुखांतिका व विनोद या दोन दुर्बिणींतून पाहून त्यांचें रेखाटन केलें आहे. सुखांतिका हें साध्य व विनोद हें साधन ही दृष्टी ठेवल्यान बहुतेक पात्रांवर त्यांना विनोद करतां आला आहे. धुंडिराज गोष्टीवेल्हाळ म्हणून, लतिका फटकळ म्हणून, प्रभाकर उतावळा म्हणून, मनोहर दगडाचा विद्यार्थी म्हणून आणि महेश्वर, इंदू-बिंदू तर काय मूर्ख म्हणून त्यांनीं नाटकांत सुखांतिकेचें खेळकर वातावरण निर्माण केलें आहे. एवढेंच नव्हे तर गंभीर स्वभावाच्या घनश्यामालाहि धुंडि-राजाच्या पकडींत ठेवून पहिल्या अंकाच्या पहिल्या प्रवेशांत व पुढें महेश्वर-सारख्या इरसाल पात्राची गांठ घालून देऊन, त्यांनीं त्यांच्या करवींहि विनोदी व खेळकर वातावरण निर्माण केलें आहे.

दुसरी एक गोष्ट विशेष नजरेस येते ती ही कीं, प्रत्येक पात्र आपल्या स्वभावानुसार सुखांतिकेच्या ध्येयाकडे आपोआप मार्ग क्रमितांना दिसतें. त्यांच्या हातून होणाऱ्या चुका व त्यांच्या स्वभावांतील उणीवा या निरनिराळ्या प्रसंगांनीं व घटनांनीं सुखांतिकेचा परिपोष करीत चालल्या आहेत, हें आरंभापासून शेवटपर्यंत कथानक सूक्ष्मपणानें न्याहाळीत गेलें म्हणजे लक्षांत येतें. प्रथम विनोदी वातावरण, सर्व पात्रांची ओळख, पुढें हासत हासत घनश्यामला टोले, पुढें महेश्वराचे विरह, या प्रमाणें आरंभ रंगलेला आहे; मध्यंतरीं गंभीर झालेलें वातावरण महेश्वर, इंदू-बिंदू यांच्या प्रवेशांनीं दुःखानंतरच्या सुखाप्रमाणें खेळकर वाटतें; व शेवटीं उलगडा होत जातो, म्हणून सुखांतिकेचें पुसट चित्र दिसूं लागतें. मध्यंतरीं घनश्यामच्या कारवाईमुळें जें एकदम गंभीर वातावरण उत्पन्न

होतें त्याची सुखांतिकेला कलेच्या दृष्टीनें फार जरूरी असते. त्यांत प्रेक्षकांच्या मनाला हसवीत असतांनाहि मधून मधून गंभीरतेचे धक्के देऊन आंदोलित करण्यानें विनोदी वातावरणाला एक सुंदर पार्श्वभूमि तयार केल्यासारखें होतें. त्यामुळें विनोदी व गंभीर या वातावरणांचा आलटून पालटून चाललेला हा खेळ शेवटपर्यंत रसपूर्ण व म्हणूनच सुसह्य होतो.

पण गडकऱ्यांची ही सुखांतिका केवळ पात्रप्रधान नाहीं. तींत कथानक-प्रधानतेचेंहि मिश्रण झालें आहे. भावबंधनमध्यें स्वभावविशेष जितके उठावून दिसतात तितकेंच कथानकहि गुंतागुंतीचें व रंजक झालेलें दिसतें; आणि यामुळेंच त्यांत मोलियर व शेक्सपीयर यांच्या पद्धतीचें मिश्रण झालें आहे असें वाटतें. मोलियरच्या पद्धतींत *पुढील गोष्टींचें चित्रण झालेलें आढळतें :— ( १ ) स्वभाव-दोषांतील विनोदी भाग ( २ ) नीतितत्त्वांच्या अतिरेकांतील विनोदी भाग ( ३ ) चुकांमुळें उत्पन्न होणारा विनोदी भाग ( ४ ) नैसर्गिक नीतितत्वांचें दर्शन ( ५ ) किंचित प्रहसनाची छटा आणि ( ६ ) प्रहसनांतून निर्माण होणारें हास्य. मोलियर साधारणपणें या सहा तत्त्वांचा अंगिकार करून

---

* Moliere :—(1) Comic in character (2) Comic in character as the hypertrophy of moral trait common. (His comic characters are not group representatives; they speak for all sorts and conditions of man.) (3) His treatment of comic fault. (a) In general his method is one of conrast. The aberration of the central figure is sharply outlined agaist a background of social normality. (b) Again there is a contrast of reality with unreality in this very opposition of social and anti-social characters. (4) Natural morality. (5) The admixture of farce. (6) Finally there is the laughter. It has come to him out of farce. It has resonance, body and wholeheartedness. ('The Nature of Comedy' by W. Smith. Pages 123–130).

आपलें नाटक सजवीत असतो. शेक्सपीयरच्या सौंदर्यवादी सुखांतिकेंत ‡ पुढील गुण असलेले आढळतात :—( १ ) कथानकप्राधान्य ( २ ) स्वैर कल्पना-शक्तीचा खेळ ( ३ ) ध्येयप्रवण वा काव्यात्म प्रेम व ( ४ ) सहृदय विनोद. या चार मुख्य तत्त्वांचें दर्शन तो आपल्या सुखांतिकेंतून करीत असतो. यांमधें एकजण स्वभावदोषामुळें उत्पन्न होणाऱ्या विनोदी चित्रणाला महत्त्व देतो, तर दुसरा कथानकाच्या गुंतागुंतीला महत्व देतो. गडकऱ्यांनीं या दोन्ही गोष्टींचा उपयोग आपल्या नाटकांत केलेला आहे. भावबंधनांतील त्यांनीं निर्माण केलेलीं पात्रें स्वभावदोषामुळें विनोदी होतात व बोलतां चालतांना वा क्रिया करतांना तीं आपलें स्वभावदर्शन घडवितात. त्यांना स्वतःचें असें कांहीं स्वभाववैशिष्ट्य आहे, पण तें कांहीं स्वाभाविक उणीवांनीं डागळलेलें आहे; आणि गडकऱ्यांनीं नेमक्या याच उणीवा पकडून त्यांचा नाटकांत हास्योत्पादनासाठीं उपयोग केला आहे. उतावळा व वेळींअवळीं वाङ्मयीन उपमांची खैरात करणारा प्रभाकर, फटकळपणानें कुठेंहि व कुणालाहि बोलून हास्यास्पद होणारी लतिका, फाजील पाल्हाळ व विसराळूपणा यांनीं विनोदास्पद होणारा धुंडिराज, अविवाहित स्थितींत विरहव्याकुळ होणारा महेश्वर, बावळट मोरेश्वर वा विवाहातुर इंदु बिंदु

‡ Shakespeare's Romantic comedy :—

(1) It is first of all a comedy of plot-interest. (2) It abandons a setting of familiar reality for one freely imaginative. (3) The plot is one of idealised love-interest. You have here no clash of character on social environment, only a tale of a true love disturbed that finds a happy ending because of obstacles overcome. (4) It distinguishes itself from all the other comedy by a modification of the laughter tone that reflects a new development in the meaning of the word "humour"... It is in Shakespeare's romantic comedy that a feeling of human warmth first finds its way into common laughter; there for the first time on the English stage, sympathy is generated by the ridiculous together with laughter. ("The Nature of Comedy" by W. Smith. Pages 142-143 ).

हीं सर्व पात्रें स्वभाववैशिष्ट्यानें व स्वभावदोषानें ठळकदार झालेलीं आहेत. त्याचप्रमाणें तीं ज्या कथानकांतून वावरतात तें आरंभापासून शेवटपर्यंत गुंतागुंतीचें झालें आहे. इतकेंच काय पण शेवटपर्यंत या सर्वांचें नक्की पर्यवसान काय होणार याची कल्पना येत नाहीं. सुखांतिक शेवट होईल अशी एक अंधुक कल्पना असते, पण वाटेंत धक्के, आंदोलनें किंवा हादरे इतके बसतात कीं चढउतारांतून जाणाऱ्या गाडीच्या चाकाप्रमाणें कथानक एकदां या कलावर व पुन्हां त्या कलावर कलतांना दिसतें. या दृष्टीनें पाहातां मोलियर व शेक्सपीयर यांच्या पद्धतींचें मनोहर मिश्रण भावबंधनामधें कसें झालें आहे त्याची कल्पना येते.

धुंडिराज, घनश्याम, प्रभाकर यासारखीं पात्रें थोर नीतितत्त्वांचा अंगिकार करतांना दिसतात व तीं प्रेक्षकांवर परिणाम करतांनाहि दिसतात. धुंडिराजची मुलाबाळांवरील उत्कट ममता किंवा सच्चेपणानें चालण्याचें शील, घनश्यामची निरपेक्ष दयेची भूक, व प्रभाकरचें काव्यात्म प्रेम या गोष्टींचें निर्मळ दर्शन आपणांस होतेंच; पण त्या त्या पात्रांनीं आपल्या अंगीं असलेल्या इतर दोषांनीं त्यांना अतिरेकी स्वरूप प्राप्त करून दिलें आहे; त्यामुळें त्यांतून विनोदहि निर्माण झाला आहे. डोळ्यापुढें सुखांतिकेचें ध्येय असल्यानें गंभीर व विनोदी स्वभावांचें हें मिश्रण उपकारकच ठरतें. तसेंच प्रभाकर हा जात्या वाङ्मयाचा विद्यार्थी व घनश्याम हा बुद्धिवान असल्यानें त्यांच्या भाषणांतून आपणांस कितीतरी पल्लेदार कल्पना किंवा विनोदगर्भ उत्प्रेक्षा निर्माण होतांना आढळतात. क्वचित् या पात्रांच्या करवीं गडकरीच बोलताहेत असें वाटतें व त्यांच्याच स्वैर कल्पनाशक्तीचा हा खेळ चालला आहे, असा भास होतो.

भावबंधनांत चुकांमुळें उत्पन्न होणाऱ्या विनोदी स्थळांचीं उदाहरणें हवीं तेवढीं सांपडतील. महेश्वर, इंदु-बिंदु, घनश्याम, प्रभाकर-लतिका यांनीं थोड्या थोडक्या चुका केल्या नाहींत. क्षणभर संभवतेचा निकष बाजूला ठेवला तरी या पात्रांनीं केलेल्या चुकांमुळेंच कथानक गतिमान व विनोदी होत गेलें आहे. नैसर्गिक नीतितत्त्वांचें उत्तम दर्शन आपणांस मालती, धनेश्वर, धुंडिराज व घनश्याम यांच्या उद्गारांत घडतें. त्यांतहि आचाराचा आदर्श म्हणजे मालती व धुंडिराज

हेच आहेत. मोलियरच्या पद्धतीचीं शेवटचीं दोन तत्त्वें भावबंधनांत कांहीं प्रमाणांत दिसतात; आणि त्या बाबत संयम राखल्यानेंच भावबंधनाचें स्वरूप प्रहसनात्मक झालेलें नाहीं. महेश्वर, इंदु-बिंदु यांचे कांहीं प्रवेश व गिरसप्पा इंदू-बिंदूंचे प्रवेश यांनीं कथानकाची पातळी जरी थोडी खाली गेल्यासारखी वाटली तरी एकंदरींत गडकऱ्यांनीं फारच संयम राखलेला आहे यांत शंका नाहीं.

प्रभाकर व लतिका किंवा मालती व मनोहर यांचें काव्यात्म प्रेम हा नाटकांतील एक महत्त्वाचा भाग आहे. 'भावबंधन' या शब्दांत गडकऱ्यांनीं ज्या अनेक कल्पना खेळविल्या आहेत त्यांतील हें काव्यात्म प्रेम ही एक आहे व इथें शेक्सपीयरच्या तत्त्वाचें वा पद्धतीचें तंत्र साहजिकपणें उतरलें आहे. त्याचप्रमाणें धुंडिराज वा प्रभाकर यांचा विनोद कसा असतो याची आपणांस कल्पना येते.

मोलियर किंवा शेक्सपीयर यांचीं हीं तंत्रें गडकऱ्यांच्या या नाटकांत तंतोतंत उतरलीं आहेत असा या म्हणण्याचा भाग नाहीं; किंवा त्यांचें त्यांनीं बुद्ध्या अनुकरण केलें असेंहि यांत म्हणावयाचें नाहीं. थोर सौंदर्यवादी नाटककार आपला मार्ग निराळ्या तऱ्हेनें काढीत चालला कीं, त्यांतून श्रेष्ठ प्रतीचें तंत्र किंवा निराळी वाट कशी पडत जाते तेंच प्रामुख्यानें दाखवावयाचें आहे. मग कदाचित् हें तंत्र अभ्यासामुळें आलें असेल, कोल्हटकर, खाडिलकर, यांच्या पद्धतींतून आलें असेल किंवा स्वतंत्रपणेंहि आलें असेल. कसेंहि असलें तरी गडकरी या बाबतींत स्वतंत्र प्रज्ञेचे, श्रेष्ठ व सौंदर्यवादी नाटककार वाटतात व त्यांची उच्च दर्जाची प्रतिभा त्यांच्या कलाकृतींतून दिसते हें खास.

## प्रमाणबद्धता व पार्श्वभूमि

'एका पक्क्या व्हिलनच्या तावडींत एक सालस म्हातारा सांपडला आहे' एवढा 'जर्म' जरी गडकऱ्यांच्या मनांत 'पडला' असला, तरी गडकऱ्यांची प्रतिभा कांहीं तेवढ्यावर विसंबून राहिली नाहीं. तिनें आपल्या शक्तीनें आणखी अनेक पात्रें निर्माण केलीं; पण हीं पात्रें वाटेल तशीं निर्माण केलीं नाहींत. या पात्रांच्या निर्मितींत व जुळणींत तिनें कांहीं प्रमाणबद्धता

ठेवली आहे. घनश्याम हें मध्यवर्ति पात्र कल्पिलें तर त्याच्या मदतीस दोन बाजूला महेश्वर व मोरेश्वर हीं दुय्यम पात्रें आहेत. घनश्यामप्रमाणेंच परंतु त्याच्यापेक्षां किती तरी उच्च वातावरणांत असलेला धुंडिराज निर्माण करतांना त्याच्या बाजूला तिनें प्रभाकर व मनोहर हीं पात्रें त्याचा तोल सावरण्यास ठेवलीं आहेत. आणि खालच्या वातावरणांत वाढलेला धनेश्वर निर्माण करून त्याचा तोल सावरण्यास लतिका व मनोहर ही दोन पात्रें त्याच्या बाजूला उभीं करून ठेवलीं आहेत; इंदू बिंदू हीं पात्रें त्याच ठिकाणीं असलीं तरी तीं विशेष महत्त्वाचीं नाहींत. या प्रभावळीचें पृथक्करण केलं म्हणजे असें दिसून येतें कीं, घनश्यामनें उत्पन्न केलेल्या कटकटीमुळें जेव्हां धुंडिराज, धनेश्वर, लतिका, मालती यांवर कांहीं अनिष्ट प्रसंग आला, त्या वेळीं प्रभाकर व मनोहर यांचा उपयोग झाला आणि मग लतिका व मालती हीं पात्रें त्यांना मिळाल्यानें धनेश्वर व धुंडिराज यांचे तोल सांवरले गेले. पण घनश्यामचा गेलेला तोल सांवरण्यास त्याच्याजवळ शेवटीं कुणीच राहिलें नाहीं. महेश्वर परधार्जिणी झाला व मोरेश्वर ‘ नांवापुरतेंच पात्र ’ म्हणून राहिला. शेवटीं धुंडिराजानें व अंशतः प्रभाकरनें म्हणजे त्याच्या विरोधी पक्षांतील पात्रांनीं त्याचा तोल सावरून त्याच्या मनांत जागृति निर्माण केली. सत् पात्रांचा गेलेला तोल सावरला जाणे व असत्पात्रांना सत् पात्रांनीं वर ओढून आपल्या पातळींत आणणें या घटना खात्रीनें सुखांतिकेला शोभण्यासारख्या व पोषक होण्यासारख्या आहेत. विशेषतः हीं पात्रें ज्या तऱ्हेनें नाटकांत बसविलीं आहेत, तींत एक प्रकारची सौंदर्यपूर्ण प्रमाणबद्धता आहे.

प्रमाणबद्धतेप्रमाणेंच कांहीं पात्रांचा एकमेकांस पार्श्वभूमि म्हणून फार उपयोग झाला आहे. घनश्याम तीव्र बुद्धीचा तर महेश्वर सांगकाम्या, घनश्याम दुष्ट तर धुंडिराज सर्वस्वीं सुष्ट व धनेश्वर मधेंच जरा बिघडलेला सुष्ट; हीं तिन्ही पात्रें एकमेकांच्या पार्श्वभूमीवर फार शोभून दिसतात; त्याचप्रमाणें लतिका तडफदार, फटकळ, तर मालती अबोल व शांत; प्रभाकर-मनोहर यांची जोडीहि अशीच आहे. प्रभाकर उतावळा तर मनोहर धिमा. इतकेंच नव्हे तर प्रभाकर-लतिका ही जोडी व मनोहर मालती ही जोडीदेखील अन्योन्यांच्या पार्श्वभूमी-

वर सजून दिसते. नाटकाची अशी प्रमाणबद्धता व पार्श्वभूमीची कल्पना मनांत ठेवून रचना केल्यानें, पात्रांच्या दृष्टीनें नाटकाचें शिल्प उठावदार झालें आहे व या बाबतींत गडकऱ्यांच्या प्रतिभेंतील कलासामर्थ्य प्रशंसनीय वठलें आहे.

## काव्यात्म प्रेमाची भूमिका

'भावबंधन'मधील भावबंधन हें गडकऱ्यांच्या मनांतून सहजासहजीं निर्माण झालेलें नाहीं. तो गडकऱ्यांच्या प्रतिभेचा एक मनोज्ञविलास असला तरी हें नाटक जन्मास येण्याच्या काळांतील किंवा त्यापूर्वीची सामाजिक परिस्थिति व वाङ्मयीन निर्मितींनीं निर्माण केलेली आकांक्षा यांचा तो सहज-संभव परिपाक आहे. त्याला गडकऱ्यांच्या मुखानें वाचा फुटली, व ती फुटणें हेंच नैसर्गिक व क्रमप्राप्त होतें. यापूर्वीं हरिभाऊ आपट्यांनीं कादंबऱ्यांतून अनेक सामाजिक गोष्टींचें चित्रण केलें होतें व नवीन नवीन कल्पनांचें व नवीन तऱ्हेच्या कल्पनांचें दिग्दर्शन करून नवीनाविषयीं प्रीति उत्पन्न करून ठेवली होती. त्यांत प्रो. वा. म. जोशी यांनीं 'रागिणी' कादंबरी लिहून व विशेषतः उत्तरा व रागिणी ही पात्रें निर्माण करून प्रेमविवाहाची कल्पना तरुणांच्या मनांत उत्पन्न केली होती; परंतु या सर्व पात्रांच्या भोवतीचें वातावरण अजून जुनेंच होतें. महाविद्यालयांत अजून फारशा मुली गेलेल्या दिसत नव्हत्या व त्यांच्यामध्यें खेळकर वातावरण, परस्पर सहवास, सहवासजन्य प्रेम या गोष्टी नव्हत्याच नव्हत्या. परंतु या नवीन जीवनाच्या आकांक्षांची बीजें या वेळच्या समाजाच्या मनांत निश्चितपणें रुजली होती. वडील पिढी जुन्या मताची होती व स्त्रिया शिकून धीट झालेल्या नव्हत्या, अशा स्थितींत प्रेमविवाह व्हावे असें वाटत होतें, पण तें व्हावयास वा घडून येण्यास संधि मिळत नव्हती. अशा स्थितींत भावबंधन नाटकाच्या विषयाचा परिपाक झाला आहे. भावी कालांत जें पुष्कळसें अविरोधपणें घडलें किंवा ज्याचा प्रामुख्यानें पुरस्कार केला गेला किंवा ज्यांचें चित्रण पुढें कादंबरीकारांच्या कादंबऱ्यांतून किंवा रविकिरणमंडळाच्या कवितांतून आलें, त्या 'काव्यात्म प्रेमाचें' चित्रण इतक्या धडाडीनें गडकऱ्यांनीं प्रथम केलें व तो त्यांच्या मनाचा, तसाच परिस्थितीचा सौंदर्यवादी परिपाक होता. सामाजिक

मनांतून वर आलेली ती एक उबळ होती. जें व्हावें, जें असावें, ज्यामुळें जीवनांत नावीन्य येईल व संसारांत गोडी येईल असा तो एक सुशिक्षित समाजांतील मनाचा आदर्श 'भाव' होता व त्याच्याच 'बंधनांनीं' प्रभाकर-लतिका व मनोहर मालती हीं जखडलीं गेलीं; आणि जेव्हां या नाजूक धाग्यांना ताण बसूं लागला, त्या वेळीं त्यांचे जीव कासावीस होऊं लागले. प्रभाकर-लतिका किंवा मालती-मनोहर यांच्या प्रेमाची आदर्शता किंवा धीटपणा हा समाजांत नव्हता, पण तो समाजाला हवा होता आणि रागिणीच्या जन्मकालापासून ही धुगधुग समाजाच्या मनांत एकसारखी वागत होती. तिचें पोषण गडकऱ्यांनीं व रेंदाळकरादि कवींनीं कवितांतून केलें व 'भावबंधनाच्या' रूपानें आकारवून गडकऱ्यांनीं तें रंगभूमीवर उभें केलें. गडकऱ्यांच्या नावीन्यशील वृत्तीचा हा एक भरभक्कम पुरावा आहे. शिवाय चांगल्या वाइटांचें यथार्थ चित्रण व सार्वकालीन शाश्वत विषय या दोन गोष्टींमुळें या नाटकानें लोकांच्या वृत्तीस अचुक आवाहन केलें व म्हणूनच तें लोकप्रिय झालें. विकासशील समाजाच्या मनाचा हा टप्पा व त्याचें हें चित्रण समाजशास्त्राच्या इतिहासांत फार महत्त्वाचें आहे.

## भावबंधनांतील विनोद

गडकऱ्यांच्या विनोदाविषयीं निरनिराळ्या लेखकांनीं निरनिराळीं मतें प्रदर्शित केलीं आहेत. इथें फक्त भावबंधनांतील विनोदाविषयींच विचार करावयाचा आहे. तथापि विनोदाचें मूळ अधिष्ठान लक्षांत घेतल्यास हे मतभेद होण्याचें कांहींच कारण नाहीं. गडकऱ्यांच्या प्रतिभेचा तो जसा एक अत्यंत चटकदार पैलू होता, हें खरें, तसेंच तो शास्त्रीय निकषावर चमकून उठावदार दिसणाराहि एक कस होता हें कबूल करणें प्राप्त आहे. हास्यविनोद हा त्यांच्या नाटकाचाच अंगभूत भाग होता असें नव्हे, तर तो त्यांच्या जीवनाचा किंवा ज्या घडणीनें त्यांचें मन घडलें होतें तिचाच एक भाग होता. समुद्राच्या पृष्ठभागावर लाटा उसळणें हें जसें नैसर्गिक आहे किंवा जितकें अपरिहार्य आहे तितकेंच गडकऱ्यांच्या मनांत हास्यकल्लोळ निर्माण होणें हें नैसर्गिक किंवा अपरिहार्य होतें. याला अनेक कारणें होतीं. त्यांना विनोदबुद्धीची ईश्वरी देणगी

होती, तीवर त्यांच्या व्यासंगाचे व सूक्ष्मनिरीक्षणाचे संस्कार झाले होते व ती श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांसारख्या अस्सल गुरुंच्या तालमींत खेळून तयार झालेली होती. त्यामुळेंच शिष्यानें प्रसंगीं गुरूवरहि ताण केली, असें देखील म्हणावेंसें वाटतें.

गडकऱ्यांनीं आपल्या सर्व नाटकांत या विनोदबुद्धीचा विलास खेळवून दाखविला आहे. प्रेमसंन्यासांतील गोकुळ, पुण्यप्रभावांतील कंकण, किंकिणी, नूपुर, एकच प्याल्यांतील तळीरामादि मंडळी किंवा भावबंधनांतील महेश्वर, इंदू-विंदू व धुंडिराज, प्रभाकर, लतिका हीं पात्रें त्यांच्या प्रतिभेच्या श्रेष्ठतेचे पुरावेच आहेत. भावबंधन ही मूलतःच सुखांतिका आहे. या सर्व पात्रांची करामत विशेष रंगलेली दिसते. गडकऱ्यांना धुंडिराज प्रथम दिसला असेल तो खात्रीनें दुहेरी स्वरूपांत दिसला असला पाहिजे. एक सालस म्हातारा, पण कांहीं स्वभाव-दोषांमुळें हास्यास्पद होणारी अशीच त्याची भूमिका त्यांना दिसली असली पाहिजे. नाहींतर त्याचें चित्रण त्यांनीं असें केलें नसतें. गडकऱ्यांच्या सूक्ष्म-दृष्टींतून माणसांचे हास्यास्पद होणारे दोष सुटण्यासारखे नव्हते. त्यामुळें त्यांनीं धुंडिराज निर्माण करितांना आपली सर्वंकष चोखंदळ दृष्टि वापरून एक अलौ-किक मनुष्यस्वभाव निर्माण केला आहे. विनोदास विसंगति हें अधिष्ठान व सदभिरुचि व सहृदयता या दोन मर्यादा, एवढें तंत्र लक्षांत घेतल्यावर, धुंडिराज हें पात्र त्या चौकटींत उत्कृष्टपणें बसतें. इंग्रजींत 'Humour' या शब्दामध्यें जो अर्थ आहे व त्याच्या भोंवतीं ज्या कल्पनांचें वलय आहे त्यांत हें पात्र यथार्थतेनें शोभून दिसतें. धुंडिराज हें पात्र प्रमुख असल्यानें तें पुढें घडणाऱ्या घटनांच्या अनुषंगानें विनोदी राहूं शकलें नाहीं; पण जेथपर्यंत तें विनोदी पात्र म्हणून वावरतें तेथपर्यंत त्यानें निर्माण केलेली सृष्टि खेळकर, रसपरिपोषक व निर्मळ विनोदानें भरली आहे असें दिसतें. वास्तविक स्वभावधर्मदृष्ट्या घनश्याम व धुंडिराज म्हणजे दोन टोकें; पण पहिल्या अंकाच्या पहिल्या प्रवेशांत त्यांनीं निर्माण केलेला विनोद केवळ भावबंधनांतच नव्हे तर, मराठी वाङ्मयांत 'उत्कृष्ट नमुना' म्हणून श्रेष्ठपद मिळवून बसला आहे. त्याचा भोळेपणा, त्याचा विसराळूपणा, त्याचा पाल्हाळ, त्याचें विषयांतर या सर्व गोष्टींतून

भरगच्च विनोद निर्माण होऊनही त्यानें प्रेक्षकांची सहानुभूति गमावली नाहीं. प्रेक्षकांना त्याच्यासंबंधीं विलक्षण सहृदयता वाटते हीच त्याच्या यशस्वितेची खूण आहे.

धुंडिराजच्या खालोखाल निर्मळ विनोद प्रभाकर-लतिका यांच्या विरोधी प्रेमांतून निर्माण झाला आहे. कोट्या सुचूं लागल्या व विनोदसागराला एकदां भरती येऊं लागली, म्हणजे बाजूचा किनारा ढांसळतो काय हें ग्रंथकाराला दिसत नाहीं. तरीदेखील गडकऱ्यांनीं या पात्रांच्या बाबतींत पुष्कळ संयम दाखविला आहे. एक दोन अतिरेकी कोट्या सोडल्यास लतिका-प्रभाकर यांचे खटके म्हणजे विनोदाची खैरात व रसाचा परिपोष आहे. यांतील विशेष उल्लेखनीय गोष्ट ही कीं गडकऱ्यांनीं या दोघांचे स्वभावदोष, त्यांच्या अभिरुचि व त्यांची परिस्थिति यांचा फायदा घेऊन त्यांतून विनोद निर्माण केला आहे. गिरसप्पाच्या विनोदाला त्यांनीं वेषांतर व भाषादोष हीं बाह्य साधनें तरी हाताशीं घेतलीं आहेत. पण प्रभाकर—लतिका यांच्या भांडणाला केवळ मनुष्यस्वभाव याखेरीज कसलाहि आधार नाहीं; त्यामुळें त्यांनीं अधिक अवघड पण अधिक सहजरम्य करामत करून दाखविली आहे. पात्रांच्या स्वभावांतच विनोदाचें बीज पकडल्यावर मग प्रसंग किंवा भाषा हीं दुय्यम दर्जाचीं ठरतात. 'प्रभाकर व लतिका हीं उगाच भांडतात' अशी कांहींची तक्रार आहे; तेंच विनोदाचें बीज आहे. तीं अकारण भांडतात म्हणूनच त्यांना विनोदांत स्थान आहे. शिवाय प्रसंग पडतांच इच्छित कार्यासाठीं तीं पुढें एक होतात, सगनमत करतात या भूमिकेमुळें तर त्यांच्या विनोदाला उठाव मिळतो व वाचकांचें वा प्रेक्षकांचें लक्ष तीं वेधून घेतात.

महेश्वर, इंदु व बिंदु या पात्रांची प्रत वराल पात्रांच्या खालीं लागते. आणि त्या पात्रांचें कार्य, त्यांची बुद्धि (?) व योग्यता हीं पाहिल्यावर तें योग्यच आहे असें वाटतें. यांपैकीं कांहीं पात्रें जरूरच होतीं का, हा प्रश्न घटकाभर डोळ्याआड केला, तर त्यांच्यामुळें नाटकांत निर्माण झालेला विनोद सुखांतिकेला, विशेषतः मधेमधे बसलेला ताण ढिला करण्यास फार उपयोगी पडला आहे. कांहीं प्रवेशांत घटना थोडी व तीहि अगदीं प्रवेशाच्या शेवटीं

होणारी किंवा उल्लेखिलेली असें असलें, तरी त्या प्रवेशांत त्यांच्या संवादांतून निर्माण होणारा विनोद आपणांस रिझवतो इतकेंच नव्हे तर हवाहवासा वाटतो. खरें म्हणजे हीं पात्रें कांहीं जीवनाचा गंभीरपणानें विचार करणारीं माणसें नाहींत. आपल्या मूर्खपणाच्या तालांत तीं वेडीवाकडीं, सुचेल तशीं नाचत चाललेलीं आहेत. त्यांत कुणाचें बरें झालें वा वाईट झालें, तरी त्याचा त्यांना विधिनिषेध नाहीं. त्यामुळें व त्यांच्या वृत्तीमुळें निर्माण झालेल्या हलक्या दर्जामुळें त्यांच्या विनोदांत आचरटपणाचे निरनिराळे नमुने आले असल्यास नवल नाहीं. पण त्यांच्या विनोदांत चांगला भाग पुष्कळ व प्रहसनात्मक भाग थोडा असें मिश्रण आहे हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे. सुखांतिकेला विशेषतः मोलियरच्या पद्धतीच्या सुखांतिकेला या प्रहसनात्मक विनोदाची जरुरी असतेच याचा उल्लेख मागें आला आहे, ही गोष्ट लक्षांत घेतल्यास या विनोदाचें निराळें समर्थन करण्याची जरुरी नाहीं. शिवाय उच्च पातळींतील पात्रें जो विनोद करतात तो नाटकगृहांतील सर्वांनाच समजतो असें नाहीं. त्या दृष्टीनें सर्वांच्या आटोक्यांत येणाऱ्या विनोदाची आवश्यकता असतेच. तें काम महेश्वर व इंदु-बिंदु यांनीं उत्तम बजावलें आहे. इथें देखील गडकऱ्यांनीं आपला विनोद प्रथम स्वभावांतून, नंतर प्रसंगांतून व नंतर भाषेंतून निर्माण केला आहे. बाह्य किंवा कृत्रिम साधनांचा त्यांनीं कुठेंहि उपयोग केला नाहीं, हेंच त्यांच्या श्रेष्ठ विनोदबुद्धीचें लक्षण होय.

मोरेश्वर हें अगदीं निकृष्ट दर्जाचें विनोदी पात्र आहे. त्याचा विनोद त्याच्या स्वभावापेक्षां मूर्खपणाच्या हालचालींतून व बाह्य आचरटपणाच्या क्रियांतून निर्माण झाला आहे. पण हें नाटकांत 'नांवापुरतेंच' पात्र असल्यानें त्याची दखल घेण्याची आवश्यकता आहे असें वाटत नाहीं.

गडकऱ्यांच्या या नाटकांतील विनोदानें जें श्रेष्ठ कार्य साधलें आहे, त्याचें सविस्तर विवेचन करण्यापेक्षां, एका इंग्रजी लेखकाच्या उताऱ्यानेंच तें कार्य होईल असें वाटतें. तो म्हणतो—

"Humour is dissolvant of action and in a comedy we want action. There is bound to be, in comedy, a mixture of humour & something which is not humour.

Comedy should have a light and laughing aspect as well as a more serious one."

घनश्यामनें धुंडिराज व लतिका यांच्या छळाच्या रूपानें प्रेक्षकांना दिलेला ताण व विनोदी पात्रांच्या रूपानें त्याचा झालेला निरास हीं दोन विरोधी तत्त्वें या सुखांतिकेंत कशासाठीं आलीं आहेत हें वरील उतारा वाचल्यावर निराळें सांगणें नको. उलट गडकऱ्यांचें विनोदी लेखकांतील श्रेष्ठ स्थान त्यांनीं आढळच झाल्याचें दिसेल.

## गडकऱ्यांची भाषा

गडकऱ्यांची भाषा अनन्यसाधारण आहे. ती त्यांच्या व्यक्तिमत्वांतून व अभ्यासांतून स्वयंभूपणें निर्माण झालेली आहे. डोंगरांतून निघणाऱ्या नदीप्रमाणें ती ओघवती असून, तीमध्यें डोंगराच्या व सपाट प्रदेशाच्या अंतरंगांतील सर्व गुणधर्म सांठवलेले आहेत. तिचें अनुकरण करितां येणार नाहीं. ज्यांनीं ज्यांनीं तो प्रयत्न केला ते फसले व शेवटीं त्यांना तो मार्ग सोडून द्यावा लागला. कारण गडकऱ्यांच्या व्यक्तिमत्वाप्रमाणेंच तीत पृथगात्मता आहे. जुने कवि, शाहिरी वाङ्मय, ऐतिहासिक गद्य, संस्कृतचा व्यासंग व इंग्रजीचें अध्ययन यांतून तिचा घाट निर्माण झालेला आहे. जुन्या मराठी व फारसी शब्दांचा अचुक उपयोग केल्यानें ती कणखर झाली आहे; जुन्या कवींच्या पद्धतीवर तिनें आपलें शुद्ध मराठीचें वळण ठेवल्यानें ती डौलदार झाली आहे व संस्कृत रसालंकारांच्या आश्रयामुळें ती काव्यमय, भावनोत्कट व नादमधुर झाली आहे.

गडकऱ्यांची कल्पनाशक्ति सुंदर, भेदक व पल्लेदार आहे; त्यांचें अंतःकरण रससिद्ध कवीचें आहे. त्यामुळें त्यांच्या कल्पनाशक्तीला अंतःकरणाचा ओलावा आलेला आहे. ही कल्पनाशक्ति आकाश, पाताळ, पुराणें, इतिहास किंवा पंचमहाभूतात्मक तत्त्वें यांतून फिरत, गरजत येत असते; परंतु तिची अभिव्यक्ति भाषेंत होतांना त्यांना कधीं अडचण पडली नाहीं, हें त्यांच्या भाषेचें वैशिष्ट्य आहे. त्यांचे शब्द अंतःकरणांतून उत्कटून येत असल्यामुळें ते प्रेक्षकांच्या वा वाचकांच्या थेट अंतःकरणाला जाऊन भिडतात. त्यांच्या शब्दजुळणीची एक विशेष पद्धत आहे. तिचें वळण शुद्ध मराठी असून, तींत मराठ्यांची रग, मराठ्यांचा आवेश व मराठ्यांचें मार्दव आहे; उपमेनें बोलाव-

याचें झाल्यास, तींत सह्याद्रीच्या कंगोऱ्याची तीव्र धार, वाऱ्याचा निरामय प्रवाहीपणा व झऱ्याची शक्तिगर्भ तेजस्विता आहे. तिच्यांतील माधुर्यामुळें त्यांच्या पद्याला व गद्याला एक प्रकारची गोड झार आली आहे.

पहिल्या एक दोन नाटकांत गडकऱ्यांचीं सर्व पात्रें एकाच प्रकारची भाषा बोलतांना दिसतात, पण पुढें 'एकच प्याल्या'पासून पात्रागणिक निराळेपण आलेलें आपणास आढळतें. यामुळें 'एकच प्याला' व 'भावबंधन' या नाटकांत आपणास तिचें विशेष नैसर्गिक व परिपक्व स्वरूप पाहावयास मिळतें. विशेष म्हणजे या दोन नाटकांत तिच्यांतील अवघडपणा जाऊन ती सोपी व सर्व जनसमाजाच्या आटोक्यांतील झाली आहे.

गडकऱ्यांना सर्व रस सारख्याच सामर्थ्यशीलतेनें निर्माण करितां येतात. यासाठीं ज्या अनेक शक्तींचा त्यांना उपयोग होतो, त्यांत भाषा ही एक त्यांची प्रमुख व प्रभावी शक्ति आहे. शब्दांचीं अंगोपांगें व अनेकार्थ तपासून पाहण्यांत ते कुशल आहेत. त्यांची स्मरणशक्ति जबर असल्यानें, टिपून स्मरणांत सांठलिलेले शब्द योग्य ठिकाणीं वेळेवर हजर होतांना दिसतात. जुने-नवे शब्द वाक्सांप्रदाय, म्हणी, स्त्रियांचे शब्दविशेष वगैरेंचा ते सढळ हातानें पण अचुकपणानें उपयोग करतांना दिसतात. शब्दाशब्दांतील ही किमया माहित असल्यानें त्यांच्या विनोदाला विशेष बहर येतो. हास्याच्या उकळ्या फोडण्यासाठीं ते भाषानिष्ठ विनोदाचा उपयोग फार कुशलतेनें करतात. शब्दावर कोट्या करणें हा त्यांच्या हातचा मळ आहे.

परभाषेंतील लोक मराठी बोलतांना कोणत्या चुका करतात हें त्यांनीं सूक्ष्मपणें पाहिलें आहे. त्यामुळें गिरसप्पा, कामण्णा यांचें मराठी विनोदप्रचुर झालें आहे. तसेंच लतिकेचें संस्कृत उत्तर व घनश्यामची गुजराथींतील शिकवण त्यांच्या त्या त्या भाषेवरील प्रभुत्वाची व आत्मविश्वासाची साक्ष देते. या अनेक गुणांमुळेंच त्यांच्या भाषेचें मराठींतील स्थान अनन्य व अढळ झालेलें आहे.

## नाटकांतील पद्य

या नाटकांतील पद्यक्षेत्रांत गुरुशिष्यांचें भावबंधन झालें आहे. त्यामुळें

त्यांची रचना सळमिसळीनें वावरतांना फारच आनंद होतो. गुरुशिष्यांच्या पद्य-रचनेच्या या प्रवाहांत आपणांस दोन ओघ दिसतातच. श्री. कोल्हटकर यांचें कल्पनाप्राधान्य व गडकऱ्यांचें भावनाप्राधान्य त्यांत दिसतेंच. श्री. कोल्हटकरांच्या पद्यांत इतरत्र आलेली क्लिष्टता इथें नाहीं, ही विशेष उल्लेखनीय गोष्ट आहे. गडकऱ्यांचीं पदें थोडींच आहेत; पण त्यांत ' मोह नसावा ' व 'कठिण कठिण' ही पदें आपल्या अंतःकरणाचा ठाव घेतात. हीं पदें अमर आहेत. नाटकांतलि पदांच्या जागा अचूक आहेत. पदांनीं मूळ रसाला उत्कटता यावी हा जो पदांचा उद्देश, तो या नाटकांत पुष्कळसा सफल झाला आहे.

## ' भावबंधन ' हें नांव

कोटी करण्यासाठीं एकादा शब्द वा कल्पना घेतली कीं त्यांना मराठीच्या सर्व अर्थातून फिरवावयाचें व त्यावरील सर्व कोटया करावयाच्या हा कोल्हटकरी संप्रदाय आहे. ' तोंड, हात, मुका, म्हातारपण ' यांसारख्या अनेक बाबतींत गुरुशिष्यांनीं केलेले विक्रम सर्वविश्रुत आहेत. याच मनोवृत्तीस अनुसरून ' भाव-बंधन ' या शब्दांतील ' भाव ' हा शब्द या नाटकांत खेळविला असावा असें वाटतें. प्रभाकर-लतिका व मनोहर-मालती यांचें ' भावबंधन ' झालेलें स्पष्ट दिसतेंच; पण केवळ वैवाहिक प्रेम एवढा संकुचित अर्थ गडकऱ्यांना अभिप्रेत असेलसें वाटत नाहीं. धुंडिराजच्या मनांतील ' वात्सल्य ' हाहि एक भाव त्यांत असावा असें वाटतें. इतकेंच काय पण ज्या उदार भावानें शेवटीं घनश्यामला बांधून आपल्याशीं जोडलें, तें धुंडिराजचें शत्रूवरील प्रेमहि यांत समाविष्ट झालेलें असावें. त्याचप्रमाणें वैवाहिक ' भावा 'साठीं वरवर उसासे टाकणारी, पण जीवनांत खोल न जाणारीं पात्रें महेश्वर, इंदु, बिंदु यांचें भाव-वैकल्य दाखवून याच भावाची दुसरी बाजू दाखविली आहे. त्यामुळें भावबंधन शब्दाचा उपयोग व्यापकतेनें व साभिप्रायतेनें करून गडकऱ्यांनीं ' भावबंधन ' हें नाटकाचें नांव सार्थ केलें आहे.

## नटांचें कर्तृत्व

एकादें काव्य कितीहि चांगलें असलें तरी त्याचें गायन करणारा गायक

कुशल व समजदार असला, म्हणजे कलेची प्रतीति नीट केली जाते. त्याचप्रमाणें नाटककार व नाट्यवस्तु कितीहि उत्तम असली, तरी तिचा आविष्कार योग्य रीतीनें व्हावयास हवा असतो. गडकरी या बाबतींत भाग्यवान होते. त्यांच्या नाटकाला जे नट मिळाले त्यांपैकीं बहुतेक त्यांचे मित्र होते. त्यामुळें या नटमित्रांनीं केलेल्या भूमिका पात्रांच्या व त्यांच्या आवडत्या 'मास्तरांच्या' प्रेमानें केल्या जात. 'गडकरी मास्तरांचें' आपल्या शिरावर एक ऋण आहे व तें आपण आपली भूमिका उत्तम वठवून फेडलें पाहिजे, ही स्नेहभावना त्यांत सदैव जागृत होती. त्यामुळें 'एकच प्याला' व 'भावबंधन' हीं नाटकें फार रंगत. अलीकडे दुर्मिळ झालेल्या या आपुलकीचें नाट्यवाङ्मयाच्या इतिहासांत फार महत्त्व आहेच. शेक्सपीयरबरोबर गॅरिकचें नांव उच्चारलें जातेंच, मग गडकऱ्यांच्या स्नेहीनटांचीं नांवें या ठिकाणीं सादर केल्यास हरकत येण्याचें कारण नाहीं. श्री. आण्णासाहेब कारखानीस, नारायणराव राजहंस ऊर्फ बालगंधर्व, गणपतराव बोडस, चिंतामणराव कोल्हटकर, कोल्हापुरे, मास्टर, दीनानाथ वा दिनकर कामण्णा (याच नांवानें ते पुढें ओळखले जात) आदिकरून नटांची कामगिरी रंगभूमीच्या क्षेत्रांत अलौकिक झाली आहे. विशेषतः श्री. चिंतामणराव कोल्हटकर यांच्या 'वृंदावन' व 'घनश्याम'च्या भूमिकांनीं व बालगंधर्व-बोडस याच्या 'सिंधु-सुधाकरच्या' भूमिकांनीं मनावर उठवलेले छाप बिलकूल पुसले जात नाहींत; जाणें शक्य नाहीं. म्हणून, उत्तम नाटककाराच्या उत्तम नाट्यवस्तूचा उत्तम आविष्कार केल्याबद्दल या नटांनाहि धन्यवाद द्यावेसे वाटतात.

## समारोप

भावबंधन नाटकाचें जितक्या दृष्टींनीं समीक्षण करणें मला शक्य होतें तितक्या दृष्टीनें करून झालें. कदाचित् यांत पुष्कळ अपुरेपणा, अनेक दोष वा उणीवा असतील; मतभेदासहि जागा असेल; कदाचित् गडकऱ्यांसारख्या श्रेष्ठ नाटककाराच्या पायरीला पाय लावल्याचें पातकहि यांत केलें गेलें असण्याचा संभव आहे. पण मीं हें केवळ गडकऱ्यांच्या प्रेमानें केलें आहे. त्यांच्या

सव वाङ्मयाबद्दल मला नितांत आदर आहे. या प्रस्तावनेच्या निमित्तानें तोच व्यक्त करण्याची संधी मी साधली आहे, इतकेंच.

पण मनांतली एक हुरहूर आज सत्तावीस वर्षानंतरहि अजून जात नाहीं. भावबंधनला जन्म देऊन गडकऱ्यांनीं देह ठेवला, ही शोकांतिका तर खरीच ! पण त्याहिपेक्षां मोठी शोकांतिका मला वाटते ती ही कीं, ज्या नाटकांनीं किंवा नाट्यप्रयोगांनीं गडकऱ्यांना अलोट लोकप्रियता व अमर कीर्ति दिली त्या 'एकच प्याला' व 'भावबंधन' या नाटकाचें दिगंत वैभव व त्यांचे यशस्वी प्रयोग पाहण्यास ते जगले नाहींत ! ! भावबंधन नाटक वाचतांना ही जाणीव फार होते व सर्वंकष काळाची निर्घृणता किती अघोरी आहे हें प्रत्ययास येतें. पण गडकऱ्यांची प्रतिभा काळावरहि मात करणारी आहे; म्हणून त्यांच्या स्मृति समाधीवर—

"To give away yourself keeps yourself still;
And you must live, drawn by your own sweet skill."

हीं शेक्सपीयरच्या उक्तींतील सुगंधी भावफुलें आदरानें वाहतों.

विश्रामबाग,
विलिंग्डन कॉलेज, सांगली.
दि. ११।१२।४६.

शंकर केशव कानेटकर

श्रीशं वंदे ।

# संगीत भावबंधन



## नमन

( राग बिहाग, ताल त्रिताल )

करिं नातिच ही स्तवनधी । प्रभुवर मौनमयचि पदिं ॥ वचनें स्तवना क्षम ना साधीं । दिव्य वितरिसी सहज सुगुणगण गूढ मनुजह्वदिं ॥ धृ० ॥ करावया प्रकट तया । शुभदा अघसंघा । निर्मिसि जरि वाटे खर आधीं ॥ १ ॥

दिंडी.

स्वजनकृतिचे गुरु दोष झांकुनियां । घेति गुणलव जे गाड मानुनीयां । कृतज्ञत्वें त्यां नमन अष्ट अंगीं । महाराष्ट्राच्या रसिकजनांलागीं ॥ १ ॥

साकी.

कृपाचि ज्यांची कारण केवळ मम पामरवचनातें । वंदुनि त्या श्रीपादपद्मांप्रति याया यश कार्यातें । नवनाटकरचना । सादर करितों रसिक जनां ॥ १ ॥



# अंक पहिला

## प्रवेश पहिला

[ **थळः**–रस्ता. धुंडिराज व घनश्याम ]

**घनश्याम**—माझें नांव घनश्याम.

**धुंडिराज**–अस्सें ! आतां आलें सगळें लक्षांत. घनश्याम, तुम्हीं आपलें नांव सांगितल्याबरोबर सर्व हकीगत आठवली. अहो, तुमच्या आमच्या कैक वेळां गांठी पडल्या आहेत ना चांगल्या ! तुमचें नांव घनश्याम एवढें कळलें मात्र, प्रत्येक भेटीचा प्रसंग डोळ्यांसमोर मूर्तिमंत उभा राहूं लागला आहे. कुठें बरें आपली भेट झाली होती ?

**घनश्याम**—धुंडिराजपंत, तुमची माझी एकाद्याच वेळीं भेट थोडीच झाली आहे, कीं म्हणून मला अमुकच ठिकाणीं आपली भेट झाली होती असें अचुक सांगतां येईल ? पुष्कळ वेळां आणि पुष्कळ ठिकाणीं घडलेल्या गोष्टींबद्दल निश्चितपणें सांगणें कठिणच नाहीं का ? धुंडिराजपंत, आपले स्नेही धनेश्वरपंत पेढीवाले आहेत ना ? त्यांचा मी मुनीम; तेव्हां धनेश्वरपंतांच्याच घरीं आपल्या भेटी होण्याचा विशेष संभव.

**धुंडिराज**—अगदीं बरोबर ! आतां ठीक बोललां. घनश्याम, धनेश्वरपंत पेढीवाल्याचे तुम्ही मुनीम. तुमचें नांव घनश्याम. धनेश्वरपंताच्या घरीं तुमच्या आमच्या भेटी झाल्या. आतां बोला. उगीच तसें नका बोलूं ! आपलें विचारीत चला. धनेश्वरपंताचे तुम्ही मुनीम. तुमचें नांव घनश्याम. धनेश्वरपंताच्या घरीं तुमच्या आमच्या भेटी झाल्या.

**घनश्याम**—( स्वगत ) मीं सांगितलेल्याच गोष्टी मला ठासून बजावून पढवीत सुटला आहे ! माथ्यांत ढिलाईचा भाग बराच आहे.

**धुंडिराज**—तुम्ही बोलत नाहीं ? हं पहिल्यानें अंमळ विलंब लागला ओळखायला ! तें नाहीं घ्यायचें मनावर.

**घनश्याम**:—छे: छे:, वृद्धापकाळामुळें विस्मरण अगदीं साहजिक आहे.

**धुंडिराज**:—नाहीं हं; वृद्धापकाळाचें विस्मरण नाहीं हें. तसें शाबूत आहे काम. होतें काय बघा! वृद्धापकाळ तर आहेच. पण हा आमचा धंदा विजातीय पडला. विमाकंपनीचा एजंट म्हटला म्हणजे सगळ्या जगाचा नातेवाईक! मिळवित्या माणसांच्या वारसांची त्याला उपजत काळजी! त्याला रोजीं तेहतीस कोटी देवांचीं दर्शनें घडायचीं! आणि प्रत्येकाजवळ ही रडकथा सांगायची कीं, तुम्ही मेल्यावर मागें तुमच्या मुलांबाळांचें काय होईल, हातपाय चालता आहेत तोंवरच सारी मौज, उद्यांचें कुणीं काय बघितलें आहे, मरणाचा काय नेम घ्या. सांगतों काय, घनश्याम, विमाकंपनीचा एजंट भेटला कीं, तुमचें पुरें मरणच ओढवलें म्हणून समजा! अन् संसाराची तोंडमिळवणी करण्यासाठीं आम्हांला रोज उठून नवे चेहरे गांठावे लागतात. म्हणजे बघा आतां! आधींच आम्ही डोक्यानें जरा पंगू, त्यांत वाढत्या वयाचें कमिशन कापायचें, अन् अकलेला नव्या चेहऱ्यांचा रोजमुरा! असें कांहीं होऊन गेलें म्हणतां! एकाचा चेहरा दिसला कीं तिसऱ्याचाच इतिहास आठवतो! एकाचें नांव अन् दुसऱ्याचें गांव मिळून एकंदर मेळा असा तयार होतो! बस्स! अमुक एक इसम ओळखीचा आहे कीं नाहीं हें छातीठोक सांगण्याची सोयच नाहीं ना मुळीं! हें तुम्ही आतां बोलतां आहां ना? आतां चेहेरेपट्टी ठेघा हीच, अन् नुसता अंगरखाच या बदलून; प्रकरण आलेंच आमच्या अंगाशीं! त्या अंगरख्याचा एकादा जोडीदार कुणाच्या अंगावर पाहिला असेल, त्याचा इतिहास तुमच्या तोंडाच्या अंगलट यायचा! मग मी करतों काय, माणसाची ओळख जरी पटली नाहीं तरी ओळख पटल्यासारखेंच दाखवितों. हो, म्हणजे न ओळखण्याबद्दल त्याला तरी वाईट वाटत नाहीं!

**घनश्याम**—इतका घोटाळा कसा होईल असा?

**धुंडिराज**—काय सांगावें तुम्हांला आतां? अहो, होतो म्हणतों ना! होतो म्हणजे काय, खरोखरीच होतो. अगदीं अंगरखा बदलला तरी फरक होतो. एक नूर आदमी आणि दस नूर कपडा म्हणून कशाला म्हटलें आहे मग? आतांच अडचण पडली आहे बघा. धनेश्वरपंताचा भागीदार तुमचा तो कोण? त्याचा मुलगा मोरेश्वर धनेश्वराकडे आज आला आहे–आला आहे ना? त्याला भेटावें लागणार आहे आतां! त्याला पाहून इतकीं वर्षें लोटलीं आहेत,

कीं, तसें म्हटलें तर परातींत तेल घालून देवळांत त्याला भेटायला हवें. फार लहानपणीं पाहिलेला एकदां. आणि इथें तर कालची जमा कालच खर्ची. आजला म्हणाल तर शिल्लक बाकी पूज्य. त्याला आतां ओळखावा कसा बोला!

**घनश्याम**—जराशी अडचण आहे खरी.

**धुंडिराज**—नाहीं; नाहीं; नाहीं; तशी तितकी अडचण नाहीं, बरें का? कुणीं नेम सांगावा? ओळखींनही एखादे वेळीं चटकन्. परवांच बघा, झाली काय गंमत, एक आपला गृहस्थ भेटला; पहातांक्षणीं आम्हीं टाकला मनाशीं कयास बांधून कीं, एक फलाण्याचा फलाणा तो हाच म्हणून! झालें! त्याला बघितलें विचारून नुसतें अनमानधपक्यानें—मनांत म्हटलें, बघूं तर खरें! हो, गंमतच करायची घटकाभर—म्हटलें, कां हो बुवा, अमुक अमुक ते आपणच का? झालें बुवा! विचारून तर गेलों! त्यानें म्हटलें होय. म्हणजे काय, सर्दच झालों ना एकदम! खरोखरीच तो म्हणजे तोच! झटक्यास ओळख पटली ना! मग हडसून खडसून सांगितलें—हो त्यानेंच कबूल केलें, मग काय हो?—म्हटलें, गोमाजी तिमाजी ते आपण; अमक्याचे तुम्ही अमुक. त्याला मुळीं होयच म्हणणें आलें ना! बरें, गंमत ही त्यांत—तुम्ही म्हणाल नांव नेमकें सांगितलें म्हणून आमचें त्याचें संघट्टण विशेष असेल—नाहीं! तसें म्हटलें तर परिचय नाहीं, ओळख नाहीं, जानपछान नाहीं, न लेवा न देवा! नुसतें दहा वीस वेळां बघितलेला—कुठें घडी दोन घडी बोलणेंचालणें—बस्स. उपरांत नाहीं. अगदीं हराशिवा! पण ओळखलें एकदम न् काय! बोला, गंमत आहे कीं नाहीं? नाहीं नका म्हणूं.

**घनश्याम**—( स्वगत ) जबर गोष्टीवेल्हाळ गृहस्थ आहे हा! आणखी अशीं पल्लेदार विषयांतरें करितो आहे कीं, संस्कृत श्लोकांवर प्रवचनें करणाऱ्या वक्त्यांनीं सुद्धां तोंडांत बोटें घालावींत. याला मूळ पदावर आणणें मोठें कठिण आहे. ( उघड ) धुंडिराजपंत, असें असेल तर मोरेश्वराला ओळखणें कांहीं कठिण नाहीं तुम्हांला.

**धुंडिराज**—सांगितलें ना तुम्हांला आधींच, कीं कठिण नाहींन् आहेही! बाकी मोरेश्वर तरी मला ओळखील कीं नाहीं हें सुद्धां जरा तेढेंच आहे! स्वारी अगदीं गयाळ आहे. अगदीं सुमार बुद्धीचा—अगदीं म्हणजे अगदींच.

मला पहिल्यापासून माहीत आहे ना! तुम्ही नाहीं म्हणून मी कुठला ऐकायला! सांगतों बघा तुम्हांला!

**घनश्याम**—(स्वगत) झाली विषयांतराला सुरवात!

**धुंडिराज**—बरें का, घनश्याम, एकदां काय झालें, कीं या मोरेश्वराची आजी—आजी म्हणजे आईची आई नव्हे-बापाची आई-आईची आई बिचारी आहे अजून. आमच्या मेव्हण्याच्या कुणाचीशी ती मावशी लागते वाटतें, म्हणून मला तरी माहीत एवढें! ती बापडी आजतागायत सहीसलामत आहे. आपण कशाला उगीच कुणाबद्दल वाईट बोला? आणि बोलून तरी कसें चालेल? काल परवांकडे कोणसें—कोण पहा—

**घनश्याम**—(स्वगत) विषयांतरांतून पुन्हां पोटाविषयांतर! छे: छे: छे:! अरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टींचा एकमेकींशीं जन्यजनकसंबंध रद्द आहे या प्रकारापुढें! हा मालतीचा बापच आहे आणि तिच्याबद्दल मला मागणी करायची आहे, याच आशाळभूत धीरावर मीं अजून टिकाव धरला आहे! (उघड) मोरेश्वराच्या आजीबद्दल-म्हणजे बापाच्या आईबद्दल-सांगत होतां ना कायसें?

**धुंडिराज**—हो; झाली काय गंमत, कीं याची आजी एकदां वारली—अगदीं लहानपणीं बरें का?

**घनश्याम**—कुणाच्या? तिच्या लहानपणीं कीं याच्या?

**धुंडिराज**—ठीक, ठीक, ठीक! घनश्याम, बोलण्यांत सफाई पकडलें खरें! कबूल आहे. असा कोटिक्रम हवा बोलण्यांत! हें आमच्यांत नाहीं. आमचें बोलणें सर्रास अघळपघळ! म्हणजे काय, पांचपेंच नाहीं! आपला ऐसपैस कारखाना! तुमचें बोलणें म्हणजे खुबीदार, प्रासयुक्त! असेंच पाहिजे बोलणें माणसाचें! उगीच गबाळग्रंथी फापटपसारा नाहीं कामाचा! या बोलण्यांत म्हणजे गंमत आहे, मौज आहे, अन् मजाही आहे. आपल्याला आवडलें तुमचें बोलणें. आवडलें म्हणजे अगदीं मनापासून! आमच्या हेडहापिसांत एक क्लार्क आहे. असा तुमच्यासारखाच! अगदीं आंखबंद डोक्याचा मनुष्य! त्याचें बोलणें असेंच प्रासादिक असतें. सगळ्या हेडहपिसांत त्याची—

**घनश्याम**—आपण हेडहपिसांत शिरलां खरे, पण बोलण्याच्या नादांत मोरेश्वराची आजी बिचारी एकदां लहानपणीं तशीच मरून पडलेली आहे.

शिवाय आजी म्हणजे ती सुद्धां बापाची आई, आईची आई नव्हे-ती बापडी आजतागायत सहीसलामत आहे.

**धुंडिराज**—छान! सुरेख! पसंत! चांगला टोमणा दिलात. गंमत वाटली! बरें! इकडे आजी वारली, हा मोरेश्वर लागला रडायला, घरांतलीं माणसें गडबडींत–अन् गडबडींत असायचींच हो, माणसासारखें माणूस घराला मुकलें, त्यांना तरी आपण कोणत्या तोंडानें दोष द्यावा? हा मोरेश्वर सारखा रडतो आहे, तेव्हां मीं घेतला त्याला चटदिशीं जवळ! जरा खेळवला झालें; त्याला वाटलें मी घरांतलाच कुणी आहे म्हणून! फसलान् काय! अशी गंमत झाली. आजी वारली त्या वेळची गोष्ट.

**घनश्याम**—(स्वगत) इतक्या लांबणीनंतर चांगली गंमतच आहे म्हणायची ही! बोलण्याच्या ऐन गर्दींत कुणीं कितीहि भानगडी सांगितल्या तरी शब्दन् शब्द विचारपूर्वक लक्षांत ठेवण्याचा माझा आजपर्यंतचा अभिमान आज याच्या माऱ्यानें उतरणार असें वाटतें! आतां एकदम विषय काढावा. नाहींतर लग्नाची ही गोष्ट माझ्या आयुष्याच्या शेवटापर्यंत याच्याजवळ काढण्याची मला संधि मिळावयाची नाहीं. आतां जरा वहावतांना थांबला आहे, तेवढ्यांत वाहत्या गंगेंत हात धुवून घ्यावा एकदम.

**धुंडिराज**—हें पहा घनश्याम, एकदां काय झालें—

**घनश्याम**—(एकदम स्वगत) अरे बापरे! (उघड) धुंडिराजपंत, मध्येंच बोलल्याबद्दल मला क्षमा करा. कांहीं जरूरीच्या कामासाठीं आपल्यांशीं निकडीनें बोलण्यासाठीं आलों आहें; आणि काम फारच महत्त्वाचें असलें तरी या वेळीं मला वेळ फारच थोडा आहे; आणि म्हणूनच जराशा उतावळ्या उद्धटपणानें आपल्या बोलण्यांत व्यत्यय आणला.

**धुंडिराज**—छे: छे: छे:! भलतेंच! घनश्याम, उतावळेपणा कसलान् उद्धटपणा कसला! तुम्ही ताजीं माणसें म्हणजे काय गोष्ट आहे! हें बघा, तुम्ही मूलमंडळी अशी आगळीक करूं लागलां म्हणजे आम्हांला बघा काय समाधान वाटतें! खरें सांगूंच का आतां? बघा, बाळगोपाळांच्या बोलण्याचा ज्याला राग आला तो थेरडा म्हणजे चळलाच म्हणून समजा बेलाशक. म्हातारपणीं मन म्हणजे काय पाहिजे! बोलण्याचा राग म्हणजे काय बोलणें आहे! अहो, गंमत सांगूं का तुम्हांला? तुमचें बोलणें म्हणजे बोलणें नव्हेच तें!

आमचा प्रभाकर तुम्हांला माहीत असेलच ! आमचा म्हटला म्हणजे तसा जवळचा नव्हे, बरें का ? पहा, प्रभाकर म्हणजे खरें म्हटलें तर—कोण बरें ? [ आठवतो ]

**घनश्याम**—( स्वागत ) झालें ? आतां "प्रभाकर" घराण्याचा इतिहास ! देवा, या घनश्यामाला जन्माला घातलास तो अखेर या सैल जिभेनें ठार मारण्याकरितांच का ? काय शब्दांचा वर्षाव करितो आहे ! एखाद्या नाटककारानें असें शब्दशूर पात्र जर नाटकांत पांचही अंकांतून नाचविलें तर दिडाच्या आंत नाटक आटोपण्याची पंचाईतच. रावणाच्या दहा तोंडावर रामबाण औषध मिळालें; पण हें तोंड असाध्य आहे.

**धुंडिराज**—हें बघा, याचा मामा आमच्या दशांतला. लहानपणीं आई-बाप वारलीं. तशी माया पण जोडून ठेविलेली नव्हती त्यांनीं. मामा पडले उदासीनवृत्ति. आम्हीं आमच्या हिला टाकलें विचारून. होतां होईतों घरांत विचारूनच सगळें केलेलें बरें, असा आमचा आपला पहिल्यापासून शिरस्ता. म्हटलें बुवा, आपल्या घरांत नाहीं मूलबाळ; रिकाम्यासारखे दोन जीव; आयता घराला अलंकार लाभतो आहे तेवढेंच भूषण ! झालें; तिलाही रुचलें तें; आणि आम्हीं या प्रभाकराला घरीं आणला. तो रुळला झालें ! अगदीं घरच्यासारखा झाला. घटकाभर असेंच म्हणा ना, तुमच्या धनेश्वरपंताच्या घरीं जसा मनोहर आहे ना, तसा हा. आम्हांला प्रभाकर जसा जवळचा नाहीं—म्हणजे नात्यानें—तसा धनेश्वराला मनोहर पण जवळचा नाहीं. प्रभाकर आणि मनोहर म्हणजे अगदीं एकरंगी, एकशिंगी ! आतां हें कबूलच केलें पाहिजे, कीं आमचा म्हणजे कांहीं धनेश्वरपंतासारख्या बड्या बारदानाचा कारखाना नव्हे. तें म्हणजे जगड्व्याळ काम ! तुम्हांला ठाऊक नाहीं धनेश्वर म्हणजे किती भारीपैकीं असामी आहे तें. घरीं हत्तीघोडे झुलवील ना मनांत आणील तर तो ! अहो, पेढीवर एक मुनीमसुद्धां ठेवला आहे ना त्यानें !

**घनश्याम**—तो मुनीम सध्यां आपल्यापुढें उभा आहे. त्याचें नांव घनश्याम हें सुद्धां मला माहीत आहे. त्याला आपल्याजवळ कांहीं सांगायचें आहे. आणखी खरें सांगूं आपल्याला ? आपण त्याला कांहीं सांगूं देत नाहीं.

**धुंडिराज**—जरासा विषयाला सोडून बोललों खरा ! सांगत होतों हेंच, कीं मी धनेश्वरासारखा श्रीमंत नाहीं. कबूल आहे, मीं पुष्कळ म्हटलें कीं,

मी बुवा मोठा लाखोपती आहें. घनश्याम, सारीं सोंगें आणतां येतिल; पण पैशाचें सोंग आणणें मोठें कठिण आहे! आतां तुम्ही म्हणाल, कीं बाबारे तूं जर असा कफल्लक, तर मग या लष्करच्या भाकरी भाजायला तुला कुणीं सांगितलें होतें? प्रभाकराला तूंच कशाला शिकवायला ठेवून घेतलास? हां, हें बोलणें रास्त आहे, हिशोबी आहे अन् मुद्देसूद आहे! आमचें काय उत्तर असेल सांगा बघूं? एक आपली गंमत म्हणून; चला, काय असेल उत्तर?

**घनश्याम**—( स्वगत ) निरुत्तर केलें आहे अगदीं या गृहस्थानें! एकच चरण तीनतीनदां घोळवून एखाद्या चिजेला रंग येत असेल कदाचित्; पण एकच गोष्ट तीनतीन शब्दांनीं सांगणारी ही चीज मात्र अजब आहे खरी. नाहीं म्हणायला एका दृष्टीनें नाटककाराला असलें रत्न उपयोगी आहे खरें. नाटकाच्या पहिल्या प्रवेशांत या स्वारीची योजना केली एकदां, म्हणजे याच्या सहज बोलण्याच्या ओघांतच साऱ्या पात्रांशीं प्रेक्षकांची सुरेख ओळख होऊन जायची. शब्दांच्या या खैरातीमुळें मला आतां अशी भीति वाटायला लागली आहे, कीं शेवटीं माझ्या मागणीच्या उत्तरादाखल बोलायला याजवळ एखादा तरी शब्द शिल्लक राहील कीं नाहीं! आला चेहरा खुलून! पुन्हां बोलणार वाटतें! म्हातारपणामुळें याच्या जिभेला बांधलेल्या नाड्याशिरा पार तुटल्या आहेत कीं काय? बोल, शब्दसृष्टीच्या परमेश्वरा, अगदीं मोकळया जिभेनें बोल. शब्दांनीं शरपंजरीं पडून मरणारा पहिला वीर म्हणून तरी माझा लौकिक होईल.

**धुंडिराज**—जुन्या काळची गोष्ट आहे फार; तुमच्या लक्षांतच यायची नाहीं कधीं. मूळ म्हटलें म्हणजे असें आहे, कीं आमच्या लहानपणीं घरची फार गरिबी, अन् चार अक्षरें शिकायची तर मोठी हौस मनाला! काय सांगावें महाराजा! घटका घटका आम्हीं आशाळभूतपणानें नव्या शाळेच्या दारासीं जाऊन बसावें, अन् आंतल्या आंत तळमळावें, कीं देवराया, कायरे बाबा तुझ्या घरीं असें पाप केलें होतें, म्हणून या तुझ्या देवळांत आम्हांला यायची अशी चोरी व्हावी? ते दिवस डोळयांपुढें उभे राहिले म्हणजे टपाटपा टिपें येतात बरें अजून डोळयांतून! मनांतली इच्छा मनांत गिळून टाकिली बरें त्या वेळीं! तेव्हांपासून मनाचा आपला कृतसंकल्पच, कीं हातीं पैसा खेळूं लागलारे लागला कीं कुणा तरी गरीब मुलाला विद्या ही शिकवायची म्हणून! म्हणून या प्रभाकराला पोटच्या पोरासारखा घरीं वागविला

आहे. आमचे स्नेहीसोबती हंसले आम्हांला तेव्हां, कीं घरचें झालें थोडें अन् व्याह्यानें धाडलें घोडें म्हणून. बाबारे, विद्यादान केल्याचा आनंद कांही निराळा आहे म्हणावें. प्रभाला इंग्रजींत बोलतां चालतांना पाहिलें म्हणजे असें वाटतें कीं बस्स. बरें, तसा मोठा पायगुणाचा आहे. हा घरांत आल्यावर चार दोन वर्षांनीं आमची मालती झाली; पुढें तिच्या पाठीवर कुसूम, कुसुमच्या पाठीवर कुमुद, तिच्या पाठीवर—

**घनश्याम**—( स्वगत ) यांच्या पाठीवर मात्र कोरडेच ओढले पाहिजेत आतां! इतक्या वेळां सूचना देऊन व्यर्थ. शहाण्याला शब्दांचा मार ही म्हण मला आज अगदीं निराळ्या अर्थानें पटूं लागली आहे.

**धुंडिराज**—हो, कुमुदच्या पाठचीं दोन भावंडें गेलीं; अन् पुढें तीन मुलगे! बरें, तात्पर्य काय, प्रभाकरानें पाऊल टाकल्यापासून घर आपलें नांदतेंगाजतें झालें! आज होय नव्हे किमानपक्ष वीस वर्षें झालीं—हो, आला होता तेव्हां किती वर्षांचा होता हा?—हें साल कोणतें बरें?—थांबा, रोजनिशीच बघूं या अं! [ रोजनिशी पाहूं लागतो. ]

**घनश्याम**—( स्वगत ) मला हें चऱ्हाट ऐकत पुढची वीस वर्षे घालवावीं लागणार असें दिसतें!

**धुंडिराज**—रोजनिशी राहिली घरीं! तूर्तास टोकळ मानानेंच घ्याना. आला तेव्हां सुमार चार पांच वर्षांचा; पांच सहा म्हणजे डोक्यावरून पाणी अगदीं. पुढें तीन चार वर्षांनीं आमची मालती झाली; आणि आज मालती म्हणजे शके अठराशें—तसें कशाला? उघडा हिशोब अगदीं—आमची मालती म्हणजे तुमच्या धनेश्वराच्या लतिकेच्या बरोबरीची. वयांत तफावत नाहीं; स्वभावांत म्हणाल तर आहे. आमची मालन मोठी सात्त्विक; तुमच्या धनेश्वराच्या मनोहराचा मासला! मनोहर तरी मुलगा मोठा गुणाचा! हो, पण तुम्हांला ठाऊक असेल, शिकतो काय हो मनोहर ते दगडधोंडे गोळा करून?

**घनश्याम**—शास्त्रीय विषयांच्या विद्यार्थ्यांना भूगर्भशास्त्र शिकण्यासाठीं दगडधोंड्यांची चांगली माहिती मिळवावी लागते.

**धुंडिराज**—काय काय नवीन निघेल कांहीं सांगतां यायचें नाहीं. घ्यायचें काय त्यांतलें—कीं मनोहराच्या मनाची जी ठेवण आहे, बस, तीच आमच्या मालनची. आतां लतिका आहे. लक्षाधीशाची मुलगी, त्यांतून एकटी, अन्

बाळपणापासून आईविरहित. त्यामुळें तिचा स्वभाव थोडा तापट आहे. बाकी मुलगी मनानें फारच सरळ बरें! अगदीं आमच्या प्रभाचा नमुना. तुम्ही एक बोला-त्याचे एकोदरशें झालेच! हो, तुमच्या बोलण्यावरून निघालें बोलणें, नाहीं का? आमच्या प्रभाचें बोलणें तुमच्यासारखेंच; पण जरा उतावळें अन् तापट. मनांत कांहीं नसायचें, पण फटकळ म्हणजे काय म्हणतां! पण आम्ही काय म्हणतों—मनांत हो मात्र—तसा दर्शनी राग दाखवितोंच कधीं मधीं—मनांत म्हणतों, पोराला कोण आहे कौड-कौतुक करायला? आपणच त्याची आई-बापें. ताडकन् तोडून बोललें आणि त्याला लागलें तें, तर बघायचें कुणाच्या तोंडाकडे त्यानें बरें! आपले उपकार का जाणवायचे आहेत त्याला? आमची ही तर फारच मायाळू! काय सांगावें तुम्हांला घनश्याम! मरावें न् त्या माउलीच्या पोटीं यावें बरें! आलें, लक्षांत आलें! हंसलांत का तें आलें लक्षांत! बस! हेंच आवडतें आम्हांला! अन् तुम्ही म्हणतां तुमच्या बोलण्याचा राग येईल आम्हांला म्हणून! अहो, आहेत कुठें अशीं गुणाचीं बाळें? तुम्हीं सुद्धां छान केलेंत मोठें! आई-बाप लहानपणींच अंतरले—देवाची योजना मोठी कठिण आहे—हं—तरी तुम्ही आपले स्वतःच्या करामतीनें या पदवीला येऊन पोंचलां. बेश झालें! आशीर्वाद आहे आमचा आपला तुम्हांला! आपला असाच सुखाचा संसार करा, चार पोरां—बाळांचें धनी व्हा, आनंद करा! तुमच्या आईबापांना जें वाटलें असतें तेंच आम्हांला वाटेल. आमची ही काय,. मी काय, आमचें आपलें एक म्हणणें आहे—काय? कीं तुम्हां पोराबाळांचे संसार थाटलेले पहावेत, एखादे दिवशीं आपले बसल्या जागीं आनंदाने गपकन् डोळे मिटावेत अन् आपलें देवाजीच्या कारणीं पडावें! घनश्याम, तुम्हीं मंडळींनीं आतां संसार मांडायला हवेत, बरें का? आम्हीं म्हातारपणीं करायचें काय आतां?

**घनश्याम**—आपण वृद्धापकाळीं काय करावें म्हणून विचारतां, आणि आम्हां तरुणांना संसार थाटण्यासाठीं आग्रह करितां! धुंडिराजपंत, आपला स्वभाव इतका प्रेमळ आहे म्हणून मी स्पष्टपणें बोलण्याचें धाडस करितों. आम्हीं तरुणांनीं संसार थाटावा हें उचित आहे खरें; पण त्या कामीं आपणांसारख्या प्रेमळ वृद्धांनीं आम्हांला आशीर्वादापेक्षां अधिक साह्य करायला नको का? धुंडिराजपंत, माझ्या भावी संसाराची घटना करण्याचें महत्त्वाचें काम

केवळ आपल्या हातीं आहे. आपल्या सुशील कन्येची मागणी करण्याकरितां मी आलों आहें. हा प्रकार अंमळ अपूर्व आहे. मुलीच्या बापानें वरसंशोधन करण्यासाठीं हिंडावें, आणि केवळ वडील माणसांनींच या प्रश्नाची वाटाघाट करावी, हा आपल्या समाजांतला रूढ मार्ग आहे. पण माझ्या आणि मालतीच्या विवाहाच्या एकंदर विषयांत दोन्हीपक्षीं वडीलपणा केवळ आपल्याकडेच आहे. धुंडिराजपंत, अनुरूप वधूच्या प्राप्तीबरोबरच मला प्रेमळ मातापितरांचाही लाभ व्हावा असाच सुंदर योगायोग दिसतो. हें सारें आपल्या संमतीवर अवलंबून आहे. माझ्या भाग्यशाली आशेला आपल्या आशीर्वादाचें बळ मिळेल का ?

**धुंडिराज**—घनश्याम, काय, म्हणतां काय तुम्ही हें ? वा:, असें स्थळ म्हणजे—

**घनश्याम**—हां, अशा महत्त्वाच्या गोष्टीबद्दल स्थळकाळाचा मीं विचार केला नाहीं ही गोष्ट मला कबूल आहे. आपल्यासारख्या प्रेमळ पित्याला असें वाटणें अगदीं स्वाभाविक आहे, कीं अशी रस्त्यावर सहज बोलतां बोलतां मागणी करायला माझी मुलगी काय वाटेवर पडली आहे म्हणून ! पण धुंडिराजपंत, आपण सहृदय आहां. तरुण मनाची उतावळी उत्सुकता लक्षांत घ्या. प्रभाकरांना विद्यादान देतांना आपण आपल्या बाळपणींच्या सुद्धां भावनांची आठवण ताजी ठेविलीत. मग मला कन्यादान करितांना आपल्या तारुण्याच्या आठवणींची पुन्हां आठवण करणें आपल्याला खात्रीनें सोपें जाणार आहे. वस्तुतः आपल्या सुंदर आणि सद्गुणी कन्येची योग्यता इतकी मोठी आहे, कीं तिच्यासाठीं मागणी घालायला येतांना जगद्‌विजयी सार्वभौमानें आपलीं जयवाद्यें शिवेबाहेरच बंद ठेवावीं किंवा जगद्‌गुरूनें आपल्या मशाली विझवून टाकाव्या.

**धुंडिराज**—जगद्गुरूनें लग्नासाठीं यायचें हा दृष्टांत चुकला, बरें का ? का, घनश्याम, आमच्यांतही डोक्याचें काम आहे कीं नाहीं बोला. बरें, तें जाऊं द्या. घनश्याम, तुम्हीं म्हणतां तें कांहीं खोटें नाहीं. माझ्या मालतीचे गुण मी काय सांगूं तुम्हांला ! तुम्हीं तिची निवड केली म्हणून तिच्याऐवजीं मी तुम्हालाच धन्यवाद देईन. काय सांगावें तुम्हांला ? ती जितकी बुद्धिमान् आहे तितकीच सरळ आहे. सुंदर आहे तशी साधी आहे. साध्या बोलण्याचालण्यांत बालकापेक्षां अल्लड आणि जबाबदारीच्या वेळीं वृद्धांपेक्षांही पोक्त. आनंदवृत्ति आणि गंभीर. फुलासारखी नाजूक आणि तारांसारखी तेजस्वी. जिभेची जरा जड;

रण डोळ्यानें बोलणारी ! शुद्ध, विशाळ आणि सोज्वळ दृष्टि ! माझी मालती डोळे भरून माझ्याकडे पाहूं लागली म्हणजे माझ्या आईच्या डोळ्यांतली निर्मळ माया माझ्या बायकोच्या डोळ्यांच्या ठेवणींत दिसायला लागते ! मालतीच काय, आमचीं सगळींच मुलें मोठीं गुणी. तेवढ्यासाठीं एक म्हणून निश्चय करून टाकला आहे, कीं पैसा खर्च होवो, कष्ट पडोत, मुलांना म्हणून गरिबी जाणवूं द्यायची नाहीं ! अहो, हीच आपली धनदौलत ! एरवीं म्हणाल तर असा पैसा आला अन् असा गेला. घनश्याम, थकून भागून संध्याकाळीं असें घरीं येऊन पडावें, अन् भोंवतालीं या आनंदी पांखरांची एकदां गोड गजबज सुरू झाली म्हणजे सारा शीणभाग हरून जातो अगदीं ! जीव कीं प्राण आहेत माझीं मुलें म्हणजे मला ! आवतींभोंवतीं अशी किलबिल करूं लागलीं म्हणजे जिवाला गार वाऱ्यावर चांदण्यांत पडल्यासारखें वाटतें. त्यांतल्या त्यांत आमची मालती म्हणजे केवळ कलिजा आहे सगळ्यांच्या जिवाचा. काय एकेक गुण सांगूं तिचा !

**घनश्याम**—धुंडिराजपंत, आपल्या आणि माझ्याही अत्यंत आवडत्या विषयावर आपण बोलतां आहां. तरीसुद्धां मी आपणांला अडथळा करीत आहें, यावरून माझ्या प्रश्नाच्या उत्तरासाठीं मी किती अधीर झालों आहें याची कल्पना करा, आणि मला माझ्या भावी भाग्याची कल्पना द्या ! माझ्या विनंतीला आपली संमति आहे का ?

**धुंडिराज**—हां, तें कठिण काम आहे ! खरें सांगूं आतां ? या बाबतींत तुम्ही मालतीचीच आधीं संमति घ्या. तिचा रुकार पडला म्हणजे आमचें काम एवढेंच उरलें, कीं पोरगी पिवळी करून तुमच्या पदरांत टाकायची, आणखी दोन हस्तक अन् तिसरें मस्तक तुमच्या चरणीं ठेवून मोकळें व्हायचें ! हुंडापांडा, पोषाखकरणी मी गरीब बाप काय देणार ? पण आपल्या छंदानें वागून मुलीला तिच्या मर्जीविरुद्ध कुपात्राच्या गळ्यांत बांधायची हें मात्र आपल्याकडून कदापि होणें नाहीं. जन्मासंबंधाच्या या गोष्टी ! बाप म्हणजे मग बापच तो ! त्यांत लटपट नाहीं उपयोगी ! बापानें मुलीचें मन मोडणें म्हणजे तें उक्त नव्हे, रास्त नव्हे अन् बरें नव्हे; शिवाय तें ठीकहीं नाहीं. तेव्हां म्हणतों, कीं तुम्ही तिलाच समक्षासमक्ष विचारून टाका. आमच्या मुलीवर आमचा आहे भरंवसा. तिची एकटीची भेट घ्यायला आम्हीच तुम्हांला घरीं नेतों ! चला याच पावलीं घरीं. मालतीनें हो म्हटलें कीं झालें. आमच्या

हिची सुद्धां संमति नको. ती आहे जरा छांदिष्ट. जरा म्हणजे तशी छांदिष्ट नाहीं—साधारण छांदिष्ट—नाहीं, पण छांदिष्टच आहे—अन् फारच छांदिष्ट आहे—पण भ्यायला नको. मालतीच्या मनानें घेतलें हें, म्हणजे आमच्या हिचा बंदोबस्त मी करतों. असें कांहीं असलें म्हणजे मी करतों काय, दोन चार दिवस वरपांगीं सोंग आणतों रागाचें; जसा कांहीं जमदग्निच! चार चार दिवस एक अवतार ठेवतों असा कीं काम फत्ते! तसा गबाळ नाहीं बरें का मी! तें सोंग करितों वाटेल तेव्हां! चला तुम्ही आधीं. आतां उगीच बोलण्यानें बोलणें वाढवूं नका. फार बोलणें, अन् तेंही म्हटलें म्हणजे उगाच वाढवून बोलणें हें उचित नाहीं, रास्त नाहीं अन् योग्य नाहीं; शिवाय तें ठीकही नाहीं. चला, घनश्याम, चला म्हटलें म्हणजे मग एकदम चलाच. [ दोघे जातात.]

---

# प्रवेश दुसरा

[ स्थळः—**धुंडिराजाचें घर.** पात्रेंः—**मालती, लतिका, मनोहर, इंदु, बिंदू, कुसुम, कुमुद. मनोहर** आणि **मालती** बुद्धिबळें खेळत आहेत.]

**लतिका**—(स्वगत) खरोखरच वल्लभरमणी खेळावयाला बसलीं म्हणजे त्यांची कठिणच अवस्था होत असली पाहिजे!

[ राग **बेहाग**, ताल **त्रिताल** ]

**दारुणा स्थिति। ती जाचि तयांप्रती ॥ धृ० ॥**
**प्रियजनपक्षा स्वीकारावें ॥ न तरी मुख पुढतीं ॥ १ ॥**
**प्रतिपक्षातें मिळतां न मिळे अंगा स्पर्श रती ॥ २ ॥**

तीन, चार आणि पांच! बरोबर तास झाला! बुद्धिबळाचा पट मांडून मालती आणि मनोहर एकमेकांकडे पहात वेड्यासारखीं बसलीं आहेत! एकमेकांच्या समोर बसल्यामुळें यांना चुकल्यासारखें तर वाटत नाहीं ना? तसें नव्हेच. कारण मग तसें नसतांना मला चुकल्यासारखें कां वाटत आहे?

वेळेवर यायला प्रभाकर चुकले म्हणून का ? होते आहे ही संसारांत चूक होते आहे का ? का हा संसारच चुकीचा आहे ? त्या दोघांच्या तोंडांतून शब्द निघत नाहीं, आणि आम्हां दोघांच्या तोंडाला खळ पडत नाहीं. प्रेम असें बोलकें आहे, कीं असें मुकें आहे ? प्रेमामुळें कलह वाढतो का कलहामुळें प्रेम वाढतें ? प्रेमळ परिचयामुळें अनादर होतो, कीं अनादरापासून परिचय प्रेमळ होतो ? सौंदर्याच्या ठिकाणीं गुण दिसूं लागतात, कीं गुणाच्या ठिकाणीं सौंदर्य दिसूं लागतें ? पांच वाजल्याची पांच वेळा खणखणीत वर्दी देऊन घड्याळ एकदम बंद झालें ! पण हृदयाच्या एकेका धडकीबरोबर जगाच्या नजरबंदीचें एकेक सुंदर कोडें माझ्या हृदयांत धडकूं लागलें. या सुंदर कोड्यांचीं उत्तरें देणारा एखादा जादूगार भेटला तर माझ्या पांची प्राणांच्या मोलांनीं—हो पण तो जादूगार भलत्या सलत्या स्वरूपानें येऊन कामा नये ! त्या जादूगारानें प्रभाकराच्या रूपानें—नको नाहीं तर, प्रभाकरच त्या जादूगाराच्या रूपानें आले तर काय वाईट ? [ प्रभाकर येतो. ] प्रभाकरांना अगदीं शंभर वर्षें आयुष्य आहे. पण हीं शंभर वर्षें ते कुणाच्या सहवासांत घालविणार आहेत बरें ? या प्रश्नाचें एकरूप उत्तर मी, आणि माझ्या सर्व कोड्यांचीं एकवटलेलीं उत्तरें म्हणजे प्रभाकर.

**प्रभाकर**—वाः मनोहरा, या वेळीं खेळ पण खेळ शोधून काढलास. एका बाजूला मनोहर आणि एका बाजूला मालती, ही लतिका, कुसुम, कुसुद शिवाय इंदु आणि बिंदु; आणि इतक्यांच्या भरतीला शेजारपाजारचें सुंदर साह्य. खेळाच्या संग्रामांत स्त्रियांसारखे गोड प्रतिस्पर्धी सांपडायचे नाहींत.

[ राग **भीमपलास**, ताल **त्रिताल** ]

**स्त्रिया रणिं बद्धपरिकरा । स्नेहबद्धशा प्रिय गमाति नरां॥ ध्रु० ॥**
**रंगक्रीडेमाधें रमणीया ॥ क्रीडारंगीं तेंवी रुचिरा ॥ १ ॥**
**संसाराच्या खुलविति खेळा ॥ खेळाच्या नटाविति संसारा ॥ २ ॥**

मनोहरा, या सुंदर गराड्यांत सांपडल्यामुळें तुझा घाबरा चेहरा पाहिला म्हणजे तूं नुकताच एखाद्या रोगांतून—निदान देवीच्या रोगांतून—उठल्यासारखा किंवा निदान देवीच्या हृद्रोगानें पछाडल्यासारखा तरी दिसतोस. मनोहरा, तुला काडीची सुद्धां अक्कल नाहीं, म्हणूनच तूं बुद्धिबळें खेळायला तयार झालास. बघूं या कुणीं कुणावर काय डाव केला आहे तो. [ पाहून ] वाः, तुझा राजा

समोरच्या सैन्याच्या जास्त पकडींत आहे, कीं तूं स्वतः या सुंदर सैन्याच्या जास्त पकडींत आहेस, हें सांगतां येणें फार कठीण! तुझ्या डावाची अशी दुर्दशा कां व्हावी हें कांहीं कळत नाहीं. कारण इतक्या सुंदर प्रतिपक्ष्यांशीं एकट्यानें लढण्याइतका गाढवपणा केल्यामुळें तुझ्या बाजूला हत्तीघोड्यांपेक्षां टाकाऊ का होईना, पण तुझ्यासारख्या एका मोहऱ्याची अधिक भरती झाली आहे. मालतीकडेच लक्ष गेल्यामुळें हा प्रकार झाला नाहीं ना? पण तसें म्हणावें तर तितक्याच मूढ वृत्तीनें मालतीचें लक्ष तुझ्याकडे वेधलें आहे! लतिके, हीं जनावरें वांचविण्याची आणि हीं दोन एका ठिकाणीं बांधून टाकण्याची कुशलता तुझी आहे तर मग?

**मनोहर**—छेः, तूं ठिकाणावर नव्हतास म्हणून तिची बुद्धिही ठिकाणावर नव्हती.

**लतिका**—दादा, तूं सुद्धां बोलायला लागलास? प्रभाकर, तुम्ही कां थांबलांत बोलतांना? प्रारंभ कसाही केलात तरी शेवटीं शेवटीं एखाद्या विषयावरचें तुमचें बोलणें मोठें सुंदर होतें!

**प्रभाकर**—लतिके, या वेळीं मात्र शेवटीं शेवटीं माझ्या बोलण्याचा विषय सुंदर होता. सुंदर विषयावर सुंदर कोण बोलणार नाहीं? कोणताही विषय आपल्या उपासकाला तद्रूप केल्याखेरीज सोडीत नाहीं. भूगर्भशास्त्राच्या निमित्तानें दगडाधोंड्यांसारख्या जड पदार्थांचा विद्यार्थी मनोहर सुद्धां जर दगडासारखाच निर्विकार होतो, तर मग सौंदर्यासारख्या जिवंत आणखी चंचल विषयानें मलाहि तद्रूप करून टाकलें तर त्यांत काय नवल? तुमच्या सुंदर समूहांत पाऊल टाकल्याबरोबर बिचाऱ्या तरुणाची काय दशा होते याची तुम्हांला कल्पनाही नसते. एकीकडे भ्रूधनुर्भंग, तर एकीकडे नयनबाणांचा वर्षाव! शिस्तीसाठीं वाखाणलेल्या अशा इंग्रजी सैन्यांतून सुद्धां नवख्या वाटसरावर शस्त्रांचा मारा करण्यापूर्वी कोण काय याची चौकशी करण्याची तरी वहिवाट असते; पण मदनाच्या या सुंदर सैन्यांत अनोळखीपेक्षां ओळखीवरच जास्त मारा असतो! अंतरंगींचा हा ओळखीचा चोर जीवें न सोडी अशापैकीं प्रकार करून सोडतो; आणि आपल्या पांची प्राणांवर दरवडा पडत असतांना संसारयात्रेचा तरुण मुशाफर या चोराच्या तोंडाकडे टकमका पहात रहातो! लतिके, इंग्रज सरकारनें आम्हां तरुणांना कायद्यानें निःशस्त्र केलें; पण स्त्रियांविषयींचा इंग्रजी

पक्षपात स्त्रियांच्या या शस्त्रास्त्रांना तर हात लावीत नाहींच, पण विद्यादानानें उलट त्यांना अकलेची जोड मात्र देत आहे.

**लतिका**—कायद्याच्या कलमांनीं तुमच्या या वाक्‌बाणांची तीव्रता कांहीं कमी झाली नाहीं.

**मनोहर**—या युद्धाच्या समाप्तीसाठीं आम्हीं तटस्थांनीं काय करावें हें कळत नाहीं.

**लतिका**—एकमेकांकडे पहात तटस्थ बसलें म्हणजे झालें.

**मालती**—लतिके, प्रेमविषयाची भेट म्हणजे निवडक मुक्ताफळांची ओंवाळणी असें तर नाहीं ना तुला वाटत ? प्रभा, आलास तसा वेड्यासारखा बोलायला लागलास ! कुठें आणि काय बोलावें याचा विचार तुला फार थोडा राहातो.

**प्रभाकर**—ताई, तुझ्या मनाप्रमाणें असावयाला पाहिजे ती गंभीर मूर्ति या मनोहराची आहे; प्रभाकराची नव्हे. पहा, जणूं काय तुम्हां दोघांच्या गंभीर प्रेमाचें संगमरवरी स्मारकच करून ठेवलें आहे कोणीं ! ताई, सौंदर्य हें परमेश्वरस्वरूप आहे; आणि परमेश्वर वाचाळाला मुका करतो, आणि मुक्याला वाचाळ करतो. हा मनोहर जरासा मुखस्तंभ आहे; नाहीं तर इतक्या दिवसांच्या याच्या परिचयानें मुक्याला वाचाळता कशी येते हा प्रीतिशास्त्रांतला पहिला धडा तुला तोंडपाठ झाला असता !

**लतिका**—हें काय हो ? तुम्ही काय बोलतां याचा विचार केलात का ? भारीच चंचल तुमची जीभ ! तुमच्या बोलण्याचा अर्थ अगदीं भलता होतो.

**मालती**—लतिके, नुसती जीभ चंचल आहे का तोंडही चंचल आहे ?

**मनोहर**—प्रभा, तरुणींच्या पुढें नेहमीं मर्यादशील रीतीनें वागावें ! लतिकेच्या तोंडावर अशीं मुक्याची मीमांसा करतांना तूं जरासा विचार करायला हवा होतास.

**प्रभाकर**—या अविचाराला कारण हिचें तोंड ! हें पहा, मनोहरा, नुसत्या पक्षाभिमानामुळें मालतीच्या प्रेममंदिरांतली पाषाणमूर्ति सुद्धां बोलूं लागली, मग माझा काय अपराध आहे ? मी तर वाङ्मयाचा विद्यार्थी, सरस्वतीच्या वाहनाभोंवतीं सुंदर नेत्रांची प्रभावळ असते. आराध्य देवतेवरची नजर ढळून तरुण भक्तांची दृष्टि जर या सुंदर अलंकारांकडे जडली तर तो

अपराध कोणाचा ? माझ्या भोंवताली सौंदर्याच्या क्रीडांनीं काय गौड-बंगाल मांडलें आहे त्याची तुला कल्पना तरी आहे का ? पहा भोंवतालच्या या मुखमंडलांकडे. प्रेमादरानें पहाण्याचा सन्मान केल्यामुळें एका मुखमंडलावरची भ्रुकुटी विनयशील लज्जेनें खालीं वळते आहे, तर न पहाण्याच्या अनादरामुळें दुसऱ्या मुखमंडलावरची भ्रुकुटी तितकीच वर चढत आहे ! तीव्र दृष्टीच्या किरणांनीं एका गालावर लाजाळू जखम होते आहे, तर दुसरीकडे उपेक्षेमुळें त्या जखमेच्या तीव्र वेदना उत्पन्न होत आहेत ! लोभी दृष्टीमुळें एका मुखाला आपला अधर दुसऱ्या अधरानें दाबून लपवावा लागत आहे, तर दुसऱ्या मुखानें मत्सरामुळें आपलेंच अधरखंडन चालविलें आहे ! विरक्त दृष्टीनें पाहिल्यामुळें झालेल्या अनादरानें एका हृदयावरचा पदर निराशेच्या जड निश्वासानें हालत आहे, तर नजरेला नजरेची ओळख पटल्यामुळें दुसऱ्या हृदयावरचा पदर उत्कंठेच्या दणदणाटामुळें हादरत आहे ! एका मूर्तीला स्पर्श न केल्यामुळें मत्सरानें कंप सुटत आहे, तर दुसरीकडे स्पर्शाच्या कल्पनेमुळें–कीं लतिके, अस्पर्श्यवृत्तीच्या कल्पनेमुळें ?

**मनोहर**—सरस्वतीच्या तरुण उपासका ! तुझ्या देवीच्या मंदिरांत हा भ्रष्टाकार होत आहे.

**प्रभाकर**—मनोहरा, भलत्या टीकेंत काय अर्थ आहे ? नुसत्या काकदृष्टीच्या स्पर्शमात्रानें सौंदर्याची मनोमयी मूर्ति दूषित झाली, तर मला त्यांत आनंदच वाटेल. तरुणाला आनंददायक यापेक्षां दुसरी गोष्ट तरी कोणती आहे ? लतिके, सौंदर्याच्या उन्मादानें वाणी बेताल झाली तर तो सुंदर दोष कुणाकडे ?

**लतिका**—तुम्हांला पुन्हा सांगतें, कीं बोलतांना तुम्हांला भान राहात नाहीं. मघांपासून मनोहर तुम्हांला हंसत होता.

**प्रभाकर**—हंसेना मला.

**लतिका**—आणि मलाही हंसत होता.

**मनोहर**—प्रभा, मघांच्या तुझ्या बोलण्यांत तूं जो विरोध दाखवीत होतास, त्यांतल्या प्रत्येक वाक्याच्या पूर्वार्धात तुझ्या कृपादृष्टीचा विषय इथून तिथून तुझ्या बोलण्याचा सुंदर विषयच होता. अवकृपेची वांटणी मात्र निःपक्षपातानें होत होती खरी—

[ राग **तिलककामोद**, ताल **दीपचंदी** ]

**स्वसखीस्तुतिचें ध्रुवपद तूझें । प्रिय तिजवांचुनि गमत न दूजें ।। धृ० ।। त्या खुलवाया कडवें म्हणसी परनिंदापर हो जें । सार्थ नाम त्याचें कीं रसना पुनरुच्चारा लाजे ।। १ ।।**

**प्रभाकर**—मनोहरा, दगडांवर मतें देतां आलीं म्हणजे सौंदर्यासंबंधीं बोलण्याचा अधिकार येत नाहीं. नक्षत्रांच्या पसाऱ्यांतून नेमक्या चंद्रावर दृष्टि खिळून राहिली, तर त्यांत चूक कोणती झाली ? लतिका सर्वांत सुंदर आहे हें म्हणणें म्हणजे दुसऱ्याचा अपराध होतो का ? अकालीं वृद्ध झालेल्या गंभीर पुरुषा, मालतीची निर्विकार मूर्ति आणि तिचें निर्विकार चित्र यांतला भेद तुला तरी सांगतां येईल का ? आतां लतिकेकडे पहा ! कवितेचा व्यासंगी म्हणून कपोलकल्पित वर्णन तुला सांगत नाहीं. पहा या गालाकडे—

[ राग **झिंजोटी मांड**, ताल **केरवा** ]

**वदनफलाचें । आहे वेष्टन साचें ।।धृ०।। तांबुस वर्णें सुचविति दंतांसी । पक्व असें सुरसाचें ।।१।। दंतमण्यांची माला झांकित कीं । रक्तावरणचि तीचें ।।२।।**

यौवनाच्या पहिल्या प्रहरांत प्रीतीच्या मंदिराभोंवतीं गालाच्या गुलाबी ठाण्यावर लज्जेचा नाजूक पहारा असतो. बदलत्या ऋतुमानाचे—सोडून दिला हा विषय—बदलत्या वयोमानाचे फेरफार आधीं गालावर पहावयाला सांपडतात. सौंदर्याच्या चढत्या कादंबरीचें हें कपोलकल्पित तात्पर्य सत्यापेक्षांही सुंदर असतें. हिंदुस्थानचा इतिहासभूगोल आहे का तुझ्या लक्षांत ? आपल्या भरतभूमीचें स्त्रीदेहांत एक चित्र रेखाटलेलें आम्हीं एकदां पाहिलें होतें. योगायोगामुळें गालाच्या ठिकाणीं पानिपतची रणभूमि होती. इतिहास आणि भूगोल या दोन्ही दृष्टींनीं भारतभूमीचा पानिपत हाच कपोलप्रदेश ठरतो. भारतीय युद्धानें द्वापारयुगाचा शेवट केला तो पानिपतावर ! रजपुतांची सत्ता अफगाणांच्या ताब्यांत पानिपतानें दिली ! मोंगलाई सिंहासन पानिपतावर स्थापन झालें ! आणि मराठेशाहीचा मोड करून इंग्रजी सत्तेला मार्ग मोकळा करून देण्यासाठीं अहमदशहानें हिरवें निशाण रोवलें तेंही पानिपतावर ! बाल्यावस्थेंतून

यौवनावस्था स्त्रीदेहांत संचरूं लागली म्हणजे तिच्या विजयाचें नवें निशाण आधीं गालावर फडकूं लागतें. यौवनाचा दुबळ्या वृद्धापकाळांत शेवट करण्यासाठीं काळाचा कठोर घाव गालावरच्या सुरकुत्यांनीं दिसूं लागतो. तें बघ. आपल्या वृद्धापकाळाची मूर्ति मीं कल्पनेपुढें उभी केली कीं काय म्हणून लतिका रागानें माझ्याकडे पाहूं लागली. तें बघ. बदलत्या मनोविकाराची नवी निशाणी अगोदर गालावरती दिसूं लागली.

**मनोहर**—या वेळीं किती रागाच्या नजरेनें ती तुझ्याकडे पहाते आहे! गालांवरून दृष्टि उठवून जरा वर नजरेकडे तर लाव. जरा वर पहा.

**प्रभाकर**—गालाच्या वरची पायरी नजरेची, तर वर्णनासाठीं एक पायरी वर जाऊं. गालासाठीं भूगोल झाला तर दृष्टीसाठीं खगोल घेऊं. या दृष्टींत मंगळाची आरक्तता आहे, तर शुक्राची प्रेमळता आहे. विशाल नेत्रांना गुरूची गंभीरता आहे, तर बुधाची चंचलता आहे. ही दृष्टि रविकिरणांप्रमाणें तेजस्वि-प्रकाशदायिनी आहे, तर चंद्राची शीतलताही देणारी आहे. सर्व ग्रहांच्या सारांश—रूपानें एकवटलेल्या या नेत्रांच्या तारामैत्रकांवरूनच षडाष्टकखडाष्टक पहायचें सोडून देऊन उरलेल्या राहुकेतूंच्या शिताफीनें आमचे वाडवडील अनुरूप वधूवरांची योजना करण्यासाठीं कागदाचे कपटे जुळवीत बसतात हा केवढा चमत्कार आहे! तो पहा, नेत्रांचीं शुभ्र किरणें अधोमुखानें उतरतांना गालाच्या गुलाबी रंगाच्या ऊर्ध्वमुखी किरणांशीं जिथें एकरूप होतात, त्या सीमारेषेवर असलेला, मनोहरा, एकच काळसर तीळ सौंदर्याचें हें चालतेंबोलतें काव्य सर्वांगपरिपूर्ण केल्यावर, काव्यरसाची सीमा झाली हें दाखविण्यासाठीं विधात्यानें या तिळाचा गालावर हा सुंदर पूर्णविरामच देऊन ठेविला आहे.

**लतिका**—आज माझ्या वर्णनांत अगदीं तीळ उणा पडून द्यायचा नाहीं, असा तुमचा संकल्प दिसतो.

**प्रभाकर**—असलें सुंदर काव्य आपल्या तोंडीं असावें अशी कोणता रसिक इच्छा करणार नाहीं?

[ राग **खमाज**, ताल **त्रिताल** ]

**करि मोहवश ना कसा । हा । नवकाव्यागम**
**रसिकमानसा ॥ धृ० ॥ रमवि सुखिं न त्या वरुनि**

मुखरता। शमवि न सुरसें कवण रसरता।
हृदयापिपासा॥ १॥

**लतिका**--बरें, हें रामायण आटोपणार तरी केव्हां?

**प्रभाकर**--नवरामावर्णनपर एक सुंदरकांडच या रामायणांत असल्यामुळें तें तितकें कंटाळवाणें व्हायचें नाहीं. तुला माझ्या बोलण्याचा राग येतो, पण नवयौवनाची तरल लीला नाजूक विनोदावांचून वर्णन करितां येईल का? आणि आपल्या सुंदर विनोदाचा नवयुवतीच्या सलज्ज स्मिताकडून सत्कार करविण्यासाठीं रसिक तरुण कोणता अपराध करायला तयार होणार नाहीं? लतिके, तुम्हां सर्वांचा सुंदर मेळा बाल्यावस्थेची सीमा ओलांडून यौवनाच्या अनोळखी प्रदेशांत पहिलें पाऊल टाकायला तत्पर झाला आहे. यौवनाच्या नव्या देणग्या त्यांचें मोल कळल्यामुळें दृष्टीआड करण्याची प्रौढ सावधगिरी या वयांत आलेली नसते. नव्या वैभवाचा अभिमान बाळपणाच्या शेवटच्या चपळपणानें नकळत व्यक्त होतो, आणि यौवनाच्या पहिल्या लाजाळूपणामुळें पुन्हां अदृश्य होतो! हा सुंदर चमत्कार पूर्वी आणि नंतर केव्हांही दिसत नाहीं! या सुंदर लपंडावांत मनोवृत्तींना अचुक हुडकून काढतांना भांबवलेल्या तरुणाचे प्राण शेवटीं डोळ्यांत उतरण्याचा प्रसंग येतो, आणि प्राणरक्षणासाठीं त्याला अमृताची जरूर भासते.

**लतिका**--सारखें इकडे पाहून असें वेडेंवाकडें बोलूं नका. लहानपणाप्रमाणेंच आतां सुद्धां मोकळ्या धिटाईनें कुणाच्या तोंडाकडे पाहाणें चांगलें का?

**प्रभाकर**--गरजवंताला अक्कल नसल्यामुळें धीटपणाचें अवलंबन करावेंच लागतें. सौंदर्याची खरी किंमत कळण्याच्या वयांत आरशांत आपलें सौंदर्य पाहातांना आपलें वैगुण्य लक्षांत येऊन ओशाळेपणामुळें तरुणाचें तोंड दिवसेंदिवस काळवंडत जातें, आणि सौंदर्यासाठीं त्याला स्त्रियांच्या तोंडांकडें पाहावयाचा प्रसंग येतो. धांदलीच्या वेळीं नाइलाजानें धीट कोण होत नाहीं! या वेळीं वृत्ति किती तदाकार होते म्हणून सांगूं! सौंदर्य प्रेक्षकाला तद्रूप करून सोडतें यांत नवल काय? कुटिल केशपाशावरूनच कुटिल विचारांकडे ओढा वळतो तर विशाल वक्षःस्थळामुळें विशाल अंतःकरणाची उदारता

येते. (मदिराक्षीच्या निरीक्षणानें दृष्टि धुंद होते तर मीनाक्षीच्या कटाक्षामुळें जीव माशासारखा तळमळूं लागतो.)

**लतिका**—आल्यापासून एखाद्या भाटासारखे बडबडत आहांत.

**प्रभाकर**—ठीक आहे, हा एकदम गप्प राहिलों. आतां तोंडाला तोंड दिलेंस तर मुक्याचें व्रत सोडणार नाहीं.

**लतिका**—शंभर अंक मोजतें हां मी आतां. अगदीं सावकाश मोजतें. बघूं बरें गप्प राहतां का ?

**प्रभाकर**—हं.

**इंदु**—बिंदुताई, पाहिलेंस ना हें ? आपल्याला वाटत होतें, कीं आपण सुंदर नाहीं म्हणून; पण आज प्रभाकरांनीं सरसकट सर्वांनाच सुंदर म्हटलें व आपल्याला कांहीं वगळलें नाहीं.

**बिंदु**—भलतेंच कांहीं तरी ! मी पण सुंदर नाहीं, आणि तूं पण नाहींस.

**इंदु**—अग, निदान दोघी मिळून तरी एका सुंदर मुलीसाठीं सामुग्री नाहीं का आपल्या तोंडावर ?

**बिंदु**—सुंदरपणासाठीं अशी वर्गणी जमा करून का कुठें होतें ? सुंदरपणाचा सलंग वाण असावा लागतो.

**इंदु**—मला नाहीं खरें वाटत हें. प्रभाकरांनाच विचारतें मी. ( प्रभाकराजवळ जाते. ) प्रभाकरदादा, मी आपलें मुद्दाम विचारतें तुम्हांला. आत्तां तुम्हीं सगळ्याजणींना सुंदर म्हटलेंत त्यांतून आम्हांला वगळलें होतें का ? का आम्हांलाही सुंदर म्हणालांत ?

**प्रभाकर**—( स्वगत ) मदनाच्या सुंदर सैन्याशीं तोंड देतां देतां अखेर बाजारबुणग्यांशीं गांठ घेऊन पडली ! नयनांच्या बाणांतून निभावलों, पण वांकडया-तिकडया भिवयांच्या विळ्या-कोयत्यांतून पसार होणें फार कठिण आहे.

**इंदु**—काय म्हणतें मी ? मी सुंदर आहे का ? बिंदुताई सुंदर आहे का ?

**प्रभाकर**—( स्वगत ) यंदा संक्रांत तरुण पुरुषांवर आहे कीं काय ? ( उघड ) लतिके, झाले का शंभर अंक मोजून ? इकडे माझीं शंभर वर्षें भरायची वेळ आली आहे.

**इंदु**—हें काय गडे प्रभाकरदादा असें ? आमचे ना तुम्ही ?

**प्रभाकर**—( स्वगत ) बाय जोव्ह, फ्रेल्टी इज दाय नेम, ओ वूमन. मूर्ख मनुष्याची कोटी आणि कुरूप पोरीचा लडिवाळपणा अशी बेढब जोडी आमच्या हिंदु समाजांत सुद्धां सांपडायची नाहीं. ( उघड ) काय म्हणतेस, इंदुताई ?

**इंदु**—नाहीं, म्हटलें, मघांपासून तुम्ही सगळ्याजणींना सुंदर सुंदर म्हणत आहांत, त्यांत आमचीही जिम्मा झाली का ? मालतीताई आणखी लतिकाताई यांच्या पलीकडेच आम्ही दोघी बसलों होतों.

**प्रभाकर**—मी जरासा अविचारी असल्यामुळें इतक्या दूरदृष्टीनें मी कधींच बोलत नाहीं. चुकून तुम्हांला सुंदर म्हणून गेलों असेन तर मला क्षमा करा. लतिके, हीं कोळशांतलीं माणिकें उघड्यावर टाकूं नकोस म्हणून आपल्या बाबांना बजावून सांग.

**लतिका**—आम्ही सगळ्या एकाच कुळांतल्या आहोंत. त्या तशा असतील तर मी सुद्धां कोळशांतलें माणिकच आहें.

**प्रभाकर**—अगदीं बरोबर आहे ! मात्र जरा निराळ्या अर्थानें. कोळशाच्या खाणींतच हिरकणी सांपडते, हा जगाचा अनुभव आहे. हीं रत्नें कुणाच्या गळ्यांत पडणार आहेत कुणास कळे ! यांच्या लग्नानंतर वर्षाच्या आंत दोन तरुण संन्यासी जन्माला येतील, दोन आईबापांच्या जोड्या पुत्रांवांचून परदेशी होतील, आणि अन्नवस्त्राचे दोन खटले सरकारांत दाखल होतील.

**लतिका**—माझ्या माणसांना असें वेडेंवांकडें मी बोलूं देणार नाहीं.

**प्रभाकर**—या वेडेवांकडेपणाबद्दल ब्रह्मदेव जबाबदार आहे. सौंदर्य प्रेक्षकाला तद्रूप करतें. हा माझा सिद्धांत एकाहून अधिक अर्थांनीं खरा आहे. किलकिल्या डोळ्यांकडे पहातांना तरुणांनीं जराशी डोळेझांक केली, तिरक्या नाकाकडे पाहून नाक मुरडलें, काळें तोंड पाहून तोंड काळें केलें तर ती त्या सौंदर्याशीं तदाकार वृत्ति नाहीं का ? जगाची गंमत पाहण्यासाठीं ओंठाच्या सज्जांत येऊन बसलेल्या दातांची प्रभावळ पहातांना कोण दांतओंठ चावणार नाहीं ? मानेवर मस्तकाची कलथी बैठक पाहून कुणाचें डोकें ठिकाणावर राहील ? भुरक्या केंसांचें छत पाहिल्यावर माथ्यांत राख न घालण्याइतकी शांतता एखाद्या साधूच्या ठिकाणींसुद्धां असंभवनीय आहे. तुझ्या माणसांची मी हेटाळणी

करतों असें नाहीं. या मुलींना पाहण्याकरितां म्हणून जे नवरदेव येतील, त्यांचें चेहरे मात्र पाहण्यासारखे होतील.

**लतिका**—त्यांचीं लग्नें करण्याची जबाबदारी माझ्या बाबांच्यावर आहे. माझे बाबा कांहीं दुसऱ्या कुणासारखे गरीब नाहींत.

**प्रभाकर**—हा काय माझ्या गरिबीला टोमणा मारला वाटतें ?

**लतिका**—राग आला वाटतें तुम्हांला ? मघांच्या दोन संन्याशांपैकीं एक आतांच अवतरणार असें वाटतें. बाकी तुमच्या गरिबीला असा फकिरी बाणा चांगला शोभून दिसेल !

**प्रभाकर**—लतिके, हें तुझें प्रेमाचें बोलणें नव्हे.

**लतिका**—हें माझें बोलण्याचें प्रेम आहे. कुणीं सांगितलें तुम्हांला माझें तुमच्यावर प्रेम आहे म्हणून ? माझें कांहीं तटलें नाहीं इतक्या गरिबीनें प्रेमाचा सवदा ठरवायला.

**प्रभाकर**—लतिके, मी गरीब असलों आणखी तुझा बाप लक्षाधीश असला तरी माझ्या प्रेमाचा असा बाजार तुला करूं देणार नाहीं.

**लतिका**—आणि मघांशीं त्या बापड्या पोरींच्या चेहरेपट्टीचा मीनाबाजार मांडतांना तुम्हांला नाहीं कांहीं वाटलें ? तुमची नको का शोभा व्हायला ?

**मालती**—ताई, बोलण्यानें बोलणें वाढवून दोघांचीही शोभा करून घ्यायची आहे का ? प्रभाकराला असें बोलणें तुला शोभतें का ? इतका तोंडाळ-पणा मुलीच्या जातीला बरा नव्हे.

**लतिका**—मला शहाणपणा शिकवायला तूं नकोस ! ( प्रभाकराला ) अहाहा, तुम्हांला फार आनंद होत असेल आतां, नाहीं ? मनोहरदादा, मालती मला शिकवायला आली. माझी कड घेऊन तूं कां नाहीं सांगत कुणाला कांहीं तरी ?

**प्रभाकर**—तो काय सांगणार दगड ? लतिके, एकदम सांग, तुझें माझ्यावर प्रेम आहे कीं नाहीं ? नाहीं कीं होय तेंच सांग.

**लतिका**—नाहीं.

**प्रभाकर**—मग इतक्या दिवस खोटें कां सांगितलेंस ?

**लतिका**—मूर्खाला फसविण्यापासून किती करमणूक होते माहीत तरी आहे तुम्हांला ?

**प्रभाकर**—लतिके, आज इतके दिवस त्याच करमणुकीचा अनुभव घेतों आहें मी! तुझा चंचलपणा मला माहीत नाहीं कीं काय? नीट लक्षांत ठेव, माझेंसुद्धां तुझ्यावर कधींही प्रेम नव्हतें.

**लतिका**—असें का? मग तोंड दुखेपर्यंत मघांशीं माझ्या तोंडाची तारीफ करीत होतां, ती कां?

**प्रभाकर**—तोंडापुरतें बोलायला मला काय हरकत आहे? लतिके, तूं सुंदर असशील, पण तुझें तोंडसुद्धां पाहूं नये. लक्षाधीशाची मुलगी असशील, पण कवडी किंमतीची तुझी योग्यता नाहीं.

**लतिका**—(रडत) प्रेमाचें सोंग आणलेंत, तें हीं मुक्ताफळें उधळायला वाटतें?

**प्रभाकर**—हो; एरवीं हीं डोळ्यांतल्या आसवांचीं मुक्ताफळें कशीं दिसलीं असतीं?

**मनोहर**—प्रभाकरा, मला हंसतां हंसतां आज दगडधोंड्यांचा अभ्यास चालविला आहेस वाटतें? लिहितांना अक्षरें मोत्यासारखीं असलीं म्हणजे साजून दिसतात; पण तोंडांतून निघतांना अशा मुक्ताफळांना दगडांधोंड्यांचें रूप येतें. विनाकारण तिला रडविलीस खरी.

**प्रभाकर**—काय मूर्ख मनुष्य आहेस! तिला रडविण्याकरितां मी बोलेन? लतिके, खरें सांग, तूं कां रडायला लागलीस? माझें तुझ्यावर इतकें प्रेम आहे, तें तुला रडविण्याकरितां का?

**लतिका**—मला नाहीं माहीत. मालतीताई, हंसूं नकोस. मनोहरदादा, माझ्या रडण्याचें असें हंसें व्हावयास नको आहे.

**प्रभाकर**—नाहीं, पण मी तुला कठिण काय बोललों तें सांग.

**लतिका**—मी कधीं म्हणालें असें?

**प्रभाकर**—ऐक मनोहरा, झाली खात्री तुझी? माझें तिच्यावरचें प्रेम अढळ आहे. रागाच्या भरांत कठिण शब्द बोलेन ते कांहीं खरे नाहींत. शिवाय लतिका आधीं कठिण बोलली, म्हणून मला बोलण्याचा प्रसंग आला. ती जराशी चंचल आहे.

**लतिका**—मी चंचल? आणि तुम्ही अगदीं दगडासारखे स्थिर असाल!

**प्रभाकर**—झाली पुन्हा सुरवात ! लतिके, खरें सांगूं, तुझ्याजवळ बोलण्याची सोयच नाहीं मुळीं.

**लतिका**—तुमच्याजवळ सोयीचें बोलणेंच नाहीं मुळीं.

**मालती**—प्रभा, गोड शब्दांनीं बोललें तर काय होईल बरें ?

**प्रभाकर**—सहा न् चार दहा पावसाळे तुझ्यापेक्षां जास्त पाहिलेले आहेत.

**मालती**—आणि हा अकरावा पाहिलास आतां ! पहिल्यासारखे दोन मायेचे शब्द बोललास, तर वाईट का होईल कांहीं ?

**लतिका**—ताई, ती सारी शब्दाची माया होती. मला यांचा स्वभाव पहिल्यापासून माहीत आहे.

**प्रभाकर**—म्हणून माझ्यावर प्रेम करीत होतीस वाटतें ?

**लतिका**—प्रेम नाहीं म्हणून म्हटलें आहे ना मीं ?

**प्रभाकर**—साफ खोटें आहे हें. तुझें प्रेम खात्रीनें माझ्यावर आहे. मघाशीं रडलीस कशी मग ? जाळावांचून कड नाहीं आणि मायेवांचून रड नाहीं.

**लतिका**—प्रेमासाठीं रडले वाटतें तुमच्या ? डोक्यांत दगड घातला तर सातां जन्मांचा वैरीसुद्धां रडायला लागेल. माझ्या आईची आठवण होऊन रडलें मी ! माझी आई आज असती तर माझे असे धिंडवडे कां निघाले असते ?

**प्रभाकर**—सातां जन्मांचा वैरी म्हणून तुझे धिंडवडे काढण्याची माझी इच्छा नाहीं, पण पुढच्या सात जन्मांचा सलोखा करण्यासाठीं तुझी वरात काढण्याची—

**लतिका**—लोक हंसतात त्याचें तुम्हांला कांहींच का वाटत नाहीं ? कांहीं तरी बोलून जातां, आणि लोकांना हंसायला होतें !

**प्रभाकर**—हंसेनात ! लोकांच्या हंसण्यानें संसार कांहीं चढत नाहीं, आणि रडण्यानें पडत नाहीं. आपल्याला काय त्याचें ?

**लतिका**—हो खरेंच. मनाची एकदां लाज सोडल्यावर—

**प्रभाकर**—जाऊं दे तें. आतां पुन्हां विचारतों. आतां पहिल्यासारखें कांहीं तरी उत्तर देऊं नकोस.

**लतिका**—तुम्हीही आतां पहिल्यासारखे कांहीं तरी प्रश्न करूं नका. तुमचा प्रश्न मला ठाऊक आहे.

**प्रभाकर**—तुझें उत्तरही मला ठाऊक आहे. प्रीति कधीं जिभेनें बोलत नाहीं. ती ओठावर थरथरते, गालावर रंगते आणखी डोळ्यांत तरंगते.

**लतिका**—हें हळू बोललां असतात तर मला कळलें नसतें का ?

**प्रभाकर**—आपल्या इष्टमित्रांनीं याच गोष्टीच्या आठवणी करून देऊन वृद्धापकाळीं संसार रंगवायचा असतो. लतिके, खरें सांग, तुझें माझ्यावर प्रेम आहे कीं नाहीं ? जिभेनें नाहीं म्हण म्हणजे झालें.

**मनोहर**—तुझ्या उत्तराचा खरेपणा पटला नाहीं का तुला अजून ? शेवटीं तिला रागावतांना पाहून तुझी त्रेधा उडून तिला पूर्णपणें शरण गेलास !

**प्रभाकर**—मग त्यांत काय झालें ? न वांकायला मी का दगडाचा पुतळा आहें ? लतिके, चित्रासारखें सौंदर्य पाहिल्यानंतर चित्राप्रमाणें कोण तटस्थ होत नाहीं ? मनोहरा, जिथें गुणाचें आकर्षण असतें, तिथें सतरा वेळां भांडणें झालीं तरी पुन्हां ओढून जाण्याची पंचाईत पडत नाहीं. जिथें असें आकर्षण नसतें, तिथें मात्र तुमच्याप्रमाणें न भांडण्याची पहिल्यापासून खबरदारी घ्यावी लागते.

[ राग **खमाज**, ताल **त्रिताल** ]

**स्नेहें सुगम पंथा नराचा । क्षोभ कलहजलधीचा । शमवी**
**साचा । शांतवीतो भवरथाच्या वैरभाव चक्रांचा ॥ धृ० ॥**
**दीप अंधकारीं विपदेच्या प्रकटे उज्ज्वल देहें ॥ मोक्षमार्ग**
**सुचताती स्नेहें ॥ १ ॥**

मालतीताई, तूं हंसूं लागलीस ? लतिकेसाठीं मी तर काय, सारें जग वेडया-सारखें होईल ! तुला याचें प्रत्यंतर सगळ्यांत जास्त आलें असेलच. तुझ्या प्रेमाची याचना करायला या निर्विकार मनोहराखेरीज दुसरा एक तरी उमेदवार येतो कीं काय बघूं या बरें. [ धुंडिराज व घनश्याम येतात. ]

**धुंडिराज**—कुसुम, कुमुद, इंदु, बिंदु, आज एक गंमत होणार आहे, बरें का? पण कुणाजवळ बोलायचें नाहीं, सांगायचें नाहीं, कळवायचें नाहीं हां? अगदीं गप. आज आमच्याबरोबर कोण आलें आहे हें कुणाला सांगितलें तर रागावणार बरें का आपण ? मालतीताईजवळ तर अगदीं अवाक्षर काढायचें नाहीं, चकार शब्द काढायचा नाहीं कीं ब्र काढायचा नाहीं. आज कोण आलें आहे आमच्या-बरोबर ? कशाला आलें आहे ? थट्टा करायची आहे आज एका माणसाची !

हो, आणखी एका माणसाची पण थट्टा करायची आहे. हां, पण कुसुम, ती थट्टा आपण करायची, कीं प्रभाकराला सांगायचें ? सांगूं तुला त्या माणसाचें नांव ?

**लतिका**—काका, केलीत माझी थट्टा !

**धुंडिराज**—प्रभाकराचें नांव घेतलें म्हणजे तुझी थट्टा कशी होते बेटा ? तुला राग आला का ?

**प्रभाकर**—काका, एकाद्याचा हक्क जर आपण घेतला तर त्या माणसाला राग कां नाहीं येणार ?

**धुंडिराज**—तुला सुद्धां राग आला का, प्रभा ? तुला राग आला असेल तर हें पहा तोंड बंद केलें.

**प्रभाकर**—( स्वगत ) बोलण्याच्या भरांत मी इतकें वेड्यासारखें बोलून गेलों, कीं त्याचा अर्थ चांगल्या मार्मिकालासुद्धां कळूं नये. ( उघड ) काका, तुमच्या बोलण्याचा राग कसा येणार ?

**घनश्याम**—( स्वगत ) संसाराच्या पाशांतून याला आतां बाहेर कसा ओढून आणूं ?

**धुंडिराज**—प्रभा, राग कां येणार नाहीं ? राग यायला पाहिजे, आलाही पाहिजे आणि आलाही आहे. खरें सांग, रागावला आहेस कीं नाहीं ?

**घनश्याम**—धुंडिराजपंत. ( स्वगत ) पुढें काय बोलूं आणि कसें बोलूं ? वाहता ओघ थांबविण्यासाठीं नुसता नांवापुरता अडथळा पुरेसा होतो का बघूं या ! ( उघड ) धुंडिराजपंत, अहो धुंडिराजपंत–

**धुंडिराज**—भले शाबास ! काय गाढव आहे मी ! घनश्याम, राग खरें म्हटलें तर तुम्हांला यायला पाहिजे. बोलण्यांत एकाद्या वेळीं घसरतों तो असा बरें ? बाकी मनांत आणलें–अन् कामाची तशी निकड पाहिजे. असें बोलणें एकदम थांबवितों म्हणतां, कीं बोलण्याची सोय नाहीं. बोल म्हणतां बोलणें बंद. एकदां काय झाली गंमत, एक गृहस्थ होता निकडीच्या कामांत; फारच कामांत होता—

**घनश्याम**—तसा हल्लीं मी आहें.

**धुंडिराज**—यस्, राईट, बरोबर आहे. बोलणें दिलें सोडून. घनश्याम, ही पहा माझी मालती. आतां मात्र बोलणार ! मालती, घनश्याम, ज्या प्रसंगाला

मी भीत होतों आणि ज्या प्रसंगाची आनंदानें वाट पहात होतों, तोच हा प्रसंग. कन्यादानप्रसंगींचे अश्रु आनंदाचे असतात कीं दुःखाचे असतात, हें सांगणें मोठें कठिण आहे राया! सुस्थळीं पडलेल्या मुलीची कन्यादानानें कायमची बोळवणी करितांना जें दुःखाचें समाधान वाटतें, जें आनंदाचें दुःख वाटतें, त्याची कल्पना मुलीच्या बापाखेरीज कुणाच्या बापालाही यायची नाहीं. तुमचा मोठा फत्तर असेना, दगड का असेना, धोंडा का घ्यानात, काय सांगावें घनश्याम, नदीला सासरीं पाठवितांना पर्वताचें सुद्धां पाषाणहृदय फुटल्याखेरीज रहात नाहीं. ही पोरीची जात फार दुःखदायक! आनंदानें नटवितांना सुद्धां दुःखदायक! नथीच्या शोभेचा आनंद पहाण्यासाठीं आधीं कोवळें नाक टोंचावें लागतें. कानाला कर्णफुलें लाभण्यापूर्वी आनंदानें ते वेधून काढावे लागतात. पतिरूपी खरा अलंकार कुंकवाच्या सौभाग्यानें नांवानिशीं रेखाटण्यासाठीं आधीं कपाळाचें मातापितरांचें सुख पुसून काढावें लागतें. घनश्याम, ही माझी धनदौलत, माझ्या घराचें भूषण, माझ्यासारख्या गरीब बापाची गरीब साधीभोळी आणखी सुशील मुलगी; तिच्यांत असा मोठा गुण तो कोणता असणार?

**प्रभाकर**—काका, असें म्हणूं नका. आपण धनानें कदाचित् गरीब असाल; आणि साधारण आहांत हेंच आपल्याला मोठें भूषण आहे! आपल्या उदार मनोवृत्तीचें सुंदर फळ गरीबीमुळें कमी योग्यतेचें आहे असें आपल्याला कां वाटूं लागलें? त्या मनोवृत्ती गरिबींतही तशाच फलद्रूप होतात. खोल पाताळांत गाडलेल्या हिऱ्याच्या खाणींतून आकाशांतल्या ताऱ्यांच्या तोडीचे हिरे बाहेर येतात.

**घनश्याम**—धुंडिराजपंत, कन्यादानाच्या उदकाची आपण ही डोळ्यांनीं सुरवात केली आहे. त्यामुळें या वेळीं आपणाला मालतीचे गुण दिसत नाहींत. हेंच खरें कन्यादानाचें उदक! आपला धर्म रूक्ष मनाच्या ऋषींनीं रचलेला असल्यामुळें संसारी लोकांना न पटणारे कांहीं विधि त्यांनीं सांगून टाकले आहेत. कन्यादानाची सांगता, बापाच्या डोळ्यांतून पाण्याची धार वहात असतांना, निराळ्या उदकानें करण्याची काय जरूरी आहे? तसेंच या शुष्क वृत्तीच्या धर्मसिंधूंनीं प्रियजनांच्या मृत्यूची बातमी ऐकतांच सचैल स्नान कर-

ण्याची धर्माज्ञा करून ठेवली आहे. अश्रूंच्या मंगल स्नानानें तें कार्य आधींच होत नाहीं का ?

**धुंडिराज**—नका बोवा, घनश्याम, सुतकाफितकाचें अमंगळ बोलणें नका काढूं या वेळीं. त्याचें कांहीं प्रयोजन नाहीं या वेळीं.

**प्रभाकर**—बरें काका, कन्यादानाचें तरी बोलणें काढण्याचें काय प्रयोजन आहे, समजलों नाहीं.

**धुंडिराज**—हो, तें तसेंच राहिलें. म्हणजे मुख्यच ! मालती, हे घनश्याम तुला पहावयाला आलेले आहेत.

**प्रभाकर**—म्हणजे ? मालती पहाण्यालायक वस्तु कधीं झाली ?

**धुंडिराज**—प्रभा, अशा वेळीं फटदिशीं बोलणें म्हणजे तें शिस्तवार नाहीं, बंदिस्त नाहीं, अन् व्यवस्थेशीर नाहीं. शिवाय साजून कुठें दिसतें तें ? अशा वेळीं लाघवी बोलणें असावें. ते मालतीला पहावयाला आले आहेत. हो, तुम्ही काय म्हणालांत मघाशीं ? जरा कानाला नवीन वाटलें. काय बरें ? ओ यस्, बरोबर; ' मागणी घालायला. ' हे मालतीला मागणी घालायला आले आहेत. बरोबर आहे ना, घनश्याम ?

**प्रभाकर**—म्हणजे ? बरोबर काय आहे कपाळ ?

**धुंडिराज**—अरे, अरे, अरे ! प्रभा, अरे काय रे हें ? बोलूं नकोस म्हणून सांगितलें ना ? हां, घनश्याम, तुह्मांला काय मागणी घालायची ती बोला. ही मालती. आमची फुल परमिशन आहे. हो, आमचा संकोच वाटेल नाहीं का तुम्हांला ? आतां जो कण्वासारखा इष्टीला म्हणून जातों तो एकदम पाठविणेचे वेळीं आशीर्वादाला हजर. आण्णा किर्लोस्कराच्या शाकुंतलांतली गंमत बरें का ही ! अण्णाला बघितलें नसेल तुम्ही ? जबर पुण्याईचा मनुष्य ! आणि हा एकेक दंड ! तें ऋषीचें सोंग घेतलें म्हणजे ऋषीसारखाच दिसायचा ना ! तो धाकटा ऋषि होत असे, बरें का ? हा म्हणजे शकुंतलेचा बाप नव्हे; शकुंतलेचा बाप म्हणजे कण्व.

**घनश्याम**—कीं ज्याच्याप्रमाणें आपण इष्टीला जाण्याकरितां म्हणून—

**धुंडिराज**—चांगलें सुचविलेंत ! का हो, बोलणें जरा नादानें वाढतें का हो आमचें ? हंसूं नका ! मी तर जातोंच. पण तुमच्या भोंवतींची ही पोराबाळांचीही गर्दी कमी करतों. तुम्हां तरुण मंडळीच्या संसारांत म्हातारचळाप्रमाणे

पोरकटपणा असूनही उपयोगी नाहीं. चला, कुसुम, कुमुद, सगळे छोटे बाबा लोक, चला एकदम. हो आम्हीं लग्नाची ही नवीन इंग्रजी पद्धत काढली, मग हो मुलांना बाबालोक कां म्हणायचें नाहीं ? चला सगळे जण.

[ जातात ]

**प्रभाकर**--(स्वगत) काकांनीं काय मांडलें आहे कांहीं कळत नाहीं. या घमश्यामाच्या माथ्यांत हा बूट कुठून निघाला? वाः, काय सुंदर प्रसंग आहे! हा घनश्याम मागणी घालायला आला आहे ! हा मनोहर येथेंच आहे ! बिचारी मालती चकितच झाली आहे मुळीं ! [उघड] घनश्याम, मालतीला मागणी घालायला सुरवात नाहीं केलीत अजून ?

**लतिका**--मीं आपली वेड्यासारखी पाहातें आहे मघांपासून ! ही मालतीची मागणी म्हणजे काय ? तिच्यासाठीं घनश्यामच काय आले आहेत ? का हो घनश्याम, मालतीची मागणी म्हणजे मालती का भिक्षा आहे, का जोगवा आहे, का गोग्रास आहे ?

**घनश्याम**---ताईसाहेब, आपण अशी थट्टा आरंभलीत तर मी अधिकच बुचकळ्यांत पडणार आहें. हें पहा--बघितलेंत ? आपल्याला, कीं तुह्मांला कीं तुला ?--मी फार गोंधळून गेलों आहे--शिष्टाचाराच्या रीतीप्रमाणें आपणांला मालतीबाई म्हणावें, कीं भावि नात्याच्या कल्पनेनें मालती म्हणावें, कीं या प्रसंगाच्या चमत्कारिक अपूर्वतेमुळें कांहींच म्हणूं नये ?

**प्रभाकर**---तसें केलेंत तर फार उत्तम होईल.

**घनश्याम**---देशमुख, आपण या वेळीं मला मदत करायला पाहिजे. मालती, वधू-वरांच्या वडिलांनीं बोलायच्या या गोष्टी; काळाच्या निर्दयपणामुळें आणि तुझ्या वडिलांच्या मायाळूपणामुळें, बोलण्याचा आज माझ्यावर प्रसंग आला आहे. ही पाश्चात्य विवाहपद्धति आमच्या इकडे अगदींच अपूर्व असल्यामुळें अशा प्रसंगीं तिकडच्या तरुणीपेक्षांही आमच्या इकडच्या तरुणांना अधिक लाजल्यासारखें होऊन गेल्यास त्यांत काय नवल आहे ?

**मालती**---आमच्या सुशिक्षित तरुणांना ही मोठी अभिमानाची गोष्ट आहे.

**घनश्याम**---आपल्या उत्तेजनानें मला अंमळ धीर आला असला, तरी प्रथम आपल्याला काय प्रश्न विचारावा हा मोठा प्रश्नच आहे.

**लतिका**---आणि मालतीनें काय उत्तर द्यावें हाही मोठा प्रश्नच आहे.

**घनश्याम**—ताईसाहेब, आपण माझी विनंति विसरलां. मालती, हा मी तुझ्यापुढें उभा आहें. माझा प्रश्न स्पष्टपणें विचारण्याचें कारणच नाहीं. प्रश्नावांचून आतां उत्तर द्यायला हरकत नाहीं.

**प्रभाकर**—घनश्याम, तुमच्याबद्दल माहिती फारच थोडी सांगितलीत. मिळकतीचीं टांचणें, वंशवृक्षांच्या फांद्या, कुंडल्यांचीं पानें, सद्‌गुणांची खानेसुमारी यांच्याबद्दल बोललां नाहींत कुठें? तुमचें गोत्र, प्रवर, रास, नांव, जन्मनक्षत्र—

**लतिका**—जन्मनक्षत्राच्या उपजत जोरावरच नक्षत्रासारख्या मुली मिळविण्याचे दिवस गेले ते. जन्मकाळच्या ग्रहांवरून वधूवरांचें भविष्य ठरविण्याऐवजीं वधूवरांच्या परस्परांबद्दलच्या ग्रहांवरून जन्माचें दिव्य भविष्य ठरविण्याचा हा काळ आहे. घनश्याम, ही मागणी घालतांना तुम्ही नीटसा विचार केलेला दिसत नाहीं.

**घनश्याम**—लतिकाबाई, आपण आणि देशमुख मला फार निरुत्साह करीत आहांत. ताईसाहेब, आपल्या नोकराचा उपमर्द करणें हें धन्याला शोभत नाहीं. आणखी मला वाटतें हें जरा अप्रासंगिकही आहे.

**लतिका**—घनश्याम, नोकरानें धन्याचा उपमर्द करणें हें त्यापेक्षां अप्रासंगिक नाहीं का?

**घनश्याम**— काय समजूं मी या बोलण्याचा अर्थ?

**लतिका**—तुम्ही आमचे नोकर; मालती माझी मैत्रीण; आज मालतीला मागणी घातलीत, उद्यां माझ्याशीं लग्न करायला तयार व्हाल! वेड नाहींना लागलें तुम्हांला? जा. मालतीच्या लग्नाच्या वेळीं तुम्हांला हजर राहावें लागेल. तें नवरदेव म्हणून नव्हे, तर लग्नाच्या सामानाची यादी करण्याकरितां.

**घनश्याम**—आपण जरा जास्त बोलत आहांत. मनोहरपंत, तुम्ही मघांपासून बोलत नाहीं. बाबासाहेबांपर्यंत हें बोलणें गेलें, तर उद्यां तुम्हांला मी साक्षीला म्हणून बोलावीन. लतिकाताई, हे देशमुख आणखी आपण एकमेकांशीं सलगीनें बोलतांना या सर्व गोष्टींचा पुरता विचार करीत असाल, नाहीं!

**लतिका**—लहान तोंडीं फार मोठा घांस घेतलात हा. दुसऱ्याच्या उठाठेवी तुम्हांला कशाला हव्यात?

**घनश्याम**—माझ्या उठाठेवी दुसऱ्यांना हव्यात म्हणून. लतिकाताई, माफ करा! आपल्या वडिलांच्या टीचभर कचेरींत मी आपला नोकर आहें.

जगाच्या उघडया मैदानांत—(स्वगत) मी जास्त बोलत चाललों. (उघड हसून) लतिकाताई, आपण माझ्यांतला दोष नाहीं सांगितलात?

**लतिका**—फार सोपा प्रश्न विचारलात. तुमच्या सद्‌गुणांबद्दल विचारलें असतेंत तर माझें तोंडच बंद झालें असतें. पहिला दोष, पहिल्या प्रतीचें दारिद्य. दुसरा दोष, तुम्हांला दुसरें कोणी नाहीं.

**प्रभाकर**—आंकडेवारी हवी कशाला ही? शिक्षणाच्या नांवानें पूज्य, न घर ना दार, आईबापांचा ठाव ना ठिकाण—

**घनश्याम**—देशमुख, आईबाप नाहींत हा दोष खरा. तुमचासुद्धां हा दोष आहेच. पण तुमची कर्तबगारी अचुक! तुम्हीं आईबाप मिळवून त्यांच्या आश्रयानें शिक्षणसुद्धां मिळवलेंत! माझ्यांत ही कर्तबगारी नाहीं. मी एकल-कोंडयासारखा आपला मार्ग कापीत सुटलों. देशमुख, शाळूपोपटपंचीच्या भरांत नादानपणानें तुम्ही काय बडबडत आहांत तुम्हांला कल्पना तरी आहे? लतिकाताई, मालतीला आपण आपल्या दृष्टीनें उपदेश करीत आहांत. पण आपण श्रीमंत आहांत; दुसऱ्याच्या आश्रयावर वाढलेल्या या देशमुखांना आपण पति या नात्यानें सुद्धां आजन्म सांभाळूं शकाल. गरीब बिचाऱ्या मालतीच्या बापाला असा घरबैठा घरजांवई म्हणजे कसा संभाळतां येईल? आपल्या वडिलांच्या गजांतलक्ष्मीला हा सयामचा पांढरा हत्ती चांगला शोभेल. ताईसाहेब, माफ करा अं! माझी बेसूर बडबड आपल्या मनाला लागली असें वाटतें. परक्याच्या घरट्यांत वाढलेल्या या बाळकोकिळांचें गोड गाणें मला कोठून समजणार?

**लतिका**—सर्पासारखे तुम्ही उलटून असे विष ओकूं लागलांत? तुमचे दांत पाडून तुम्हाला निर्विष करायला मला वेळ लागायचा नाहीं.

**घनश्याम**—ताईसाहेब, जें म्हणाल तें थोडें आहे. पण मानवी सर्पाचे दांत पाडले म्हणजेच तो दंश करतो हें विसरूं नका. आपल्याला वाईट वाटलें; आतां मलाही वाईट वाटतें. आपण या बाबतींत बोलायलाच नको होतें.

**लतिका**—अमर्याद मनुष्या, तुझी कर्तबगारीची कल्पना फार बेसुमार आहे. घनश्याम, तुम्ही उद्दाम आहांत हें मला पुरतेपणीं माहीत आहे. बरें झालें, तुम्हीं मला मागणी घातली नाहींत.

**घनश्याम**—आणि असें असूनही आपण उत्तर देत आहांत. मालती, तुझ्याकडून उत्तराच्या कृपादृष्टीची मी अपेक्षा करूं का ?

**लतिका**—पुन्हां मीच उत्तर देईन. मालती माझी जिवाभावाची मैत्रीण आहे. मी सुखी व्हावें अशी माझी इच्छा आहे तसेंच मालतीनें सुखी असावें अशी माझी इच्छा आहे. मालतीचा बाप गरीब आहे म्हणून हें मागणी करण्याचें धाडस करूं नका. मालती आणि लतिका यांना निराळीं विशेषणें लागतच नाहींत.

**मालती**—ताई, उगीच शब्दाला शब्द किती वाढवितेस ! घनश्याम, तुम्हीं विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर मला विचारानें द्यायला हवें हें खरें; पण कधीं कधीं असे प्रश्न मनापुढें उभे राहण्याच्या पूर्वींच त्यांचीं उत्तरेंही सांपडलेलीं असतात.

**घनश्याम**—तुमचें उत्तर जरासें संदिग्ध नाहीं का ?

**मालती**—आपण पुरुष असून प्रश्न अडखळत विचारलांत; मग कुमारिकेच्या बोलण्यांत आपण संदिग्धता हा गुण समजणार नाहीं का ? हें पहा, हृदय ही एकच वस्तु जगांतल्या सर्व सुखांची हेतुभूत आहे. आणि ही एकच वस्तु अशी आहे, कीं जी देऊन देतां येत नाहीं आणि मागून मिळत नाहीं. पुष्कळदां तर हृदय दिल्यावर किंवा मिळाल्यावर नंतर कळतें.

**घनश्याम**—मालतीबाई, आपल्या भाग्यशाली कृपाविषयाचें नांव मला कळेल का ?

**मालती**—मला वाटतें, आपल्या प्रश्नाला मीं सांगितलें तेवढें उत्तर पुरें झालें.

**घनश्याम**—आपलें हें उत्तर कायमच आहे ना ?

**मालती**—ऐकणाराला अप्रिय उत्तर देणें हें आनंदाचें काम आहे असें का आपल्याला वाटतें ?

**घनश्याम**—मालती, माझ्या मागणीचा अनादर होईल अशी मला कल्पना नव्हती.

**मालती**—आपण मागणी कराल अशी मलाही कल्पना नव्हती. मी लतिकाताईसारखें कठिण कधीं बोलत नाहीं. पण मला या विषयाचा तिच्यांपेक्षांही कंटाळा आला आहे.

**घनश्याम**—मालतीबाई, माझ्या जीवितांतील अत्यंत महत्त्वाची आशा आपल्याला केवळ कंटाळवाणी वाटली?

**मालती**—माझ्या जीविताच्या आशेच्या दृष्टीनें. माझ्या सौजन्यामुळें आपण आतां मला विशेष त्रास देत आहांत, असें नाहीं का आपल्याला वाटत?

**मनोहर**—घनश्याम, मला असें वाटतें, कीं तुमच्या प्रश्नाचें पाहिजे तितकें उत्तर तुम्हांला मिळालें. तें अनुकूल नाहीं यामुळें तुम्हांला विषाद वाटणें स्वाभाविक आहे. पण प्रतिकूल उत्तराची उगीच ओढाताण केल्यानें त्याला अनुकूल स्वरूप कसें येणार?

**घनश्याम**—ठीक आहे; मालतीबाई, मी आपला निरोप घेतों.

**लतिका**—तिनें तुम्हांला मघाशींच निरोप दिला आहे.

**घनश्याम**—तुम्हां सर्वांना माझ्याकरितां फार कष्ट पडले. मालतीबाई, तुमचा संसार सुखाचा व्हावा एवढीच माझी परमेश्वराजवळ प्रार्थना आहे.

[ घनश्याम जातो. ]

**लतिका**—मालती, किती जड तोंडाची आहेस तूं? एका शब्दाला कांहीं ही पीडा तुला टाळतां आली नाहीं. प्रभाकर, मनोहरदादाला कदाचित् आवडलें असेल, पण मालतीची ही बोलण्याची रीत तुम्हांला आवडली का? आपल्या मनांत असेल तें स्वच्छ शब्दांनीं बोलून दाखविणें हेंच मनुष्याचें कर्तव्यकर्म असतें.

**प्रभाकर**—अगदीं बरोबर आहे तुझें बोलणें.

**मनोहर**—प्रभा, या स्पष्ट बोलण्याच्या कर्तव्यकर्मामुळेंच तुम्हां दोघांत नेहमीं इतकी कर्मकटकट चालत असते, हें तूं विसरतोस. तिच्या म्हणण्याचा चांगला विचार केलास का?

**प्रभाकर**—मनोहरा, तुझ्या अंगांत दाक्षिण्य सुतराम् नाहीं. अरे, स्त्रियांच्या सुंदर सिद्धांताला सत्यापेक्षां सौंदर्याचेंच जास्त साह्य असतें.

**लतिका**—म्हणजे? मी विचार केल्यावांचून बोलतें वाटतें? ऐक, मालतीताई.

**प्रभाकर**—ती काय ऐकणार? ती बोलल्यावांचून विचार करते. मीं म्हटलें तें कांहीं खोटें नाहीं अगदीं. माझ्या म्हणण्याचें एकंदर तात्पर्य—

**लतिका**—आतां या वेळेस या वळसे—वेलांट्या नकोत. माझें म्हणणें खोटें असतें हें खरें ना? उगीच लपवाछपव करूं नका.

**प्रभाकर**—लपवाछपव करूं नका म्हणजे? खरें बोलायला मी तुला भितों असा तुझा समज झाला कीं काय? माझीं जीं मतें आहेत तीं आहेतच.

**लतिका**—अगदीं माझ्यासाठीं सुद्धां तुम्ही आपल्या मतांत फेरफार करणार नाहीं ना?

**प्रभाकर**—तुझ्यासाठीं माझ्या मतांत एक केंसभर फेरफार करायला मी तयार नाहीं. तुझ्यासारखीं मतें फिरवायला मला तुझ्याकडून आधीं थोडा थिल्लरपणा शिकायला हवा.

**लतिका**—तुम्हीं माझ्याकडून थिल्लरपणा शिकणार? चला झालें! अहो, हे सावलीजवळून हातवारे शिकण्यासारखें होत आहे. तुम्हीं ह्मणजे थिल्लर-पणाचे मूर्तिमंत अवतार!

**प्रभाकर**—मी थिल्लर आहें, नाहीं का? लतिके, तुझ्या संथपणाची गंभीरपणाची मला काडीइतकी जरूर नाहीं.

**लतिका**—पहा बरें? मग पश्चात्तापांत पडाल?

**प्रभाकर**—अहाहाहा! पश्चात्ताप करायला काय सद्गुणांची पुतळी लागून गेली आहे! विवाहमांगल्याची मंगल मूर्ति—

**लतिका**—खबरदार भलतेंसलतें बडबडाल तर! तोंड सुद्धां बघूं नये तुमचें!

**प्रभाकर**—काय त्रास आहे पहा! जसें कांहीं हिला तोंड दाखविलें नाहीं तर मग जगांत तोंड दाखवायला जागाच कुठें उरणार नाहीं!

**लतिका**—आतां जर तोंड दाखविलेंत तर तोंड पहाणार नाहीं तुमचें.

**मनोहर**—प्रभाकर, बस कर बोलणें आतां. मघांचे गुलाब, कमळें सारीं कोमेजलीं वाटतें? आतां बोलतां बोलतां मघांच्यासारखीं पुन्हां तिची आर्जवें करायला लागशील.

**प्रभाकर**—चार पैशांचा फुलांचा पुडा आणला तर त्यांत बावन गुलाब व छपन्न कमळें येतात. अरे, मानली तर सारी बागशाही; नाहीं तर कोण्या झाडाचा पाला! मनोहरा, तुला एक मोठें तत्त्व सांगून ठेवतों संसाराच्या संगी-ताचा नेहमीं बागेश्रींत प्रारंभ होऊन भैरवांत शेवट होत असतो. मंगलाचर-णाला एकजीवाचा एकताल आणि भरतवाक्याला रुद्रताल हा ठेवलेला. ठीक आहे; लतिके, यापुढें माझें तोंड तुला कधींही दाखविणार नाहीं हीच माझी प्रतिज्ञा.

**मालती**—लतिकाताई, चल तूं माझ्याबरोबर आंत.

**लतिका**—चल ताई. ऐकलास ना बोलण्याचा प्रकार? म्हटलें आहे तें कांहीं खोटें नाहीं.

[ राग **यमनकल्याण**, ताल **दादरा** ]

**काठिण काठिण काठिण किती पुरुषहृदय बाई ।**
**स्त्रीजातीप्रति झटतां अंत कळत नाहीं ॥ धृ० ॥**
**रंगुनि रंगांत मधुर मधुर बोलती । हंसत**
**हंसत फसवुनि हृद्‌बंध जोडिती । हृदयांचा**
**सुंदरसा गोफ गुंफिती । पदर पदर परि शेवटिं तुटत तुटत जाई ॥१॥**

[ जातात. ]

**मनोहर**—अखेर भांडणांत निकाल केलास.

**प्रभाकर**—मला सर्व ठाऊक आहे. सांगूं तुला आतां ? ही एक मोठी थोरली ट्रॅजेडी होणार आहे.

**मनोहर**—ट्रॅजेडी कसली तुझ्या कपाळाची ! अशा सुंदर प्रारंभाचा विपर्यास करावयाला परमेश्वर एखाद्या नाटककारासारखा लहरी नाहीं.

**प्रभाकर**—बरें कायरे, तुझें लक्ष होतें का ? जातांना तिनें किंचित् हंसल्यासारखें केलें, तें मनापासून होतें का तिरस्कारानें होतें ?

**मनोहर**—माझें कांहीं तितकें लक्ष नव्हतें तिकडे.

**प्रभाकर**—बरोबर आहे. तुझें लक्ष असेल त्या मालतीकडे. प्रेमानें बहकलेल्या तरुणांना मनांत भरलेल्या पोरींचे चेहरे पहाण्यापलीकडे काय काम असतें ? जाऊं दे; मला त्या गोष्टीची शहानिशा करून घेतली पाहिजे. मनोहरा, खरेंच सांग, मी जरासा तापट आहे का रे ?

**मनोहर**—तुम्हां दोघांची एकच चूक होते. मनुष्यस्वभावाच्या मुख्य मुख्य गोष्टींत भिन्न मनांची मिळणी झाल्यावर परस्परांचा क्षुद्र विषयावरचा मतभेद मनावर न घेण्यानेंच प्रेमाचा परिपोष होत असतो. क्षुल्लक बाबतींत पटेनासें झालें म्हणजे एकदम प्रेमाची कसोटीच पाहूं लागणें हा फारच मोठा अविचार आहे. या दृष्टीनें मार्गक्रमण करूं लाग; म्हणजे पांच अंक मोजण्याच्या आंत तुझ्या दृष्टीस पडेल कीं ही एक कॉमेडी आहे म्हणून. चल.

[ जातात. ]

---

# प्रवेश तिसरा

[ स्थळः—धनेश्वराचें घर ]

**धनेश्वर**—( स्वगत ) पाप धृतराष्ट्रासारखें आंधळें आहे, आणि शंभर पुत्रांना जन्म देणारें आहे. धृतराष्ट्रानें ही करामत उभ्या जन्मांत एकदांच केली; पण पाप मात्र प्रत्येक पळाला आपल्या पिलांच्या प्रसव वेदना भोगीत असतें; मात्र या जन्मकाळच्या वेदना माझ्यासारख्या पापी जीवांना प्राण-संकटासारख्या वाटतात एवढेंच. भागीदाराला बुडविण्यासाठीं तयार केलेले हे खोटे दस्तऐवज इंद्रायणीच्या डोहांत बुडविले तर तुकारामाच्या गाथे-प्रमाणें ते परमेश्वर पुन्हां बाहेर काढल्याशिवाय राहाणार नाहीं. मी जर श्री-कृष्णाच्या अमदानींत जन्मलों असतों, तर मात्र हे खोटे दस्तऐवज यमु-नेच्या डोहांतल्या कालियाच्या तोंडांत कोंबून ठेवले असते. माझ्या भागीदारानें स्वतःपेक्षांही मूर्ख असा आपला मुलगाच पाठवून दिला आहे, म्हणून बरें झालें. मोरेश्वराला फसविणें हें कांहीं मोठेसें कठिण नाहीं. पण अशानें काय-मची काळजी दूर होत नाहीं ती नाहीं. छे, कोणत्याही दृष्टीनें विचार केला तरी माझा विचारच बरोबर वाटतो. लतिका मोरेश्वराला दिल्याखेरीज गत्यं-तर नाहीं. पेढीवरच्या भागीदारींत केलेले लपंडाव दडविण्यासाठीं माझ्या भागीदाराच्या संसारांत भागीदारी सुरू केल्याखेरीज आतां भागायचें नाहीं. अन् तसें म्हटलें तर लतिकेचें तरी काय नुकसान होणार आहे त्यांत? पुढें पैसा मिळविण्याजोग्या तरतरीत बुद्धिवानाला पोरगी दिली काय, आणि गर्भ-श्रीमंत गाढवाच्या गळ्यांत बांधली काय, परिणाम दोहींचा सारखाच. व्याही-संबंधानें याच्या हातांत हात घातला, म्हणजे माझ्या हातांत हातकड्या घाल-तांना त्यालाही थोडीशी भागीदारी पत्करावी लागणारच. ( घनश्याम येतो ) या, घनश्याम. घनश्याम, कोणी कांहींही म्हणो; पण लतिका मोरेश्वराला देणें हें मोठें कल्याणप्रद वाटतें बोवा.

**घनश्याम**—(स्वगत) हा इरसाल थेरडा अशा आडवाटेनें कां जातो आहे? तसें म्हटलें तर हा कांहीं चळणाऱ्यांपैकीं नव्हे. याच्या मनाचा ठाव काढण्यासाठीं याच्या पोटांत शिरण्याचा रस्ताच सांपडत नाहीं.

**धनेश्वर**—तुम्ही जरा बुचकळ्यांत पडलांत? तरुणांच्या तरतरीत बुद्धीला एखाद्या गोष्टीचा पोक्त विचार करतां येत नाहीं, हें असें एखादे वेळीं प्रत्ययाला येतें. देऊं कां हा विषय तुम्हांला नीट समजावून?

**घनश्याम**—मला वाटतें लतिकाताईनाच या ज्ञानाची फार जरुरी आहे.

**धनेश्वर**—घनश्याम, पोरवयांत तुम्ही बरीच कमाई करून ठेवली आहे. भाविक अजागळांपेक्षां तुमच्यासारखीं पाजी मनाची माणसेंच मला फार आवडतात.

**घनश्याम**—एखादे वेळीं आपली नोकरी सोडण्याचा प्रसंग आला, तर आपल्याजवळ लायकीचा दाखला मागण्याची सोयच नाहीं मुळीं.

**धनेश्वर**—तें राहूं द्या तूर्त. लतिकेला बोलवायला सांगितलें होतें ना तुम्हांला?

**घनश्याम**—ही पहा सर्व मंडळी इकडेच येत आहेत.

[ लतिका, मालती, मनोहर व मोरेश्वर येतात ]

**धनेश्वर**—या, सगळे असे ओळीनें बसा. मोरेश्वर, बसा असे लतिकेच्या समोर. लतिके, लाजली नाहींस तूं कुठें?

**लतिका**—बाबा, मला तुमची लाज वाटते. मांडलें आहे काय तुम्ही हें?

[प्रभाकर येतो]

**धनेश्वर**—बसा, प्रभाकर. लतिके, प्रीतिविवाह हिंदु समाजाला अनिष्ट आहे. मोरेश्वराचें आणि तुझें लग्न लागलें म्हणजे आपल्या दोन्ही घराण्यांचे पूर्वापार संबंध कायम राहून लौकिक वाढणार आहे; निदान लौकिक कायम तरी राहील. मी किती दूरदृष्टीनें विचार करतों आहे याची तुला कल्पना नाहीं. तुला हें लग्न कां आवडत नाहीं कळत नाहीं.

**मालती**—काका, मी सांगतें तें कारण. लग्नाला प्रीति आवश्यक असते; खरें ना?

**धनेश्वर**—भलतेंच. लग्नाला एक बोहलें, वाजंत्री, मांडव, एक भट आणि एक नवरा, इतकी सामुग्री बस्स झाली. प्रीति हें काय खूळ आहे, हेंच आपल्याला कळत नाहीं.

**लतिका**—बाबा, प्रीति हा एक नेत्ररोग आहे.

**धनेश्वर**—म्हणजे त्यानें काय डोळे येतात का?

**लतिका**—नाहीं बाबा, प्रीतीनें डोळे जातात.

**धनेश्वर**—मग छान. ही आंधळ्याची माळ मोरेश्वराच्या गळ्यांत घातली म्हणजे झालें. वेडे पोरी, तरीच तुला मोरेश्वराच्या घरचें जडजवाहीर दिसत नाहीं.

**लतिका**—बाबा, या रत्नासारखें जडजवाहीर मला नको आहे. ही धोंड माझ्या गळ्यांत बांधून संसाराच्या समुद्रांत मला लोटून देण्याचा तुम्हांला काय अधिकार आहे हो ?

**धनेश्वर**—माझा अधिकार विचारतेस ? लतिके, मीं तुला जन्म दिलेला आहे.

**लतिका**—हो बाबा, हो. आईबापांना मुलांना जन्म देतां येतो, त्यांना मरण देतां येत नाहीं. लग्नाचें सोंग करून तुम्ही मुक्या जनावराप्रमाणें माझा गळा कापणार आहां वाटतें ?

[ राग **पिलू**, ताल **दादरा** ]

**समजतां यज्ञचि का दुहितृविवाहा । यज्ञशाला स्वीय गेहा ॥धृ०॥**
**वर मानित आराध्यदेवता । गणितसा पशु तैसें तनुजादेहा ॥१॥**

**प्रभाकर**—आपल्या आर्यधर्मांत मातापितरांना हा अधिकार असतो खरा. मंत्रतंत्राच्या धार्मिक आधारावर सात्त्विक ब्राह्मणाला यज्ञांत मुक्या जनावरांच्या आणि आईबापांना लग्नविधींत वधूवरांच्या जन्मांचा सत्यनाश करण्याची पुरी मुभा आहे. या धर्माच्या जोरावर मुरळ्या वाहण्याच्या निमित्तानें दगडाच्या मूर्तीला मुली वाहण्याचा प्रकार ऐकला होता; पण अशा मूर्तिमंत दगडाला मुलगी अर्पण करणारा बाप अगदीं फरसबंदी दिलाचा फत्तरच असला पाहिजे. मनोहरा, दगडाचे हे नमुने नीट लक्षांत ठेव.

**लतिका**—तुम्ही आपलें तोंड दाखविणार नव्हतां ना ? मग कां तोंड घातलेंत या विषयांत ? माझ्या बाबांना असे कठिण शब्द बोललेले मला नाहीं खपायचे.

**प्रभाकर**—बरोबर आहे. कोंवळ्या बापाची कोंवळ्या मनाची मुलगीच कीं नाहीं तूं ? लतिके, तुझ्या बापाच्या हलक्या प्रकृतीच्या पचनीं पडतील असे पथ्याचे शब्द कोठून आणूं मी ?

**धनेश्वर**—पण हा धोंडा तुझ्या माथ्यावर दिला आहे कोणीं ? प्रभाकरा, देवासारखें, अगदीं दगडाच्या देवासारखें गप बसायचें असेल तर बस.

तुमच्या तरतरीत बोलण्याचें कौतुक रिकाम्या वेळीं करायचें असतें. लतिके, साडेतीन हात देहाचा तुझा बाप म्हणून विचारतों आहें. या घरीं तुला दिली तर तुझें काय नुकसान होणार आहे? चांगली धनदौलत आहे, जमीनजुमला आहे, मोठें थोरलें घर आहे, घरामागें बाग आहे, बागेंत खाशी मोठी विहीर आहे.

**लतिका**—त्या घरीं दिलीत तर त्या घरापेक्षां त्या विहिरीचा जीव द्यायला उपयोग होईल खरा!

**धनेश्वर**—पण असा वैताग करायचें कारण काय?

**मालती**—काका, असे रागावूं नका! हल्लींच्या सुशिक्षित मुलींना इतर गोष्टींपेक्षां शिक्षणाचेंच जास्त महत्त्व वाटलें तर तो दोष आहे का? आपली लतिका अशी इतकी शिकलेली, अन् हे—

**प्रभाकर**—मालतीताई, चुकतेस तूं! या मोरेश्वराचाही शिक्षणाशीं बराच संबंध आहे. याच्या दाट परिचयाचा एक विद्यार्थी प्रवेशपरीक्षेच्या वर्गात आहे ना! ही अशी विदुषी आहे—

**लतिका**—तर हे असे विदूषक आहेत.

**धनेश्वर**—वाः! लतिके, फारच मर्यादशील मुलगी तूं! वडिलांनीं निवडलेला नवरा—

**लतिका**—तसा वयोवृद्ध असता म्हणजे वडिलांइतकाच पूज्य मानला असता.

**धनेश्वर**—मला नाहीं वाटत, विद्या नसली म्हणजे मनुष्य लग्नाला नालायक होतो असें. शिकलेल्या मुलाला जर न शिकलेली मुलगी चालते तर शिकलेल्या मुलींना न शिकलेला मुलगा तरी कां चालूं नये? नवराबायकोच्या जोडींत एक कोणी तरी शिकलेलें असलें म्हणजे झालें.

**प्रभाकर**—क्वाइट राइट ॲन्ड ओरिजिनल! लतिके, दॅट्स आरग्युमेंट. इटिज सेन्स.

**लतिका**—प्रे शट् अप् युवर नॉन्सेन्स. इटिज ब्रूटल.

**प्रभाकर**—तें कसें? नीट विचार केला नाहींस. अग, स्त्रीस्वातंत्र्याची कैवारी म्हणून तर हें लग्न तुला फारच आवडायला पाहिजे. अज्ञानाच्या अंधारांत ठेवून पुरुषांनीं बायकांना गुलामांप्रमाणें वागविलें. तुझ्यासारख्या सुशिक्षित स्त्रीला या अक्षरशत्रु गुलामाला जन्माचा गुलाम करून या गोष्टीचा

सूड घेणें इष्ट नाहीं का? इटिज लॉजिक वुइथ अ व्हेंजन्स ॲण्ड क्राइट लाइक अ डॉटर ऑफ ईव्ह.

**लतिका**—यू हार्टलेस सर्पेंट! जास्त बोलाल तर तुमच्या पायांशीं आतां डोकें फोडून घेईन. माझे बाबा माझ्या जन्माचे धनी आहेत: माझ्याबद्दलची उठाठेव तुम्हांला करण्याचें कारण नाहीं.

**प्रभाकर**—गुड्.

**लतिका**—प्रभाकर, अगदीं सीरियसली, अगदीं मनापासून सांगतें—

**घनश्याम**—( स्वगत ) दॅट्स फर्स्ट क्लास टॉमफुलरी. आय वंडर हा थेरडा अजून ट्रॅजिक मूडमध्यें कसा जात नाहीं?

**प्रभाकर**—काय सांगणार होतीस सीरियसली?

**लतिका**—हेंच सांगणार होतें, माझा प्राण जात असला आणि तुमचाही प्राण जात असला तरी पुन्हां आपलें तोंड दाखवूं नका! तुम्हांला अगदीं माझ्या गळ्याची शपथ आहे. बाबांना उपदेश करणारे तुम्ही कोण?

**प्रभाकर**—असें? डन ॲन्ड डन वन्स् फॉर ऑल.

**धनेश्वर**—शाबास, लतिके! हा खरा कन्याधर्म.

**लतिका**—आणि या मोरेश्वराच्या गळ्यांत मला बांधणारा हा तुमचा पितृधर्म वाटतें? बाबा, मी निक्षून सांगतें—माझ्या अमर्यादपणाची मला क्षमा करा—या विषयाची वाटाघाट इथें क्षणभर चालविली तर मी इथल्या इथें जीव देईन. बाप आहांत कीं कसाब आहांत?

**धनेश्वर**—फाजील लाड केले आणि तुला शिक्षण दिल त्याचीं हीं फळें काय! मनोहरा, तूं कांहीं या लोकांसारखा उच्छृंखल नाहींस. तुला माझें करणें वावगें वाटतें का?

**मनोहर**—माझ्या मौनाला आपण संमति किंवा विनयाच्या अतिशयाला ज्ञानाचा कमीपणा समजत असाल, तर जरासा गैरसमज होत आहे.

**धनेश्वर**—काय एकाचढीं एक कारटीं निपजलीं आहेत! तुमच्या शिक्षणामुळ मला मात्र एवढें ज्ञान झालें, कीं झाली ही सगळी चूक झाली. स्त्रीशिक्षण काय! प्रीतिविवाह काय! घनश्याम, हा सुधारणेचा पाचकळपणा बंद करणें इष्ट आहे कीं नाहीं, बोला!

**घनश्याम**---पहिल्या पिढींत सुधारणेचा शुकपाठ झाला तो पुरा झाला. पाश्चात्य संस्कृतीच्या प्रथमदर्शनकाळीं तिची नुसती तोंडओळख करून घ्यावयाची होती. आज आतां ग्राह्यांश ठरविण्याची वेळ आली आहे.

**धनेश्वर**---अगदीं बरोबर. लतिके, आजपासून शिक्षणाला सोडचिठ्ठी. घरांत हा तरुणांचा तांडा जमवायचा नाहीं. हीं प्रेमाचीं पाचकळ मराठी पुस्तकें बंद. फक्त धर्मपुस्तकांचा अभ्यास. घनश्याम, या उर्मट पोरीचा सगळ्या जगाशीं संबंध तोडला पाहिजे. मराठी भाषा म्हणून ज्याला ज्याला येत असेल त्याला त्याला आपलें घर वर्ज्य. थट्टेनें सांगत नाहीं, किंवा माथे-फिरूपणानें सांगत नाहीं; आचारीपाणक्यासुद्धां मराठी बोलणारा असतां नाहीं कामा! द्या रजा सर्वांना. परदेशी आणा, गुजराथी आणा, कानडी आणा, वाटेल तर हिब्रू आणा; पण आतां मराठी माणसें घरांत नकोत. छापील पुस्तक घरांत नको! लतिके, ही आज्ञा मोडली तर चालायचें नाहीं! प्रभाकर, चला सगळी मंडळी आपापल्या घरीं.

**प्रभाकर**---( स्वगत ) काय प्रसंग आला पहा! लतिकेनें मघांशीं जो त्रागा केला तो खरा होता का खोटा होता, हें पडताळून पहाण्याचा मार्गच खुंटला. हा करारी म्हातारडा बोलल्याप्रमाणें वागूं लागला--आणि हा वाग-णारच म्हणजे लतिकेला भेटायचीच चोरी झाली. काय करावें? माझी मराठी जीभ कोणी कापून टाकील तर काय बहार होईल!

**धनेश्वर**---प्रभाकर, मीं तुझी थट्टा केली नाहीं.

**प्रभाकर**---ठीक आहे. आपली आज्ञा आम्हां सर्वांना मान्य आहे. मालतीबाई, चला. ( स्वगत ) कांहीं हरकत नाहीं! भेटायची चोरी झाली तर चोरून भेट घेईन! आणि मराठीला मज्जाव झाला, तर एखादा गुज-राथी शामळो होईन, कानडी अप्पा होईन, नाहीं तर एखादा परदेशी सैंय्या होऊन येईन!!! प्रेमावांचून परदेशी होण्यापेक्षां प्रेमासाठीं परदेशी झालेलें काय वाईट!

**धनेश्वर**---लतिके, ही भुतावळ घरांत आणलीस तशी बाहेर नेऊन पोहोंचीव. घनश्याम, सांगितलेल्या योजनेंत एक अक्षर चुकलें तर लक्षांत ठेवा.

**लतिका**---बाबा, मरावें आणखी तुमच्या पोटीं यावें.

**प्रभाकर**—( स्वगत ) किंवा मरावें आणखी भूत होऊन मानगुटीं बसावें.
[ धनेश्वर व घनश्याम यांखेरीज सर्व जातात. ]

**घनश्याम**—आपली आज्ञा अंमळ विचित्रच नाहीं का ?

**धनेश्वर**—हजार हेतु आहेत त्या आज्ञेमध्यें घनश्याम. घरांत कुणी वडील माणूस नाहीं म्हणून हा पोरखेळ होत आहे. या लतिकेची आई वारल्यापासून जें नुकसान झालें आहे तें कांहीं भरून येत नाहीं. लोक चंचल म्हणतील; पण या विचारामुळें अलीकडे झोंप येईनाशी झाली आहें.

**घनश्याम**—( स्वगत ) म्हाताऱ्याचें हें खरें स्वरूप . आज माझ्या लक्षांत आलें. मला संशय होताच ! ( उघड ) ठीक आहे; आपला हुकूम चमत्कारिक असला तरी मी हुकमाचा ताबेदार आहे. [ जातो ]

**धनेश्वर**—( स्वगत ) हा प्रकार या मूर्खांना वाटतो तितका हास्यास्पद नाहीं. चार दिवस जाचांत राहिली म्हणजे लतिका आपोआप मोरेश्वराशीं लग्न लावायला तयार होईल. आणि हें लग्न झालें तरच माझा भागीदार मला जिता सोडील. जमा केलेला वसूल खाजगी खातेवहींत घालून पेढीला दिवाळें काढण्याच्या बेतांत आणली आहे, याचा हा लेखी पुरावा कुणाला दिसला तर प्राणावर गदा येईल ना माझ्या ! मोरेश्वराशीं लग्न लावलें म्हणजे लतिकेचें कांहीं नुकसान होत आहे अशांतला प्रकार नाहीं. आमचा भागीदार घरचा अगदीं भुकेकंगाल आहे अशांतला भाग नाहीं. स्वतःच्या आणखी पोरीच्या दुहेरी हितासाठींच मुद्दाम वेड पांघरून मला हें रुद्रावताराचें अकांडतांडव करावें लागत आहे. या खातेवह्यांतल्या हिशेबाच्या दृष्टीनें माझें करणें अगदीं हिशेबीही आहे हें कोणालाही कबूल करावें लागेल. [ जातो ]

---

# प्रवेश चौथा

[ **स्थळः—रस्ता, महेश्वर** हातांत पत्र घेऊन प्रवेश करितो ]

**महेश्वर**—(पत्र पहात) हेंच घनश्यामाचें पत्र. "प्रिय मित्र महेश्वर यास' माझ्या नांवापलीकडे पुढें एक अक्षर लागेल तर शपथ ! या घनश्यामाचें अक्षर लहानपणीं इतकें वेडेंवांकडें राहिलें, का माझें वाचण्याचें ज्ञान लहान-

पणाइतकें वेडेवांकडें राहिलें ? या प्रेमासाठीं आणि लग्नासाठीं काय एकेक आपदा भोगाव्या लागतात पहा ! बाबांनीं लहानपणीं नेहमीं म्हणावें, कीं बाळा महेश्वरा, चार अक्षरांनीं हात धड झाला नाहीं तर दोन हातांचे चार हात करणें मोठें जड जाणार आहे. बाबांची बात्तिशी पुरेपूर वठली ! पण आतां मेलेल्या म्हाताऱ्यावर दांतओंठ चावण्यापेक्षां चार घरीं दांतांच्या कण्या करून टाळक्यावर अक्षता उधळून घेतल्या पाहिजेत. आमच्या गांवांत आम्हांला कोठें स्थळच मिळेना ! या घनश्यामाच्या तरी प्रयत्नाला यश येवो म्हणजे झालें. बाकी हा खटपटी मनुष्य आहे; देईल जुळवून कोठें तरी लग्नाचें. काय गंमत आहे पहा ! घर आहे, दार आहे, एवढा थोरला मी आहें, पत्रिका आहे, पण लग्नाला अजून ठिकाण नाहीं. परमेश्वरा ! लग्नाच्या अशा पेंचांत पकडण्याऐवजीं मनुष्यप्राण्यांत सुद्धां पांखरांप्रमाणें प्रेमाच्या उपजत जोड्या कां निर्माण केल्या नाहींस ? घनश्याम येतो. ] ( उघड ) शाबास, घनश्याम ! पत्रांत वेळ सांगितलीस एक, आणखी—

**घनश्याम**—कोण महेश्वर ? आलास केव्हां येथें ?

**महेश्वर**—मित्रा घनश्यामा, विरहिणीवांचून झुरणारा एखादा विरही, लग्नावांचून विधुर झालेला एखादा हतभागी, कारणावांचून शोक करणारा एखादा कमनशिबी तूं कधीं पाहिला आहेस का ? घनश्याम, तसा हतभागी तरुण पुरुष सांप्रत तुझ्यापुढें उभा आहे. त्या प्रणयी पुरुषाचें नांव महेश्वर. दोस्त, मी विरहानें अगदीं वेडा झालों आहें ! काय सांगूं तुला ? जिवलग मित्रा, ही विरहावस्था मोठी कठीण आहे बरें ! विरहावस्थेचा काळ तिन्हीं काळांचा कढ्ढ काढाच आहे म्हणेनास ! विरहावस्थेंत पावसाळ्याच्या अखंड धारा आहेत, उन्हाळ्याप्रमाणें ताप आहे आणि हिंवाळ्याप्रमाणें लांब रात्री आहेत ! हंसूं नकोस ! इंग्रजी राज्यांत सूर्य जसा मावळत नाहीं, तसा मदनाच्या राज्यांत चंद्र कधीं मावळत नाहीं. आणि गंमत ही, तो मुखचंद्र डोळ्यासमोर असला तरी भोंवतालचा अंधार कमी होत नाहीं ! घनश्याम, तुझा जिगर दोस्त प्रस्तुत अशा विरहांत सांपडलेला आहे. या कविजनांनीं अगदीं भरमसाट गोंधळ करून ठेविला आहे. |

**घनश्याम**—महेश्वरा, तुझें लग्नच जर झालें नाहीं म्हणतोस, तर मग ही विरहावस्था कोठून उत्पन्न झाली ?

**महेश्वर**—चुकलेल्या तरुणा, विरहावस्था ही सहा प्रकारची असते! एक बायको अजीबात मेल्यामुळें उत्पन्न होणारा चिरविरह! हा सगळ्या विरहांचा मोंगल बादशहा! या अवस्थेच्या जुलुमापुढें मोंगलाई म्हणजे कांहींच नाहीं! घरांतल्या घरांत बायको आजारी पडून जो विरह भोगावा लागतो तो प्रत्यक्ष विरह! बायको माहेरीं गेल्यामुळें परोक्षविरह भोगावा लागतो! किती झाले? चिरविरह, प्रत्यक्षविरह, परोक्षविरह! घरांतल्या घरांत तंटाबखेडा होऊन अबोला झाला म्हणजे वाङ्मयविरह सुरू होतो! बायको जराशी नजरेआड झाल्यामुळें जो विरह वाटतो तो क्षणिकविरह! आणि मुळींच लग्न न झाल्यामुळें बायको नाहीं म्हणून जो विरह भोगावा लागतो तो प्रारंभ-विरह! विरहाची ही नांवनिशी मीं उलट्या अनुक्रमानें तुला सांगितली हें लक्षांत ठेव म्हणजे झालें! घनश्याम, प्रणयाच्या संसारांतले हेच मुख्य षड्रिपु. सांप्रत मी पहिल्या म्हणजे प्रारंभविरहाची अवस्था भोगीत आहें. विरहाची अवस्था कोणतीही असो, तळमळणाऱ्या जीवाला काम मात्र एकच असतें, कीं विरहाच्या भयाण अंधकारांत एकट्यानें बसायचें आणि आपल्या प्रिय मुखचंद्राचें चिंतन करायचें!

**घनश्याम**—पण या लग्नापूर्वीच्या विरहावस्थेंत चिंतनाच्या वेळीं प्रियेचा मुखचंद्र कधींच न पाहिल्यामुळें जराशी गैरसोय होते, नाहीं का?

**महेश्वर**—नाहीं! काव्यप्रदेशांतल्या नवख्या मुशाफरा, मुळींच नाहीं. कवीच्या कृपादृष्टीमुळें ही गैरसोय कधींच उद्‌भवत नाहीं. प्रणयाच्या सृष्टींत कवीच्या कर्तबगारीमुळें सगळ्या सुंदरींचीं तोंडें चंद्राच्या वळणाची तरी असतात किंवा कायमचीं 'कमल' छापाचींच असतात; म्हणून ठोकळ मानानें चेहरा पुढें उभा करायला हरकत पडत नाहीं! मित्रा, मी या विरहावस्थे-मुळें बेजार होऊन गेलों आहें! आणि एकदांचें लग्न जमवून टाकून या मुख-चंद्राची पीडा टाळण्यासाठीं तुझ्या तोंडाकडे आशेनें पाहात आहें! मित्रा, या संकटांत मला हात दे, आणि एखाद्या तरुणीचा हात माझ्या हातांत दे.

**घनश्याम**—स्थूल मानानें त्या तरुणीची रूपरेखा कशी असावी याबद्दल कांहीं अटी आहेत का?

**महेश्वर**—अटी आतां नव्यानें काय ठरावावयाच्या? काव्यसृष्टींतले

सर्व कायदेकानू पूर्वीच कायमचे ठरून गेले आहेत! सांगितलें ना तुला? काव्यसुंदरी नेहमीं एकरूपच असते.

**घनश्याम**---अशी काव्यांतली नायिका मिळविण्यासाठीं काव्यांतलि नायका-प्रमाणें तुला धाडसें करावीं लागतील. आहे तुझी तयारी?

**महेश्वर**---धाडस! जगांतल्या जगांत वाटेल तें धाडस करायला सांगा. माझा एकच वुइक पॉइंट आहे! आणखी तो म्हणजे स्मशान. स्मशानांत जायचें नांव काढलेंस, कीं प्राणसंकट वाटतें बघ! लहानपणापासून एवढी काय ती दहशत मनाला बसली आहे. स्मशानांत पाऊल टाकल्याबरोबर माझा मुडदा झालाच म्हणून समज! जीव गेला तरी मी एकटा म्हणून स्मशानांत जायचा नाहीं. एवढी एक गोष्ट वजा कर आणि या जित्या जगांत वाटेल ती गोष्ट करायला सांग.

**घनश्याम**---आणि ती गोष्ट वाईट असली तर? समज, तें एखादें सामाजिक पातक असलें तर? फसगत झाली तर तुरुंगांत नेऊन ढकलण्याजोगें असलें तर?

**महेश्वर**---मित्रा, मी विरहावस्थेचा मलूलपणा टाकून देऊन जरा बोलतों. प्रेमाच्या सृष्टींत कसलें आलें आहे पाप? प्रेम सदा सर्वकाळ पवित्र असतें. प्रेमाचा बंदिवान् तुरुंगांत जायला तयार असतो. आणि पातकाविषयीं म्हणशील तर प्रणयी पुरुषांनीं कोणतीं पापें करायचीं बाकी ठेवलीं आहेत? अरे, नुसत्या दशकुमारांतल्या दहा नायकांचीं पापें निस्तरण्यासाठींच परमेश्वराचे दहा अवतार अपुरे पडतील! सांग, मकरंदाप्रमाणें वेषांतर करूं, शर्विलकाप्रमाणें चोरी करूं का दुष्यंताप्रमाणें मृगबालकांचा खाटीक बनूं? का बागेंत बसून भुंगेमाशा मारूं? मालतीसाठीं माधव स्मशानांत गेला तेवढें एकच साहस काय तें आपल्याकडून होणार नाहीं.

**घनश्याम**---ठीक आहे. तूं सांगितलेल्या धर्तीचीं कामें मी तुझ्याकडे देणार आहें. मात्र यांपैकीं कोणत्याही गोष्टीची वाच्यता होतां कामा नये. दे पाहूं असें वचन.

**महेश्वर**---हें घे. त्या भावी प्रणयिनीची शपथ घेऊन सांगतों, कीं तूं सांगशील त्यापैकीं एक अक्षरसुद्धां तोंडून फुटणें शक्य नाहीं. सांग मला काय करावें लागेल तें.

**घनश्याम**—शर्विलकाप्रमाणें चोरी करावी लागेल; मकरंदाप्रमाणें नाटकी वेषांतर करावें लागेल; फार काय, आधुनिक नाटककारांप्रमाणें भाषांतरही करावें लागेल. डोळे उघडे ठेवून आंधळ्यासारखें वावरावें लागेल. आहेस तयार?

**महेश्वर**—प्रेम आंधळें असतें ही गोष्ट जगजाहीर आहे. तूं सांगशील ती प्रत्येक गोष्ट करायला मी तयार आहें.

**घनश्याम**—ठीक आहे. माझ्या विचाराला तुझी अनुकूलता असेल तर तो घडवून आणण्यासाठीं यापुढें तूं आणि मी खऱ्या स्वरूपांत एकत्र असणें योग्य नाहीं. हा पत्ता घे. या ठिकाणीं जाऊन आपल्या रहाण्याबसण्याची सोय कर. मात्र एक अक्षर कुठें बडबडलास तर असा चतुर्भुज होण्याऐवजीं तसा चतुर्भुज होशील, लक्षांत ठेव.

**महेश्वर**—त्याबद्दल तूं काळजीच सोड.

**घनश्याम**—आपल्याला काय काय करावें लागणार तें मी एकदां नीटपणें ठरवून टाकतों.

**महेश्वर**—असेंच का म्हणेनास, कीं आपल्या ह्या कपटनाटकाचें तूं आतां प्लॉटिंग जमविणार आहेस. मात्र वेळ उगीच फुकट जाऊं देऊं नकोस. मी विरहानें किती आतुर झालों आहें, याची तुला कल्पना आहेच.

**घनश्याम**—तुझ्या आवडत्या भाषेंत बोलायचें म्हणजे यापुढील आपल्या पहिल्या प्रवेशापासून ॲक्शनला सुरुवात करायची. बरं. चल तूं आतां पुढें.

**महेश्वर**—वाः, कोणत्याही नाटकांतला व्हिलन आणि हीरो इतक्या सलोख्यानें कधींच बोलले नसतील! [जातो]

**घनश्याम**—या मूर्खाला हें कळत नाहीं, कीं या कपटनाटकांत चांगला उपयोग करून घेण्यासाठींच मीं या विनोदी पात्राची योजना केली आहे. मात्र याच्या म्हणण्याप्रमाणें एक गोष्ट खरी आहे, कीं हा घनश्याम या नाटकांतला व्हिलन आहे. मी असा दुष्ट कां होऊं नये? नाटकांतल्या नीच पात्रांच्या धूर्त बुद्धिमत्तेनें आपले बेत कां रचीत बसूं नये? लतिके, मालती सुखी व्हायला पाहिजे, आणखी तूं सुखी व्हायला पाहिजेस, नाहीं का? उद्यां तुम्ही माझ्याशीं लग्न कराल! कालपर्यंत मालती मला दुर्मिळपणामुळें मिळविण्याजोगी वाटत होती. पण धनेश्वराच्या उर्मट पोरीनें तें माझें मानी मन आज आपल्याकडे ओढून घेतलें आहे. एकदां मला असें ओढल्यावर पुढें माझ्या मगरमिठींतून

मीं कुणाला अजून सुटूं दिलें नाहीं. एकट्या तुझ्या लग्नाचेच धिंडवडे काढून माझें समाधान व्हायचें नाहीं. तुझ्याबरोबर मालतीही दुःखांत पडायला पाहिजे. महेश्वराच्या गळ्यांत मालतीची धोंड बांधली तर? प्रेमकल्पनांनीं पिसाळलेला तो मूर्ख मुलगा तिला कदाचित् गळ्यांतला तन्मणी करील. नाहीं, लतिके, हें समाधान मी तुला लाभूं देणार नाहीं. पहिल्या प्रतीच्या मानी लतिकेला जसा पहिल्या प्रतीचा मी, तसा मालतीसाठीं दुय्यम बदमाष कोण शोधून काढूं? अहाहा, लतिके, तुझा पाजी आणि रंगेल बाप असल्यावर दुसरा कोण कशाला पाहिजे? धुंडिराज भित्रा आहे, ओळखीला दुबळा आहे आणि मनाचा प्रेमळ आहे. अनोळखी महेश्वराची ओळख लादून धुंडिराजाला चोरीसारख्या गुन्ह्यांत गुंतवितों म्हणजे झालें. नुसत्या कल्पनेनेंच काय मी ब्रह्मानंदांत रंगून गेलों आहें! कर्तबगार बुद्धिमत्तेच्या नीच वृत्तीची निशा और आहे! यांत वाईट होतें आहे तें एकच होतें आहे. या प्रकाराच्या मुळाशीं असलेली धुंडिराजाच्या स्वभावाबद्दलची माहिती त्यानें आपण होऊन मला सांगितली आहे. मीं आपल्या अक्कलहुषारीनें ती मिळविलेली नाहीं, एवढाच काय तो कमीपणा आहे. देवि बुद्धिमते, एवढ्या मुर्दाड मांसाचा बळी दिल्याबद्दल तुझ्या एकनिष्ठ भक्ताला माफ कर. लतिकेसाठीं मालती, आणि मालतीसाठीं धुंडिराज अशी ही दावण मला बांधावीच लागणार. मालतीला उचलतांना धुंडिराजाचें प्रेमळ मन दुखावलें तर त्याबद्दल जगाची जन्मकुंडली जबाबदार आहे. कळी कुसकरतांना गुलाब दुखावला तर मी त्याला काय करूं? या आटोपशीर जगांत संसाराच्या सुखाची रचनाच अशी चमत्कारिक झाली आहे, कीं कधीं कधीं लग्नाच्या मांडवांतली आरास साजरी करण्यासाठीं एखाद्या जित्या जिवाची चिता भडकवावी लागते! [ जातो ]

------

# प्रवेश पांचवा

[ स्थळः—**वोर्टिंगरूम,** पात्रें—**धुंडिराज,** भोंवतालीं उतारू ]

**धुंडिराज**—कांहीं नाहीं म्हटलें तरी गाडीला अजून दोन कलाक अवकाश आहे! तेव्हां गाडी सांपडावी असा अंदाज वाटतो बुवा! पण काय

नेम सांगावा ? गाडी निघून तर गेली नसेल ? नाहीं, मी येण्याच्या पूर्वी गेली ती बाराची आणि ही दुसरी तिहीची ! अहो पहारेकरी, तिहीची गाडी गेली तर नाहीं ना ? आतांशा एक झाला आहे !

**पहारेकरी**—मघांच गेली !

**धुंडिराज**—म्हणजे ? तिहीची गाडी गेली आणि ती केव्हां ?

**पहारेकरी**—बारा वाजतांना !

**धुंडिराज**—अन् बाराची ?

**पहारेकरी**—बाराची गाडी आतां तिहीला येईल ! म्हातारबुवा, बसा बेफिकीर जरासे ! अन् जरा हुषार रहा. हल्लीं चोराचिलटांचा इथें फार त्रास आहे. [जातो]

**धुंडिराज**—काय माणूस आहे ! जो तो आपल्याच ह्याच्यांत असतो. बाकी अशा मुशाफरखान्यांत असलींच माणसें पाहिजेत ! काय मुशाफरखाना हा ! घटकेच्या वस्तीसाठीं आलेल्या माणूसप्राण्यानें अशा चांगल्या जगांत किती घाण करून ठेविली आहे त्याचें आटोपशीर स्वरूप या मुशाफरखान्यांत पहायला मिळतें ! जाऊं द्या, आपल्याला काय करायचें आहे ! जरा हातपाय आवरून मुकाट्यानें पडावें झालें ! झोंप तर नाहीं ना लागायची! म्हणजे मात्र गाडी अंगावरून येऊन गेली तरी कळायचें नाहीं ! या बारक्या घड्याळांना गजर असायला पाहिजे होता ! बाकी स्टेशनवरची घंटा म्हणजे गजघंटाच ती ! लवंडतोंच जरा; बघूं या तर खरी काय गंमत होते ती ! [ पडतो. एका बाजूनें पोलिसवेषानें घनश्याम व महेश्वर येतात. ]

**घनश्याम**—महेश, विसरूं नकोस कांहीं. नांव मोरेश्वर. आजीच्या गोष्टीची आठवण द्यायची. तो बघ अनायासें एका बाजूला पडला आहे. आणि पहारेकरी पेंगायलासुद्धां लागला तिकडे. आटोप लवकर ! मोरेश्वराला तिकडे नेऊन मीं बसविलाच आहे. थोड्या वेळानें इथून गेल्यावर त्याला इकडे परत लावून दे.

**महेश्वर**—तूं पोलिसासारखा कांहीं दिसत नाहींस !

**घनश्याम**—काय, पागल आहेस काय? मी तसा दिसूं लागलों तर खोट्या पोलिसानें या म्हाताऱ्याला पकडण्याऐवजीं खरा पोलीस मलाच पकडील ! बाकी, प्राणावरच जर आलें तर परजिल्ह्यांतली केस आहे म्हणून सांगूं म्हणजे झालें ! ते खोटे दागिने आहेत ना नीट?

**महेश्वर**—लुक हियर. खोटे दागिने, खोटा पोलीस, खोटें काम!—घनश्याम, खरें सांगूं एकच तुला? या जगांत प्रेम हें एकच खरें आहे!

**घनश्याम**—चूप! आपल्या कामाला लाग! [जातो]

**धुंडिराज**—झाली झोंप! आतां 'कराग्रे वसते लक्ष्मी, करमध्ये सरस्वती'–

**महेश्वर**—ओहोहो! कोण? काका? इथें कुठें तुम्ही?

[जवळ जाऊन बसतो]

**धुंडिराज**—(स्वगत) हा कोण बरें? आली पंचाईत! (हंसून) जरा गाडीनें जायचें आहे; या बसा–असे सतरंजीवर या! बरें झालें बुवा भेटलांत! कोणी ओळखीचें असल्याखेरीज बघा वेळ जात नाहीं!

**महेश्वर**—काका, तुम्ही मला अहो जाहो सुद्धां म्हणायला लागलांत! फार वर्षांनीं भेटलों म्हणून कीं काय?

**धुंडिराज**—(स्वगत) फार वर्षांपूर्वींची ओळख आहे! आणखी बराच सलगींतला आहे! नांव काय पण याचें? पोरीबाळींच्या हातांवर रामनाम गोंदवतात किंवा पुरुषांच्या हातावर नाम रेखतात, त्यापेक्षां नांव कपाळावर कोरायची कां नाहीं वहिवाट निघाली! (उघड) आहोजाहोच म्हणायचें आतां! तुम्ही लोक आतां मोठे झालांत. हें बघ, आतां तुम्हांला–तुला–लहानपणाच्या नांवानें हांक मारायची–पण तुझें लहानपणचें नांव तोंडांतून मी काढायचा नाहीं!

**महेश्वर**—काका, पहिल्यासारखें मोरूच म्हणावें लागेल!

**धुंडिराज**—(स्वगत) मोरू! हा बहुतेक मोरेश्वरच! (उघड) भलतेंच! अहो मोरू असें म्हणून कुठें भागतें आहे का!

**महेश्वर**—असें कां बरें म्हणतां काका? एवढासा तर तुम्हीं मला खेळविला आहे! तुम्ही विसरलां असाल; माझी आजी वारली त्या वेळीं—

**धुंडिराज**—बरोबर! तुला आठवण आहे का रे अजून? फार लक्षांत ठेवलेंस! आणि आम्ही तुला जड डोक्याचा म्हणत होतों! सांगूं तुला आतां–कालमानाप्रमाणें माणसाला अक्कल वाढत जाते बरें का! आतां चांगला वडिलांचा कारभार पाहण्याजोगा झालास! वडील बरे आहेत? घरचीं माणसें खुशाल? आमच्या बरोबरीचीं माणसें बरें का तीं! थकले असतील आतां वडील तुझे! आतां कामकाज सगळें तुलाच पहावें लागत असेल! कांहीं कामाकरितांच निघाला असशील? आणि कायरे हें? बरोबर सामान नाहीं

सुमान नाहीं! हें पहा बुवा प्रवासांत अशी फटिंग वृत्ति कामाची नाहीं! अंथरायचें, पांघरायचें ज्याच्यात्याच्याबरोबर पाहिजे!

**महेश्वर**—माझें सामान पलीकडच्या—त्या जागेंत आहे.

**धुंडिराज**—आणि तूं इथें? अरे काय म्हणावें काय तुम्हांला? चोरा-चिलटांचा फार उपद्रव आहे बरें! मला माहिती आहे ना! माहिती आहे म्हणजे पोलिसानेंच सांगितलें! जा घेऊन ये सामानसुमान सगळें—सामानसुमान जवळ पाहिजे! नाहीं गड्या! म्हटलें तें खोटें, अकलेचे तुम्ही आपले असेच पहिल्या सारखेच! तोंडवळा मात्र बदलला आहे. तूं जर सांगितलें नसतेंस तर तुला ओळखायची माझ्या बापाची—अरे वेडा आहेस का? तुझ्या बापाची सुद्धां ताकद नव्हती! जा आण सारें सामान!

**महेश्वर**—जातों. पण हें एवढें जोखमीचें सामान आहे तें ठेवा तुमच्या-जवळ; म्हणजे तें सामान घेऊन येतों! दागदागिने आहेत याच्यांत बरें का! जरा जपा म्हणजे झालें! जाऊं मी?

**धुंडिराज**—अरे जा रे, आमची बुद्धि म्हणजे कांहीं पोरा बुद्धि तेरा नव्हे! आम्ही जुनीं माणसें म्हणजे लचांडांत सांपडणारीं नव्हे बरें का?

**महेश्वर**—गॉड ब्लेस यू ओल्ड फूल! [जातो]

**धुंडिराज**—(स्वगत) हें वळकटींत ठेवलें पाहिजे! ह्या पोरांना म्हणजे सुमारच नसतो! आपलें भाजीपाल्यासारखें उघडेंच घेऊन हिंडत होता! जोखमीचें काम म्हणजे जोखमीचें काम!

[ घनश्याम व मोरेश्वर येतात ]

**घनश्याम**—पुढें या जरा. या गृहस्थाचें नांव काय?

**मोरेश्वर**—धुंडिराज. आमचे धोंडूकाका हे.

**घनश्याम**—तुमचें नांव काय?

**मोरेश्वर**—मोरेश्वर.

**घनश्याम**—काय हो, या गृहस्थाला तुम्ही ओळखतां?

**धुंडिराज**—हा मोरू तर तो कोण? मोरूच ना तूं?

**मोरेश्वर**—हो काका!

**धुंडिराज**—हो, मोरूच हा! पण तो कोण होता?

**घनश्याम**—मोरेश्वर, तुम्ही आपल्या जागीं जाऊन बसा. [ मोरेश्वर जातो] तो कोण हें तुला पाहिजे नाहीं का? तो कोण आहे हें तुला माहीत आहे, तूं कोण आहेस हें त्याला माहीत आहे, आणि तुम्ही दोघे कोण आहांत हें मला माहीत आहे! अरे थेरड्या, गलथानपणाचें सोंग पांघरून अशा बदमाषा करतां काय? गरीबीच्या पांघरुणाखालीं अशा चोऱ्या फार दिवस लपत नाहींत! तुझ्या बापाचा माल आहे का हा? काय आहे ह्यांत बोल?

**धुंडिराज**—दागदागिने आहेत यांत.

**घनश्याम**—कुठून आणलेस?

**धुंडिराज**—हे एका इसमानें मजजवळ ठेवायला दिले आहेत.

**घनश्याम**—त्याचें नांवगांव सांग—

**धुंडिराज**—मला वाटलें त्याचें नांव मोरेश्वर आहे म्हणून.

**घनश्याम**—तुझा बाप आतां गेला तो मोरेश्वर! म्हातारड्या, मुकाट्यानें कबुलीजबाब दे. पलीकडच्या वेटिंगरूममधून तूं आणि तुझ्या त्या साथीदारानें त्या मुलतान्याचे हे दागिने चोरलेले मला माहीत नाहीं कीं काय? ही पहा चोरीच्या मालाची यादी, आणि हा चोरीचा माल! त्यानें चोरले आणि तूं आपल्याजवळ दडविलेस. फार दिवसांनीं दोघे सांपडलांत. आतां जास्त गडबड करूं नकोस.

**धुंडिराज**—आकाश कोसळलें हो माझ्यावर! काय बोलतां आहांत हें!

**घनश्याम**—अक्षर बोलूं नको म्हणून सांगितलें ना? मुकाट्यानें चौकीवर चल आणि कबुलीजबाब लिहून दे. तुला काय बोलायचें असेल तें कोर्टांत माजिस्ट्रेट पुढें बोल.

**धुंडिराज**—मी पोराबाळांचा धनी आहें हो! मला चौकीवर नेऊं नका. माझी काय चूक झाली असेल तर आपले पाय धरतों. मी एक अब्रूदार गरीब मनुष्य आहें. मला चौकीवर नेऊं नका. मला इथें आपल्या पायापाशीं शासन करा. पण माझी अब्रू घेऊं नका. साहेब, माझ्या कच्चाबच्चांचे बाप व्हा.

**घनश्याम**—खरें सांग केलीस कीं नाहीं चोरी?

**धुंडिराज**—मी काय बोलूं? माझी बोबडी वळली! आपणच माझ्याबद्दल बोला. आणि कसेंतरी करून माझीं मुलेंबाळें वांचवा. आपल्या हातीं अब्रूनिशीं मला माझ्या मुलाबाळांत नेऊन सोडा एकदांचा. मी लबाड मनुष्य नाहीं हो!

**घनश्याम**—मग काय त्या हरामखोराच्या संगतीनें फसलास ?

**धुंडिराज**—नशिबानें फसलों खरा ! पण साहेब, आपण माझे धर्माचे आईबाप आहांत. मला सोडवा हो कसें तरी. माझ्या मुलांना हें जर कळलें तर तीं जागच्याजागीं तडफडून पटापट प्राण सोडतील. अगदीं लहान लहान आहेत हो सगळीं !

**घनश्याम**—तुझ्यावर दया करायला—पण तसा मोकळा तरी सोडावा कसा तुला ? थांब, पहिल्यानेंच पकडला आहे नाहीं का तुला ? पूर्वीं कुठें शिक्षा झाली आहे का तुला ?

**धुंडिराज**—मी कुटुंबवत्सल मनुष्य आहें हो ! सरकारदरबार आम्हांला माहीत सुद्धां नाहीं.

**घनश्याम**—थांब, संशयाचा फायदा तुला देतां येण्यासारखा आहे. आजच्या अपराधाचा कबुलीजबाब लिहून दे, आणि पुनः असें करूं नकोस. पुनः अशा बदमाषींत सांपडलास तर मात्र दोन्ही वेळचा खटला भरण्यांत येईल. सहीसाक्षीनिशी कबुलीजबाब लिहून देत असलास तर एक वेळ तुझ्यावर दया करीन.

**धुंडिराज**—देतों लिहून वाटेल तो जबाब. पण माझ्यावर कांहीं येणार नाहीं ना ?

**घनश्याम**—नाहीं येणार. मी पोराबाळांचा बाप आहें. पोराबाळांचें नांव काढलेंस म्हणूनच एक वेळ गय केली. हा घे कबुलीजबाबाचा नमुना. यांत तुझें नांव, गांव, तारीख एवढीं बदलून आपल्या हातानें नक्कल तयार कर. थांब, एक साक्षीदार बोलावतों, त्याच्या देखत लिही. हो–पण हें तिसऱ्याला कळून उपयोगी नाहीं. नाहीं तर फुकट मरशील. दम खा. मसुद्यांत फेरफार काय करायचा तेवढें लक्षांत आलें ?

**धुंडिराज**—आलें आहे, सरकार !

**घनश्याम**—मग मी साक्षीदार बोलावून आणतों, त्याच्या देखत मुकाट्यानें नक्कल कर म्हणजे झालें. कबुलीजबाबाला तुझा दस्तुर पाहिजे. लाग, लिहायला लाग. हें घे लिहायचें सामान. [ धुंडिराज लिहूं लागतो ] (मोठ्यानें) ए मोरेश्वर, इकडे ये. लाग, लिहायला लाग तूं. लवकर लिही. अजागळाप्रमाणें मध्येंच कांहीं विचारूं नकोस. [ मोरेश्वर येतो ] मोरेश्वर, तुझ्या देखत हा म्हातारा लिहीत

आहे, त्याची सही झाली म्हणजे त्याच्याखालीं साक्ष घाल. लिहायला येतें कीं नाहीं ? घे हा कागद–कर सही. या इथें बाजूला साक्ष घाल. [ मोरेश्वर सही करतो, घनश्याम कागद हातीं घेतो ] मोरेश्वर, तुझें काम झालें. जा आपल्या रस्त्यानें. [ तो जातो ] धुंडिराज, पुनः असें करणार नाहींस ना ? एवढ्या गुन्ह्याबद्दल भिऊं नकोस. घरीं जायला तूं मोकळा आहेस.

**धुंडिराज**—सरकार, आपले उपकार मी जन्मभर विसरणार नाहीं. [ पायांवर डोकें ठेवतो. गाडीची घंटा होते. ]

**घनश्याम**—एक पस्तीस–अप ट्रेन आली वाटतें ?

———

# अंक दुसरा

## प्रवेश पहिला

[ स्थळः–धनेश्वराचें घर. पात्रें–धनेश्वर, लतिका व मालती ]

**धनेश्वर**–हं लतिके, मी म्हणतों असें हें झालेंच पाहिजे. मोरेश्वराशींच तुझें लग्न करायला हवें.

**लतिका**–बाबा, मी नेहमीं मनांत असेल तें बोलून दाखवितें; पण असें बोलूं नये म्हणून ही मालतीबाई कालपासून सारखी बजावते आहे, एवढ्यासाठीं मी अधिक बोलत नाहीं. तरी पण तुम्हांला अगदीं निक्षून सांगतें, कीं हें लग्न मला नको आहे.

**धनेश्वर**–लतिके, तुला विचार नाहीं, दूरदृष्टि नाहीं, व्यवहारज्ञान नाहीं, म्हणून तूं असें बडबडत सुटली आहेस. माझ्यासारख्या व्यवहारपंडिताची मुलगी, आणि तुला हें एवढें कसें कळत नाहीं कुणास कळे !

**लतिका**–बाबा, काय सांगूं मी तुम्हांला ! आईबापांच्या गुणांवर जायचें भाग्य सगळ्याच मुलांच्या कपाळीं थोडेंच असतें ! गुण सर्वत्र वंशपरंपरागतच असतात का ?

[ राग तिलंग, ताल त्रिवट ]

**कुलगुण सकलां न सर्वदा ।। विधिसुघटित परि जगतिं गुणमान ।।धृ०।।**
**विमल पंकजा, पंक मलिन जरि स्थिर गिरितट तटिनी न स्थिराचि तरि ।**
**जन्यजनक नच गुणिं समसमान ।। १ ।।**

**धनेश्वर**–लतिके, शिक्षणामुळें वायफळ बोलायला मात्र शिकलीस ! या चटोर चोपड्यांनीं तुझें डोकें अगदीं फिरून गेलें आहे; त्यामुळें तुला डोळ्यासमोरच्या गोष्टी दिसत नाहींत. माझ्या डोक्यांत या लग्नाची कल्पना येईपर्यंत तुझ्या कपाळीं किती सुख आहे याची मलाही कल्पना नव्हती ना ! हें पहा,

लतिके, चार अक्षरें वाचतां आलीं म्हणजे ललाटींचा लेख वाचतां येतोच असें मात्र नाहीं.

**लतिका**—बाबा, ललाटींचा लेख वाचतां आला नाहीं, तरी आम्हां मुलींना कपाळाचें कुंकू नीट रेखून लावायचें लहानपणापासूनच कळत असतें.

**धनेश्वर**—हं, शिक्षणामुळें हें फटकळासारखें बोलायला मात्र येतें! चार अक्षरें हस्तगत झालीं, कीं हा परिणाम ठेवलेला! हें शिक्षण फार, फार वाईट आहे.

**लतिका**—बाबा, हा ज्याचा त्याचा हातगुण असतो. यांत बिचाऱ्या शिक्षणाचा काय दोष? चार अक्षरें वाचतां आलीं म्हणजे चांगलेंही बोलतां येतें आणि वाईटही बोलतां येतें. चार अक्षरें लिहितां आलीं म्हणजे त्रिकालाबाधित सुंदर सत्येंही लिहितां येतात, आणि पांढऱ्यावर काळें करून खोटे दस्त-ऐवजही लिहितां येतात.

**धनेश्वर**—हा रिकामा वादंग नकोच आहे मुळीं! यानेंच तर बोलण्याची मर्यादा सुटत जाते! मुलींनीं असें उर्मटपणानें बोलायला सुरवात केली म्हणजे बापाच्या संसाराचा शेवट झालाच म्हणून समजावें.

**लतिका**—आणि बोलायला सुरवात केली नाहीं तर मुलींच्या संसाराचा शेवट व्हायचा!

**धनेश्वर**—लतिके, तुला एकवीस वर्षें कांहीं उलटलीं नसतील. सामान्य मनुष्यांत सुद्धां सरकारानें अज्ञानाच्या वयाची मर्यादा संस्थानिकांप्रमाणें एकवीस वर्षांचीच ठेवायला हवी होती! मांजरीच्या पिलांचे डोळे दहाव्या दिवशीं आणि कुत्रीच्या पिलांचे डोळे एकविसाव्या दिवशीं उघडतात; पण माणसाच्या पोरांचे डोळे मात्र एकविसाव्या वर्षापर्यंत उघडत नाहींत!

**लतिका**—इतकेंच काय, पण कधीं कधीं डोळे कायमचे मिटायची वेळ आली तरी उघडत नाहींत! त्यामुळें आपल्या पायांखालीं काय जळतें हें सुद्धां माणसाला दिसत नाहीं.

**धनेश्वर**—तुझें बोलणें ऐकलें म्हणजे अशी तळपायांची आग मस्तकाला जाऊन पोंचते.

**लतिका**—म्हणूनच शेवटीं माथ्यांत राख घालायची अशी वेळ येते ती!

**धनेश्वर**–बस् ! अगदीं अखेर झाली, कारटीला डोक्यावर बसविली त्याचा हा परिणाम !

**मालती**—लतिकाताई, काय हें बोलणें बरें ? विनयाची मर्यादा सोडून बोलणें केव्हांही हितप्रद नसतें. तोंडाळपणामुळें कुणाचें कधीं बरें झालें आहे का ? वडिलांना कुठल्याही प्रसंगीं असें बोलूं नये.

**धनेश्वर**—ऐक तिचा उपदेश. मालती, मुलीनें बापाला काय बोलावें हें सांग तिला एकदां नीट.

**लतिका**—बाबा, मालती कधीं धुंडिराजकाकांना उलट बोलत नाहीं, आणि मी सुद्धां त्यांना कधीं बोलत नाहीं.

**मालती**—ताई, खरें विचारशील तर बोलण्याचा मला सुद्धां राग आला होता. बोलतांना कधींच विचार करावयाचा नाहीं म्हणजे काय ? जनरीत कांहीं आहे कीं नाहीं ?

**धनेश्वर**–शाबास मालती, तूं मोठी गुणाची मुलगी आहेस. मुलगी कसची तूं ! चांगली पोक्तीपुरवती बायकोच म्हणावें लागेल तुला. केवढी प्रौढ बुद्धि आहे तुझी ! एखाद्याचा विस्कटलेला संसारसुद्धां सुरळीतपणें सांभाळण्याची अक्कल आहे तुझ्या अंगांत ! लहानपणापासूनच तूं अशी विचारी आहेस. आमच्या या लतिकेप्रमाणें एखादी लहानशी अजाण मुलगी या दृष्टीनें तुझ्याकडे पहावेंसें मला कधींच वाटलें नाहीं.

**लतिका**—बाबा, साठी उलटली का हो तुमच्या वयाला ?

**धनेश्वर**—माझे आई, तुझ्याशीं बोलण्याची तुझ्या बापाची तर काय, पण माझ्याही बापाची छाती नाहीं ! पुरें झालें हें बोलणें. मला एवढें ठाऊक आहे, कीं तुझें त्या मोरेश्वराशीं लग्न लावून टाकायचें. ( स्वगत ) पातकी माणसाचीं पोरेंबाळेंसुद्धां त्याचा कसा अनादर करितात याचें मूर्तिमंत चित्र आहे आमचें घर म्हणजे ! दिवसाढवळ्या घरांत अगदीं नाटक चाललें आहे जसें कांहीं !

[ कानडी वेषांत प्रभाकर वृद्धरूपानें व इंदु बिंदुहि प्रवेश करितात. ]

**इंदु**—काका, हे कोणसे तुम्हांला भेटायला आले आहेत. कुणी म्हातारे आहेत वाटतें.

**धनेश्वर**—इंदु, यांची टीचभर पांढरी दाढी पाहूनसुद्धां तुला हें म्हातारे आहेत असें नुसतें वाटतेंच आहे ना? हे म्हातारे नाहींत, मग काय म्हाताऱ्याचें सोंग घेऊन आले आहेत वाटतें? या, बसा मिस्टर!

**प्रभाकर**–(स्वगत) हें कानडी सोंग आणलें आहे खरें मीं; पण नुसत्या दाढीमिशां म्हातारपण सजविण्यांत पोरकटपणा तर नाहींना होत हा? बाकी, सोंग उघडकीस आलें तर फार झालें तर थोडासा हंशा होईल एवढेंच. आमच्या दोन घरांचा आज इतके वर्षांचा ऋणानुबंध लक्षांत घेतला म्हणजे या सोंगाकडे इतकें लक्ष देण्याचें कारणच नाहीं. एका घरांतल्या घरांत मुलें एकमेकांना फसविण्यासाठीं सोंगें घेतात त्यापेक्षां या गोष्टीचा फारसा बागुलबुवा वाटण्याचें काय प्रयोजन आहे? तसें म्हटलें तर लतिकेला यांच्यादेखत भेटण्याची चोरी आहे थोडीच!

**धनेश्वर**—हं, कोण, काय, कुठले तुम्ही? काय काम आहे?

**प्रभाकर**–आपण धनेश्वरमहाराज? ठीक! (पत्र देऊन) हें पत्र एक लोक देतो.

**धनेश्वर**–(पत्र वाचून) कानडी पंडित आहां आपण? अस्सें! आमच्या लतिकेला शिकविण्यासाठीं ठेवावें म्हणतां? का हो, तुम्हांला कुणीं सांगितलें, कीं आम्हांला कानडी इसम हवा आहे म्हणून?

**प्रभाकर**—एक मोरेश्वर गृहस्थ आगगाडीचे डबींत भेटलो. सर्व बोलतो हे हकीगत. आम्हीं कळलों तर पत्र घेतला–आले.

**धनेश्वर**–मराठी येतें का?

**प्रभाकर**–थोडें; लोक बोलतो तो समजतो. हिंदुस्थानी थोडें. जन्मतो कन्नड, पुढें काशी–गुरु शास्त्र शिकवलो, षट्शास्त्र, वेदवेदांत वाचलों. फार पारंगत! केवळ मुखोद्गत!

**धनेश्वर**–लतिके, यांना संस्कृतांत नांव विचार पाहूं?

**लतिका**—पुराणपुरुष, एते मे तातचरणा भवतो नामधेयं ज्ञातुमिच्छन्ति.

**प्रभाकर**–(स्वगत) नांव काय सांगूं आतां? कानडी नांव. (उघड) गिरसाप्पा. महामहोपाध्याय गिरसाप्पा. भवति, अपूर्वः कोऽयमस्माकमुत्साहः, यद् भवत्या सम्यक् प्रतिपन्नमीदग् गीर्वाणभाषाप्रावीण्यम्—

**लतिका**—नहि नहि, महाशय, अत्यल्पमेव तत्. तदपि—काय ग मालती-ताई, प्रॅक्टिस नाहीं म्हणजे काय? हो—अनभ्यसनात् तदपि विस्मृतप्रायम्. सुटलें बाई एकदांची. संस्कृत नाटकांतून बायकांना प्राकृत भाषा कां बोलायला लावली आहे हें मला आज कळलें.

**धनेश्वर**—छान आहे. गिरसाप्पा, कांहीं इंग्रजीबिंग्रजी?

**प्रभाकर**—नॉट् मच्; लिटल्. प्रॅक्टिस नास्ति.

**धनेश्वर**—ठीक आहे. बरें गिरसाप्पा, तरुणांच्या दृष्टीनें अत्यंत नीरस, रूक्ष, खूप मोठा, फार अवघड असा संस्कृत शास्त्रग्रंथ कोणता आहे?

**प्रभाकर**—योगवासिष्ठ—बृहद् योगवासिष्ठ! बहोतही बडा ग्रंथ! षष्ठिलक्ष ग्रंथ. नीरस व्हेरि मच. एक पंडित काशीघाट पारायण केलो, तर तीन तरुण लोक गंगेंत जीव दिले, दोन लोक जागेवर मेलो, कंटाळला.

**धनेश्वर**—आलें, आलें लक्षांत! हें बघा, गिरसाप्पा, ही आमची मुलगी लतिका. शिक्षणाच्या ललित वाङ्मयामुळें हिची प्रकृति थोडीशी बिघडली आहे. तेव्हां हिची प्रकृति ताळ्यावर आणण्यासाठीं तुमच्या योगवासिष्ठाची सात पारायणें तिला पाजा. योगवासिष्ठाच्या औषधाचें हिंदुस्थानी रांकटपणांतून, इंग्रजी जोडाक्षरांतून, आणि संस्कृत अनुस्वारांतून कोळून एक सातरें दिलें म्हणजे झालें. मधूनमधून न शिजण्याजोगे तुमचे कानडी खडे चारले तर उत्तमच आहे! एकेक इलाज करून पहायचा. [घनश्याम महेश्वराला घेऊन येतो. महेश्वराजवळ तंबोरा.]

**धनेश्वर**—या, घनश्याम.

**घनश्याम**—हे एक कानडी गवई आहेत. अगदीं दोन्ही डोळ्यांनीं आंधळे आहेत. मराठीचा अगदीं गंध नाहीं. भक्तिरसाचींच पदें तेवढीं येतात यांना. घरदार कांहीं नाहीं. लतिकाताईच्या धर्मशास्त्राच्या अभ्यासाला ही भक्तिरसाची जोड कांहीं वाईट नाहीं.

**धनेश्वर**—ठीक आहे. हे सद्गुरु पण कानडीच आहेत. काहो गिरसाप्पा, मराठींतल्या इतक्या बारकाया कळत नाहींत ना? बरें, गिरसाप्पा, या तुमच्या देशबांधवांचें नांवगांव विचारा.

**घनश्याम**—(स्वगत) अरे बापरे! ही खरी फजीतीची वेळ! नांवापुरताच

प्रश्न आहे, तेवढा महेश्वराच्या बोलण्यावरून समजला; पण पुढें कसें निभा-यचें आतां ?

**महेश्वर**–[स्वगत] अरे बापरे! ही खरी फजीतीची वेळ! याला उत्तर काय देऊं कपाळ!

**प्रभाकर**–[स्वगत] अरे बापरे! ही खरी फजीतीची वेळ! याला प्रश्न काय करूं कपाळ! काय त्रास आहे हा! ठीक आहे. शेंकडा ऐशीं टक्के अक्षरें कठोर दडपतों, आणि सांगतों, कीं माझें प्रौढ कानडी या गांवढळाला कळत नाहीं म्हणून. दॅट इज् ए सिच्युएशन इंडीड्! सुंदर स्त्रियांच्या पवर्गाशीं तोंडमिळवणी करण्याकरितां म्हणून येथें आलों, तर या कानडी कांस्यांकुस्यांची धन झाली! बस हेंच खरें कीं या कानडी मारवाड्यांचा टवर्ग, लतिके-सारख्या सुंदर स्त्रियांचा पवर्ग, आणि पवर्गाच्या आशेनें या टवर्गांत पडणाऱ्या आम्हां तरुणांचा ढवर्ग.

**घनेश्वर**–गिरसाप्पा, नांव विचारतां ना त्यांना?

**प्रभाकर**—रुंड्ड गुंड्ड कुंड्ड?

**महेश्वर**—कामाण्णा.

**प्रभाकर**–नांव कामाण्णा! [स्वगत] हा घुणाक्षरन्यायानें या कटकटींतून खरोखरच नांव विचारण्याचा कानडी प्रश्न उमटला कीं काय?

**घनेश्वर**—गिरसाप्पा, आतां त्यांना आणखी—

**प्रभाकर**–[स्वगत] गिरसाप्पा कोसळला नऊशें फुटांवरून खालीं! [प्रकट] आमचा कन्नड संस्कृतप्राय! हे गवई गावंढळ राहतो! भवति, अस्माकं विदग्धवाङ्मयात्मिका नागरभाषा! न सा एवंविधैर्ग्राम्यैर्विना कष्टेन अवगम्यते!

**लतिका**–पीडा कुठली! तुमचा दुभाषीपणा करायला माझें अडलें नाहीं.

**घनश्याम**---माझ्या लक्षांत आलें. हें पहा, काकासाहेब, या गवईबुवांची सगळी माहिती मला आहे. शिवाय बोलण्याचालण्याची अडचण पडली तर याला गुजराथी थोडेंसें येतें. आपल्याला माहितीच आहे, कीं मला गुजराथी चागलेंच येतें. जवळजवळ माझी मातृभाषाच गुजराथी आहे. त्यामुळें तितकी अडचण पडणार नाहीं.

**घनेश्वर**---फार चांगलें. तुम्ही गुजराथी बोला यांच्याशीं. मराठी आहे, इंग्रजी, संस्कृत, कानडी, हिंदुस्थानी, तुमचें गुजराथी, एकदम इतक्या

भाषा घरांत सुरू करा. संसारयात्रेचा सगळा प्रवास एखाद्या आगगाडीच्या डब्यांत बसूनच केल्यासारखा वाटणार आहे या भाषावैचित्र्यामुळें ! बरें घनश्याम, याला कांहीं म्हणायला सांगा. गाण्यांत गोडी, मोहकपणा असला तर खपायचा नाहीं.

**घनश्याम**—कामाण्णा, तारा ध्यानमां आव्युं के शुं करवानुं ते छे? कर शरुवात एकदम. जो तारी गुजरातीए आपणी नवलख लाज राखी छे.

**महेश्वर**—भाई, फिकर जेवुं कइं नथी पण हवे तुं हवे अहीं न रहेतो मारो ताल ज्योई ले.

**घनश्याम**—बस, वधारे बोलना ! काकासाहेब, त्याला गावयाला सांगितलें. उगीच माझी लाज घालवूं नको म्हणून पढवावा लागला. बरें, हें गाणें मला माहीत आहे. याचें पद आटोपतें आहे तों मी टपाल पाहून येतों. [जातो]

**महेश्वर**—[स्वगत] आतां असा रेंकून गातों, कीं ऐकणाऱ्याच्या जिवाच्या ताराच काय, पण तंबुऱ्याच्या तारा तुटून पडतील ! [मिराबाईचें पद गातो]

**प्रभाकर**—[ स्वगत ] काय नुसता जनावरासारखा ओरडतो आहे ! गाण्यानें पशु मोहित होतात हें या गवयांच्यावरूनच जास्त सिद्ध होतें.

**घनेश्वर**—पसंत पडलें आपलें गाणें आम्हांला. ही पद्धति कुठची ?

**महेश्वर**—श्रीदाक्षिणात्यसंगीतपद्धति.

**लतिका**—मालतीताई, ऐकलास माझ्या लग्नाचा हा बेंडबाजा ? आणि आतां तो नवरदेव यायचा ! नंतर याच्या म्हातारड्या मंत्रांचा मारा ! एक आसन्नमरण झाल्यामुळें मंददृष्टि, तर दुसरा शून्यदृष्टीमुळें आसन्नमरण ! कोण केव्हां मरेल याचा नेम नाहीं ! नुसतें बघत रहावें यांच्याकडे !

**महेश्वर**—[ स्वगत ] हीं मुख्य दोन चित्रें, आणि या बाजूला दोन सावल्या. या दोघींना पाहिल्यामुळें माझ्या आंधळेपणाचें सार्थक झालें !

**लतिका**—मालतीताई, हा पुराणपुरुष मला मोक्षमार्ग दाखविणार आणि त्या वाटेवर हा कानडी कावळा भक्तिरसाची पाणपोई बांधणार ! आणि तूं म्हणतेस बाबांना उलट उत्तरें देऊं नयेत म्हणून !

**घनेश्वर**—हं लतिके, आपल्या या गुरुजनांची नीट व्यवस्था कर. हे श्रीस्वामी आणखी ते शिष्यस्वामी—

**लतिका**—बाबा, आतां मला जायचें आहे मालतीताईकडे. पुढें माझ्या कपाळीं काय सुख आहे तें दिसूं लागलेंच आहे! तूर्त इंदुबिंदूची जोडी द्यावी ह्यांच्या ताब्यांत. आणि स्वच्छ सांगतें, कीं मला त्रास दिलात तर मी जीव देईन. यू योगवासिष्ठ, आमच्या या बिंदुताईबरोबर चला; आणखी मीराके प्रभु, तुम्ही इंदुताईबरोबर चला. इंदुताई, ने या धृतराष्ट्रला संभाळून.

[ ते जाऊं लागतात. ]

**महेश्वर—**[ स्वगत ] तरी मीं घनश्यामाला सांगितलें होतें, कीं मी उघडया डोळ्यांच्या आंधळ्याचें सोंग घेतों म्हणून. खरें म्हटलें तर या सुंदरीकडे पहातांना इंद्राच्या सहस्र नेत्रांना सुद्धां चुकल्यासारखें वाटलें असतें. आणखी या घनश्यामानें मला धृतराष्ट्र बनविलें आहे! बाकी एका अर्थीं उघडया डोळ्यांच्या चंचल दृष्टीमुळें हिला पहातांच माझें सोंग उघडकीस आलें असतें. बरें, तूर्त या तंबोऱ्याला जपलें पाहिजे. नाहीं तर याच्यासकट कुठें तरी आमच्या भ्रमाचा भोपळा फुटायचा! या माझ्या मार्गदर्शक कैदाशिणीचें तोंड पहाण्याचा प्रसंग टळला, हा काय आंधळेपणाचा थोडा फायदा झाला?

**लतिका**—आपण उठा. आपले आंधळे जोडीदार गेलेसुद्धां! आपल्या वासिष्ठगोत्राशीं माझें पटेल असें का आपल्याला वाटतें? मालतीताई, प्रभाकरांनीं या म्हाताऱ्याचें कानडी सोंग पाहिलें तर त्यांना हंसतां हंसतां पुरेवाट होईल, नाहीं?

**प्रभाकर**—( जातां जातां ) प्रभाकराचें हें कानडी सोंग कुणीं पाहिलें तर त्याला मात्र पळतां पळतां पुरेवाट होईल! ( चौघेही जातात. )

**लतिका**—मालती, मी येतेंच यांची व्यवस्था करून. आज थंडी आहे, मला ओव्हरकोटही घालायचा आहे.

**घनेश्वर**—थिल्लरपणानें नको जाऊं अशी.

**लतिका**—थिल्लरपणानेंच जाणार. एकदां माझी मान कापा म्हणजे सुटलांत!

**घनेश्वर**—मालती, लतिकेला शिक्षण दिलें, त्याचे हे दुष्परिणाम!

**मालती**—मी जरा अधिक बोललें तर आपल्याला राग येणार नाहीं ना? शिक्षणामुळें लतिकाताईनें कोणता दुष्परिणाम दाखविला? नीटनेटका पोषाख करणें, जरासें लडिवाळपणानें बोलणें याला आपण दुष्परिणाम

म्हणतां का ? अशी बुद्धिवान् आणि निर्मळ मुलगी पाहूं जातां कोठें सांपडायची नाहीं. बोलण्याचें प्रमाण नेहमीं असेंच रहाणार आहे, असें का आपल्याला वाटतें ? अशा सुंदर स्वभावाला शिक्षणानें शोभा येते, कीं दूषण येतें बरें ? क्षुल्लक कारणावरून स्त्रीशिक्षणाविरुद्ध अशी सगळ्यांनींच हाकाटी केली तर कसें होईल बरें ?

( राग **बहार,** ताल **त्रिताल** )

**हृदयरत्नाकरिंचा हा फेन असे । सतत वसे । ज्या कालीं ।**
**ज्ञानरज्जु भ्रमवी मतिला आति दिव्य रत्न उदधिमुखें वमावि**
**खासें ॥धृ०॥ क्षोभ दावि अंतरिंचा न दिसे सामान्य जलीं**
**जैसा ॥ जड जळ न चळे चेतन खवळे रत्नगर्भ धरि फेंसा ॥**
**लघु नच त्यातें किमपि गणावें । परि शुभशकुन म्हणोनि**
**करावें । स्वागत हासें ॥ १ ॥**

**घनेश्वर**—आतां काय सांगावें मालती तुला ? बाकी एखादे वेळीं वाटतें कीं मनांत असेल नसेल तें सारें तुजजवळ सांगून टाकावें. ही आली आमची कन्या ! काय पोषाखाची तऱ्हा ही !

**लतिका—**प्रे, मालती, लुक् ॲट मी ॲंड टेल मी इफ् आय डू नॉट लुक ए नाइस मेरी लिटल गर्ल ऑफ सेव्हन्टीन्. जस्ट कन्फेस, मालती, डोन्ट् यू वुइश यू वेअर ए—

**मालती**—यू वेअर ए व्हॉट ? यू नॅस्टी लिटल थिंग्, यू आर **क्काइट** डेव्हिलिश !

**लतिका**—आणखी बाबा, असलें कन्यारत्न तुम्ही वाटेल त्याच्या गळ्यांत बांधीत आहांत ! लतिका तुमची लाडकी नाहीं का ? काय म्हणावें तुम्हांला ? " माया जळली का । तिळही ममता नाहीं का । आली पोटीं पोर एकटी तीही विकितां का ? "

**घनेश्वर**—काय ? काय म्हणालीस ?

**लतिका**—सो, डियर फादर, यू वॉंट इट अगेन् ? ( " माया जळली का " इत्यादि पूर्वोक्त. ) मालतीताई, चल. ( जातात )

**धनेश्वर**–( स्वगत ) असें येतें मनांत, कीं श्रीमुख रंगवून काढावें ! आतां तर माझी खात्रीच होत चालली, कीं हिला मोरेश्वरालाच देणें हाच एक इष्ट मार्ग आहे. कन्यारत्न म्हणे ! प्राणावर दरोडा पडायची वेळ आली म्हणजे रत्न देऊन प्राण वांचवावा लागतो. तीच कन्यारत्नाची गोष्ट. कोणी कांहीं म्हणो, सबसे प्यारा जीव आहे. उद्यां माझ्या भागीदारानें प्रसंग आणला, तर रत्न पोटांत गिळून जीव देण्यापेक्षां, पोटचें कन्यारत्न देऊन जीव वांचविलेला काय वाईट ? ही आजची योजना ठीक झाली. योगवासिष्ठाच्या सात पारायणापेक्षां, मोरेश्वराबरोबर सात जन्म संसार पुरवला, असें लतिकेला ताबडतोब वाटायला लागेल. गोष्ट हातची गेली. आधीं शिक्षणच द्यायला नको होतें. ( घनश्याम येतो ) या, घनश्याम. घनश्याम, या शिक्षणाच्या दुष्परिणामांनीं माझें डोकें अगदीं भंडावून गेलें आहे. ही लतिका, प्रभाकर, मनोहर शिक्षणानें सारींच कशीं हो बिघडलीं ?

**घनश्याम**—दुष्परिणामाचीं कारणें हुडकीत बसण्यांत काय लाभ होणार ?

**धनेश्वर**–बरें, मग एखादा उपाय तरी सांगा.

**घनश्याम**—वा; रोगाच्या निदानासह औषधाची योजना अवगत असल्यावर वैद्याची आवश्यकता कुठें राहिली ?

**धनेश्वर**–घरांत असा बखेडा का माजला आहे बरं ?

**घनश्याम**—आपणच सांगितलें होतें ना, कीं घरांत कुणी वडील माणूस नाहीं म्हणून ?

**धनेश्वर**—बरं मग ?

**घनश्याम**–आपण अद्याप अनुभवसिद्ध सावधपणानें बोलतां आहां, मी एकदम आडपडदा सोडून बोलतों. मात्र आपला हितचिंतक या नात्यानेंच मी हा अतिप्रसंग करीत आहें.

**धनेश्वर**–स्वच्छ, स्वच्छ बोला घनश्याम, आणि झटदिशीं बोला. हं–

**घनश्याम**–घरांत कुणी वडील माणूस नाहीं, तें आणायला पाहिजे.

**धनेश्वर**–अहो, वडील माणसें झाडाला का लागतात ?

**घनश्याम**—अकलेच्या मोलानें जगाच्या बाजारांत मिळतात. स्पष्टच सांगतों, आपण लग्न करायला तयार आहां का ? या वयांत लग्न करायला आपली हरकत आहे का ?

**धनेश्वर**—या वयाची दूरदृष्टि नाहीं तुम्हांला, घनश्याम ! वरपक्षाची कधीं हरकत असते लग्नाला ? हें पहा, आम्ही आहों सध्यां पन्नाशीच्या घरांत, तेव्हां आमच्या घरांत मुलगी द्यायला वधूपक्षाची हरकत असणार. खरें सांगूं ? हीच अडचण एवढी नडण्याजोगी आहे. बाकी, माझ्याविषयीं म्हणाल तर माझी लग्नाची इच्छा आहे, जवळ पत्रिका आहे, सगळें आहे.

**घनश्याम**—मग आपण लग्न करायला तयार आहां एकूण ?

**धनेश्वर**—कां असूं नये मीं तयार ? संसारांत किती अडचणी आहेत बरें ! घरांत वडील माणूस नाहीं हें तर तुम्हींच म्हणतां आग्रहानें—बरें नाहीं, मीं प्रथम सुचविलें; पण तुम्हांला पटलें तर खरें ना ?—झालें, उद्यां लतिकेचें लग्न निघालें म्हणजे देवकें बसवितांना शेजारीं पाटावर सुपारी का बसवूं अभद्रासारखी ? तेवढ्यापुरती आसपास उसनवार करतां येते थोडीच ? का एकुलत्या एक पोरीचें कन्यादान तिसऱ्याकरवीं चटावर करून घेऊं ? बापासारखा बाप मी, मला काय वाटेल बरें ?

**घनश्याम**—आपण माझें समाधान करण्यासाठीं उगीच कष्ट घेतां आहां ! बरें, वधूची निवड कशी करणार आपण ? म्हणजे साधारणपणें वयोमान, रूपरेखा, गुणावगुण या दृष्टीनें—

**धनेश्वर**—हें बघा, वधू वयानें प्रौढ, पुष्कळशी सुंदर आणि सद्‌गुणी असली म्हणजे झालें; मग उगीच फार चिकित्सकपणा नको. या अटी टाकण्याचीं तशींच कारणें आहेत, बरें का ? वधू प्रौढ वयाची एवढ्याकरितां पाहिजे, कीं मी बालावृद्धविवाहाला जरासा प्रतिकूल आहे. आतां वधूवरांच्या वयांतलें अंतर कमी करण्यासाठीं माझ्या पन्नाशींतून वजावाट करण्याची सोयच नाहीं. तेव्हां वधूच शक्य तितकी प्रौढ असलेली बरी. शिवाय आपल्याला वडील माणूस घरांत आणायचें आहे.

**घनश्याम**—कबूल आहे आपलें म्हणणें. बरें, ती सुंदर असली पाहिजे, होय ना ?

**धनेश्वर**—सुंदर नसून कसें चालेल ? एरवीं उद्यां लोकांत काय बोलवा होईल बरें ? म्हणतील, म्हातारा लग्नाला उतावळा झाला होता; जी काळीबेंद्री मुलगी मिळाली तीच पत्करून मोकळा झाला झालें; घनश्याम, वेडीविद्री, मुलगी पत्करून ही का आतां शोभा दाखवायची आहे ? या वयांत लग्न फार पोक्त

विचारानेंच करावयाला हवें. ही का पोराबाळांचीं लग्नें आहेत ? त्यांच्या लग्नांना कुणी नांवें ठेवीत नाहींत. तेव्हां वधू सुंदर असायलाच पाहिजे.

**घनश्याम**—हेंही पटलें; पण वधू सद्गुणी कशाला हवी ? केवळ कारण ऐकण्याच्या कौतुकानेंच विचारतों.

**धनेश्वर**—कौतुकानें कारण विचारतां; पण कारणाचें कौतुकच कराल. ऐका. वधू प्रौढ आणि सुंदर आहे, आणि सद्गुणी नाहीं; परिणाम काय होईल ? अनुरूप वधूवरांना निष्ठेनें वागायला परस्परांचे गुणच पुरेसे होतात. परंतु विषम वयाच्या जोडप्यांत ही जबाबदारी एकट्या पत्नीवरच असते. तेव्हां ती निरपेक्ष सद्गुणांची मूर्तिच असायला पाहिजे. तात्त्विक दृष्टीनें पाहिलें तर विवाहांतल्या एकनिष्ठेच्या शपथांची विषम विवाहालाच फार जरूरी असते. लग्नविधींत या शपथांना इतकें महत्त्व दिलेलें पाहून माझी अशी समजूत होत चालली आहे, कीं आपल्या या पवित्र आर्यावर्तांत पूर्वीं विषम वयाच्या बालावृद्धविवाहाचाच काय तो एकटा प्रचार होता.

**घनश्याम**—प्राचीन आर्यपरंपरेचेंच अभिमानानें अनुकरण करायचें असेल तर या आपल्या पन्नाशीपलीकडच्या वयांत आपण संन्यास घ्यायला हवा.

**धनेश्वर**—काय, वेडे आहांत का घनश्याम ? यांत अभिमान कुठें राहिला ? संन्यास घ्यायच्या वयांत संन्यास घेतला, लग्न करण्याच्या वयांत लग्न केलें, या गोष्टींत कौतुकानें अभिमान कशाला करायचा ? उपजत्या जीवाची जन्मपत्रिका करायची, तरुणांनीं प्रणयपत्रिका लिहायच्या, म्हाताऱ्यांनीं मृत्युपत्रें खरडायचीं, या जगरूढीच्याच गोष्टी झाल्या. तरतरीत तरुणानें संन्यास घेतला किंवा एखाद्या ऐन वृद्धानें गुडघ्यांतून मान काढून गुडघ्याला बाशिंग बांधलें तर अभिमान ! तरुण द्वारकाधीशानें सोळा हजार एकशें आठ वडील माणसें घरांत आणलीं त्याचें गोळाबेरजेचें मोजमाप सांगण्यापलीकडे जगानें काय कौतुक केलें ? पण त्याच श्रीकृष्णानें राधेसारख्या एकाच वडील माणसाचा संसार थाटून दिला तर त्या अलौकिक चमत्काराचें अजून कोडकौतुक चाललें आहे. तेंच वृद्धापकाळीं लग्नाचें भूषण. परवां आमच्या वकीलसाहेबांनीं आमचें मृत्युपत्र करून टाकण्याचा आग्रह केला तेव्हां संथपणानें त्यांना बसविलें तसेंच; आणि आमच्या जोशीबुवांना बोलावून वकीलसाहेबांच्यां देखत माझी जन्मपात्रिका तयार करवून घेतली. लहानपणीं मला मंगळ होता. काय बदल होतो हो बाळपणाच्या आणि आतांच्या

सृष्टींत ! आणि आतां तुम्हीं म्हणतां मी संन्यास घेईन म्हणून ! छातीठोक सांगितलें ना तुम्हांला, कीं मी लग्नाला तयार आहें म्हणून ? एकदां शब्द दिला तो दिला. घनश्याम, गोष्ट प्रथम तुम्हीं काढली; पण आतां तुम्हांलाच माघार घ्यावी लागणार ! का हो, कुठें पहाणार हो आमच्यासाठीं अशी वधू आतां ?

**घनश्याम**–पुन्हां आपण माझ्याकरितां कष्ट घेऊं लागलां ! वधू शोधून काढण्यासाठीं मला इरेस घातलेंच पाहिजे असें नाहीं. सुचवूं का मी आपल्यासाठीं एका वधूचें नांव ?

**धनेश्वर**–सुचवा बघूं.

**घनश्याम**– आपल्या धुंडिराजपंतांची मालती ! पसंत आहे माझी सूचना आपल्याला ?

**धनेश्वर**–काय भलतेंच बोलतां हें, घनश्याम ?

**घनश्याम**–भलतेंच कसें ?

**धनेश्वर**–पण तुमची कोणती सूचना मला पंसत पडली नाहीं, सांगा पाहूं ? अहो, आपल्या हितचिंतकाच्याच सूचना फेंटाळून टाकल्यावर मग माणुसकी कुठें राहिली ? पसंत आहे तुमची सूचना. मीं मघाशीं सांगितलेले गुण तर तिच्या अंगीं आहेतच.

**घनश्याम**–आपल्या लतिकाताईची ती मैत्रीण आहे. म्हणून—

**धनेश्वर**–वाः ! समजा, एखादी अनोळखी सावत्र आई लतिकेचा छळवाद करूं लागली, तर तें बरें होईल का ? मालती करील का तसें कधीं ? लतिकेचा स्वभाव ओळखून तिच्याशीं प्रेमळपणानें वागणें मालतीला मुळींच कठिण नाहीं. शिवाय असा लोकापवाद यायला नको, कीं आपण परक्याच्या पोरीचा गळा बांधला म्हणून ! आपल्या इष्टमित्राची मुलगी असल्यावर लोकांना बोलायला तोंडच रहाणार नाहीं मुळीं ! पण का हो, तो धांदरट म्हातारा रुकार देईल का लग्नाला ?

**घनश्याम**–तें माझ्याकडे लागलें. मी आपलें अन्न खातों आहें. आपला सर्वस्वीं अभिमान मला आहे. वाटेल त्या प्रयत्नानें आपलें हित करणें माझें कर्तव्यकर्म आहे. आपल्याच शब्दांत सांगतों, कीं एकदां शब्द दिला तो दिला. आपण आहांत ना लग्नाला तयार ?

**धनेश्वर**–एकदां सोडून दहा वेळां !

**घनश्याम**–ठीक आहे. मग मी घाईघाईनें जरी आपला निरोप घेत असलों तरी एवढें मात्र खात्रीनें सांगतों, कीं हें कार्य मी घडवून आणल्यावांचून रहाणार नाहीं. लागूं ना या कार्याला ?

**घनेश्वर**–माझा तुम्हांला आशीर्वाद आहे. [ घनश्याम जातो ] (स्वगत) हा घनश्याम बोलल्याप्रमाणें करील का ? हा पिळदार, करारी आणि बुद्धिवान् आहे, तेव्हां उगीच कांहीं तरी बोलायचा नाहीं खास ! पण धुंडिराजाकडून हा संमति कशी मिळविणार ? तो म्हातारा तर अशा लग्नाचें नांव सुद्धां काढूं द्यायचा नाहीं. मग घनश्याम कशाच्या जोरावर मला इतकें आश्वासन देऊन गेला ? धुंडिराज म्हाताऱ्याला या घनश्यामानें एखाद्या जाळ्यांत तर पकडून ठेवलेला नाहीं ना? नाहीं पण, तसें नसावें. कारण तसें असतें तर या घनश्यामानें स्वतःच मालतीशीं विवाह करून टाकला असता. कदाचित् असें असेल कीं धुंडिराज असेल पैशाच्या अडचणींत, आणि या घनश्यामाला कांहीं मध्यस्थी कबूल करून हा श्रीमंत जांवई गांठायची त्यानें युक्ति काढली असेल ! हां, असेंच असलें पाहिजे. काय मनुष्यस्वभाव आहे पहा ! पैशासाठीं म्हाताऱ्याला मुलगी द्यायला लोक तयार होतात हं ? मग या जगांत पंचप्राणांसाठींच आपली मुलगी एखाद्या मूर्खाला–तें सुद्धां लक्षाधीश मूर्खाला–देणें म्हणजे अपराध आहे असें कोण म्हणेल ? बस. वाटेल त्या उपायानें लतिकेचा मोरेश्वराशीं विवाह घडवून आणायला कांहीं एक हरकत नाहीं. नाहीं तर माझीं पापें मला उभा जाळून पोळून काढतील. पापाचीं फळें गोड असलीं तरी पचायला फार जड हेंच खरें ! [ जातो ]

---

# प्रवेश दुसरा

[ स्थळः—**धुंडिराजाचें घर**, पात्रें–**धुंडिराज** व **घनश्याम.** ]

**घनश्याम**–( स्वगत ) कां कुणास कळे, या थेरड्याला बघतांक्षणींच मला दिडाच्या आंत नाटक आटपण्याची कल्पना ताबडतोब आठवते. याच्या मनमोकळेपणाला उगीच मोकळें सोडण्यांत आतां कांहीं अर्थ नाहीं. (उघड)

धुंडिराजपंत, एका फार महत्त्वाच्या बाबतींत आपणाशीं मला थोडें बोलायचें आहे, आणि तें बोलणें सर्वस्वीं गुप्त रहावें हें आपल्यालाच हितप्रद आहे, म्हणून मी मुद्दाम एकांत साधून आपली भेट घेतों आहें. नीट लक्ष देऊन मी काय म्हणतों तें ऐकून घ्या. लक्ष आहे ना नीट ? धुंडिराजपंत, माझ्या एका अधिकारी मित्रानें मजजवळ एक कागद दिलेला आहे. हा पहा तो कागद. नीट लक्ष आहे ना ? ( कागद दाखवितो )

**धुंडिराज**—अरे बापरे ! हा तर–

**घनश्याम**—आपला तर्क बरोबर आहे, पण हें भेदरणें मात्र बरोबर नाहीं. मीं सांगितलें ना, कीं नीट लक्ष द्या म्हणून ? मी आपणांला भयचकित करून सोडण्यासाठीं आलों नाहीं. सध्यां फार बोलायला मला वेळ नाहीं आणि मी आपणांलाही वेळ देणार नाहीं. धुंडिराजपंत, हा आपला चोरी-बद्दलचा कबुलीजबाब. आपल्या खऱ्या स्वरूपाची रूपरेखा यांत स्पष्ट रेखा-टलेली आहे. मला वाटत होतें तितके आपण चांगले नाहीं, आणि आपणांला वाटतें तितका मी पण चांगला नाहीं. धुंडिराजपंत, आतां मी काय बोलतों तें नीट, फार नीट लक्ष देऊन एकदांच ऐकून घ्या. समजा, हा कागद मी कोणाला दाखविला, तर त्याचा काय परिणाम होईल बरें ? एका क्षणांत सरकारचे लोक तुम्हांला अटक करतील. चार चौघांकडून तुमच्यावर बेरड, बदमाष, चोर यांसारख्या शेलक्या शिव्यांचा मारा होईल. तुमच्या अपराधाला योग्य अशी शिक्षा भोगण्यासाठीं तुम्हांला तुरुंगांत जाऊन पडावें लागेल. तुम्ही तुरुंगांत जातांक्षणींच तुम्हांला जीव कीं प्राण वाटणारीं तुमचीं पोरेंबाळें अन्नावांचून थयथयां करतील. तुम्ही म्हणाल, कीं तुमच्या पश्चात् प्रभाकर तुमच्या मुलाबाळांचें योग्य संगोपन करील म्हणून; पण खाण्यापिण्याची तूर्त त्यांना अडचण न पडली तरी कैद्याचीं मुलें म्हणून त्यांना समाजांत अगदीं खालच्या पायरीवर जाऊन पडावें लागेल. जो तो तुमच्या मुलांकडे बोट करून म्हणेल, कीं हीं कैद्याचीं मुलें, हीं म्हातारड्या बेरडाचीं पापी पोरें, हीं त्या साळसूदपणाच्या नांवाखालीं डाके पाडणाऱ्या दरोडेखोराचीं कमजात कारटीं ! धुंडिराज, क्षणार्धांत तुमच्या भरलेल्या संसाराची अशी दुर्दशा करून टाकायचें हें साधन माझ्या अधिकारी मित्रानें वाटेल तो उपयोग करण्यासाठीं माझ्या हातीं देऊन ठेवलें आहे.

**धुंडिराज**—शिव हर! कैलासनाथ! कैलासनाथ! कायरे प्रसंग आणलास हा माझ्यावर! घनश्याम, घनश्याम तुम्ही कांहीं खात्रीनें अशी वेळ माझ्यावर आणणार नाहीं.

**घनश्याम**—धुंडिराज, देवाचीं नांवें आळविण्याइतकेंच या घनश्यामाच्या नांवानें टाहो फोडणेंही व्यर्थ आहे! देवांच्या सबंध मूर्ति दगडाच्या केलेल्या असतात, घनश्यामाचें नुसतें मनच दगडाचें आहे. घनश्याम जवळ जवळ तुमच्या निर्विकार देवाइतकाच दयाळू आहे. धुंडिराज, अगदीं शांत मनानें तुमच्यावर असा प्रसंग आणायला मला कोणती हरकत आहे ? मी तीच वेळ तुमच्यावर आणणार आहें, आणि तेंच सांगण्यासाठीं आतां मी आलों आहें. मी निश्चयपूर्वक तुम्हांला सांगून ठेवतों, कीं मला दयामाया बिलकूल नाहीं, आणि मी बोलेन तें करीनच असा माझा बाणा आहे.

**धुंडिराज**—नका हो नका! घनश्याम, माझ्या पोरांबाळांकडे पहा. नका हो असे निष्ठुर होऊं! तुमचे पाय धरतों, माझ्या गरीब बाळांना असें देशोधडीं लावूं नका.

**घनश्याम**—हें पहा धुंडिराज, मीं सांगितलें ना, कीं मला खरोखरी दयामाया मुळींच नाहीं म्हणून ? या आळवण्याविनवण्यांचा आणि रडण्याओरडण्याचा माझ्या मनावर कांहीं एक परिणाम व्हायचा नाहीं. माझें मन निश्वासांनीं हलायचें नाहीं, आसवांनीं भिजायचें नाहीं, किंकाळ्यांनीं हादरायचें नाहीं, किंवा शिव्याशापांनीं जळायचें नाहीं. मी सांगेन त्याप्रमाणें मुकाट्यानें वागाल तरच तुमच्यावर हें संकट मी आणणार नाहीं. मात्र नसते वादविवाद करण्याची माझी तयारी नाहीं हें मी आधींच सांगून ठेवतों. माझें म्हणणें अक्षरशः पाळायला तयार आहांत का?

**धुंडिराज**—तुमचें जें काय म्हणणें असेल तें मला मान्य आहे, कबूल आहे; पण माझ्यावर एवढी दया कराच हो!

**घनश्याम**—पुन्हा बोलायला लागलां! धुंडिराज, आधीं तुमची बडबड एकदम बंद करा! ऐका आतां. तुम्हीं आपली मालती धनेश्वरांना दिली पाहिजे. अजागळासारखे चेहरे काय बदलतां? धनेश्वरपंत लग्नाला तयार आहेत. तुम्ही आपली मुलगी मालती त्यांना द्यायला तयार असाल तरच तुमची अब्रू निभावेल.

**धुंडिराज**—अहो, काय बोलतां हो हें! नाहीं, माझा प्राण गेला तरी मी माझ्या मालतीच्या जन्माची अशी माती करणार नाहीं. मेलों तरी—

**घनश्याम**—ठीक आहे; मग मी मालतिसिकट—तुमच्यासकट तुमच्या सगळ्या मुलांबाळांच्या जन्माची माती करून टाकतों. धुंडिराज, तुमची अक्कल कुठें गेली तर नाहीं ना?

**धुंडिराज**—अक्कल गेली म्हणून तर या पेंचांत आलों. घनश्याम, धनेश्वरपंत तरी म्हातारपणांत लग्न कसें करताहेत?

**घनश्याम**—म्हातारपणीं चोऱ्या करण्यापेक्षां कांहीं वाईट नाहीं तें!

**धुंडिराज**—नाहीं हो, मीं खरोखरीच चोरी केली नाहीं! हा माझ्यावर निव्वळ अपरमात आहे.

**घनश्याम**—हा तुमचा ललाटलेख काय बडबडतो आहे मग? पण इतकी बडबड हवी कशाला? धुंडिराज, एका क्षणाचाही विलंब लावल्यावांचून एकदम सांगा, मालती धनेश्वरांना द्यायला तुम्ही तयार आहां कीं नाहीं? नाहीं तर तुमच्या घरादाराचा विध्वंस झालाच म्हणून समजा. आहांत कीं नाहीं तयार? बोला.

**धुंडिराज**—बोलूं काय कपाळ माझें! मालतीचा गळा कापूं, का पोरांबाळांच्या मानेवरून सुरा फिरवूं?

**घनश्याम**—लवकर सांगा म्हणून सांगितलें आहें मी.

**धुंडिराज**—कबूल आहे तुमचें म्हणणें मला. मालती! माझी मालती! जीव कासावीस होतो आहे अगदीं! घनश्याम, मी काय करूं हो?

**घनश्याम**—मुकाट्यानें मालती धनेश्वरांना द्या!

**धुंडिराज**—कोणत्या तोंडानें हें मालतीला सांगूं मी? घरांतलीं माणसें मला काय म्हणतील?

**घनश्याम**—हं, तें सर्व निर्विघ्नपणें कसें उरकायचें तें मी सांगतों. तुम्हीं मला त्या दिवशीं सांगितलेंच होतें, कीं तुम्हांला चार चार दिवस जमदग्नीचा सोंगापुरता अवतार धारण करतां येतो म्हणून! तसें सोंग आणा. हा विवाह घडवून आणण्याचा तुमचा दूरदृष्टीमुळें पूर्ण निश्चय झालेला आहे असें घरांत सर्वांना बजावीत सुटा. कोणी विरुद्ध बोलूं लागलें तर लागलींच एकेरीवर या. धनेश्वर गर्भश्रीमान् असल्यामुळें आपल्या मुलांच्या शिक्षणाला त्याच्या

द्रव्याचा फार उपयोग होण्यासारखा आहे म्हणून कांहीं झालें तरी हें लग्न उरकून घेण्याचा तुमचा दृढनिश्चय झाला आहे असें ठांसून सांगा. शिवाय वृद्ध श्रीमंतांना मुलगी दिल्यानें खर्च कमी येतो हेंही एक कारण सांगा. तुमच्याजवळ पैसा नाहीं ही गोष्ट सर्वांना ठाऊक आहेच. ही गोष्ट तुम्ही आपण होऊन करीत आहां असें भासविण्यासाठीं उत्साहानें वागा; कारण हें खऱ्या प्रकारासह कोणाला जर कळलें तर तुमच्या गळ्याला फांस बसेल हें विसरूं नका. ही मुख्य मुद्याची गोष्ट आहे.तुमच्या स्वतःच्या मनानें ही गोष्ट घेतली आहे हें सर्वांच्या मनांत नीटपणें बिंबवून द्या. खरी गोष्ट षट्कर्णी होतांच तुमचा कान लोकांच्या हातीं सांपडेल हें नीट लक्षांत ठेवा. धनेश्वरपंतांची श्रीमंती हें लग्नाचें मुख्य कारण. कोणाला खरें—म्हणजे या कागदाविषयीं—कांहीं कळवायचें नाहीं. याप्रमाणें प्रत्येक गोष्ट नीट मनांत वागवून माझ्या म्हणण्याप्रमाणें वागायला तयार आहांत ना?

**धुंडिराज**—तयार न होऊन करूं काय? घनश्याम, अहो असे कसे हो कसाबासारखे—

**घनश्याम**–ठरलें ना हें कायमचें? मग मला कसाब, राक्षस, दैत्य काय वाटेल तें म्हणा! आतांच घरांत या गोष्टीबद्दल बोलणें सुरू करा. जाऊं मी? तुमच्या मनांत बदल झाला तर तुम्हांला माहीत आहेच परिणाम काय होईल तो! नीट हुशारीनें वागा. जाऊं मी?

**धुंडिराज**–हं. [ घनश्याम जातो ] [ स्वगत ] अरेरे परमेश्वरा काय भयंकर प्रसंग आणलास हा माझ्यावर! मालती! मालती! बेटा मालती, तुला हें कोणत्या तोंडानें सांगूं आतां! देवा, यापेक्षां यापूर्वींच माझे डोळे कां मिटले नाहींस! [ स्वस्थ बसतो; कुसुम व कुमुद येतात ]

**कुमुद**—बाबा, बाबा, ही कुसुमताई म्हणते, कीं मी तुमची लाडकी नाहीं म्हणून! आहे ना हो बाबा, मी तुमची लाडकी?

**कुसुम**—आणि मी हो!

[ राग **भूप** ताल **पक्का** ]

**लाडकी असेंच थोर। नावडती कीं अघोर। नलगे मुळीं समोर। सांगा आम्हां ॥ ध्रु० ॥ मायेची देत जोड । पुर-**

**वितसां सकल कोड । देतां खायासि गोड । तोड न प्रेमा ॥ १ ॥**

**धुंडिराज**—( दोघींना पोटाशीं धरून स्वगत ) अरेरे, या लाडक्या चिमण्या जीवांसाठीं काय वाटतें तें करायला मला तयार झालेंच पाहिजे. हंसत खेळत माझ्या मालनचा गळा माझ्या हातानें कापायला मला सिद्ध झालें पाहिजे. ( उघड ) कुसुम, तूं माझी लाडकी आहेस; कुमुद, तूं पण लाडकी आहेस, आणि आपली मालतीताई पण माझी लाडकी आहे.

**कुसुम**—बाबा, ती पहा मालतीताई, लतिकाताई इकडे येताहेत !

**कुमुद**—आणखी बाबा, हे बघा इकडे प्रभाकरदादा आणि मनोहरदादा येत आहेत.

**धुंडिराज**—( स्वगत ) अजागळ थेरड्या धुंडिराजा, पोटच्या पोरीचा घांस गिळण्यासाठीं आतां हंसण्याच्या मिषानें थोबाड पसरून काळासारखा उभा रहा. [ एकीकडून मनोहर आणि प्रभाकर व एकीकडून मालती, लतिका, इंदु व बिंदु येतात. ]

**लतिका**—( स्वगत ) प्रभाकरांना पाहिल्याबरोबर त्या कानडी सोंगाचीच आठवण होऊन मला हंसायला येतें. हो, पण बाबांनीं यांच्याशीं न बोलण्याची मला ताकीद केलेली आहे ! शिवाय, मींसुद्धां यांचें तोंड न पहायची प्रतिज्ञा केलेली आहे.

**प्रभाकर**—( स्वगत ) रोज या कानडी सोंगाचा उपद्व्याप मोठा कठीण आहे. काल पहिल्यानेंच सोंग घेतलें त्या मानानें बतावणी ठीक झाली. पण तोंडावर सुरकुत्या रेखाटायच्या तशाच राहिल्या. आतां पुन्हां नीट सावधगिरी घेतली पाहिजे. शिवाय माझें रहाण्याचें जेवणाचें तुमच्या दक्षिणी घरांत जमायचें नाहीं म्हणून धनेश्वरपंतांना सांगून टाकलें हेंहि बरें झालें. नाहीं तर चोवीस तास त्यांच्या घरांतच डांबून बसावें लागलें असतें, आणि इथें घरीं बोभाटा झाला असता.

**धुंडिराज**—अरे वा ! लतिकाताई, कोणीच कसें बोलत नाहीं ? तुम्हांला कांहीं कमजास्त कळलें आहे कीं काय ?

**लतिका**—कमजास्त काय कळायचें, काका ?

**धुंडिराज**—( स्वगत ) थेरड्या, कर आतां मनाचा धडा आणि हो तयार. ( उघड ) आम्ही सांगतों तुम्हांला कांहीं कमजास्त. प्रभा, आपल्या मालतीताईच्या लग्नाचें जमलें.

**प्रभाकर**—म्हणजे ?

**लतिका**—लग्नाचें जमलें ? आणि तें कधीं ?

**धुंडिराज**—असे गडबडून जाऊं नका ! बसा नीट सारींजणें. माझ्या मनांत आली आहे एक कल्पना—कल्पना म्हणजे काय—निश्चयच झाला आहे माझ्या मनाचा ! आपली मालती—बरें का प्रभा ? धनेश्वरपंतांना द्यायची. अगदीं ठरला सिद्धांत हा !

**प्रभाकर**—म्हणजे ? म्हणतां काय तुम्ही काका हें ?

**लतिका**—कुणाला द्यायची म्हणालांत ?

**मालती**—( स्वगत ) बाबा माझी थट्टा तर करीत नाहींत ? पण ही अशी वेडीवांकडी थट्टा तरी ते कशी करतील ? देवा, मग प्रकार आहे तरी काय ?

**मनोहर**—( स्वगत ) काय ऐकलें हें मीं ?

**धुंडिराज**—तुम्हांला यांत इतकें नवल कशाचें वाटलें ? धनेश्वरपंतांना मालती द्यायची यांत आश्चर्य करण्यासारखें काय आहे ?

**प्रभाकर**—काका, यापेक्षां आश्चर्य तरी कोणतें दुसरें ? काका, थट्टा तर करीत नाहीं तुम्हीं ?

**धुंडिराज**—अरे, थट्टा कसली यांत ? धनेश्वरपंतांना मालती द्यायची असें माझ्या मनानें पुरतेपणीं ठरविलें आहे.

**लतिका**—आणि बाबा कबूल आहेत का या लग्नाला ?

**धुंडिराज**—हो धनेश्वरपंत तयारच आहेत या लग्नाला.

**प्रभाकर**—आणि तुम्हीही तयार आहांत म्हणतां ?

**धुंडिराज**—मी तर त्यांना मुलगी द्यायला तयार आहें; इतकेंच नव्हे तर इकडचा सूर्य इकडे आला तरी माझा निश्चय आतां ढळायचा नाहीं ! तुम्हाला यांत एवढें गैर काय वाटतें कुणास कळे !

**प्रभाकर**—खरें आहे ! काका, बालावृद्धविवाहापेक्षां गैर असें जगांत आहे तरी काय ? —

[ राग **दरबारी**, ताल **त्रिताल** ]

**जरठबाला । योग असा । भस्तरीं योग व्याकरणिं तसा ।। योग असा ।। धृ० ।। हिरा तइं दिसे उपलें मघवा श्वानें तुलियेला ।। १ ।। न बालरवि त्या बुडत्या । विधुसी संमुख चिर ठेला ।। २ ।।**

बाकी एका अर्थी साठीच्या सुमारांतला नवरदेव आणि आठीच्या आटोक्यांतली नवरी मुलगी अशी जोडी परस्परांना अनुरूप तर खरीच ! बालवधू गुडघ्यांत मान घालून बसलेली, आणि वृद्ध वराच्या वयोभारामुळें गुडघ्यांत मान आलेली ! कंबरेची कमान झाल्यामुळें दोघांची उंचीहि सारखीच ! वराच्या अंगाला वार्धक्यामुळें कंप सुटत असतो, तर त्या बापडया बालिकेच्या अंगाचा भीतीनें थरकांप होत असतो ! वधूचे दुधाचे दांत पडूं लागतात, तर तिकडे वराचे कायमचे दांत पडत असतात ! वधूवरांची अनुरूपता यापेक्षां आणखी ती कोणती असायची ?

**लतिका**–वृद्ध वराच्या थेरड्या थोबाडाच्या बोळक्याची बालवधूच्या चूलबोळक्यांच्या चिमुकल्या साजांत भर पडेल, हा सुद्धा एक लाभच म्हणायचा!

**धुंडिराज**–सारें खरें, पण या संबंधामुळें आपल्याला द्रव्यदृष्टीनें किती फायदा होणार आहे याची तुला अजून कल्पना नाहीं. आपल्या मुलांच्या शिक्षणाला धनेश्वरपंतांची केवढी मदत होईल बरें ?

**प्रभाकर**–काका, काका, काय बोलतां हें ? आज इतकीं वर्षे जिवापाड जपून तुम्हीं या प्रभाकराचा पिंड पोसून साडेतीन हात वाढविला आहे तो केवळ उगाच का ? काका, मुलांच्या शिक्षणाची चिंता करण्याचें तुम्हांला या पुढें काय कारण आहे बरें ! माझ्या हाडांचीं काडें करीन पण आपल्या माणसांच्या केंसालाही धक्का लागूं देणार नाहीं. आपल्या घराभोंवतीं माझ्या पांचही प्राणांचा पहारा उभा करायला मी कधीं तरी माघार घेईन का ? काका, एवढ्यासाठीं मालतीताईचा अशा राक्षसी रीतीनें बळी द्यायची बुद्धि तुम्हांला कुठून आठवली ? हमाली करीन, जन्माची गुलामगिरी पत्करीन, पण खर्चाची तोशीस कधीं पडूं देणार नाहीं.

**धुंडिराज**–हा एक फायदा झाला; शिवाय अशा लग्नांत खर्च किती कमी येतो याचा विचार कर पाहूं एकदां ? खर्चांचा सगळा बोजा आपल्या माथीं घ्यायला धनेश्वर तयार आहेत. घरांतली तनसडी सुद्धां बाहेर जायला नको.

**प्रभाकर**–काका, क्षमा करा. पण ही अगदीं अमानुष वृत्ति आहे !

[ राग **मारवा**, ताल **त्रिताल** ]

**नच तुला अशा कृतिलागिं लोकीं ।। करूं झटतां काशि तीच घातकी ।। धृ० ।। स्वधना न दवडाया तनुजोसि गर्ति दवडितसां । हत धिग् नरासि । किति पापराशि । प्रभुवर सुमतिसि दे तयासि कीं ।। १ ।।**

खर्च फार कमी येईल यांत शंकाच नाहीं. मुलीच्या आंसवांच्या मोत्यांचे सर सरत असतांना मोत्याची मुंडावळ सुद्धां आणायला नको. तिच्या डोळ्यांत लग्नप्रसंगीं गंगायमुना हजर असल्यावर भटांना मंगलाष्टकांच्या आरोळ्यांनीं गंगासिंधुसरस्वतींना साक्षीसाठीं बोलावण्याचेंहि कारण नाहीं. काका, कठोर बोलल्यावांचून या वेळीं रहावत नाहीं. घरांतली तनसडी सुद्धां बाहेर जायला नको ! अगदीं खरें आहे. अशा बालावृद्धविवाहांत मुलगी सुद्धां आपल्या घराबाहेर जायची धास्ती नको! कारण मुलगी सुद्धां चार दिवसांनीं पुन्हां आपल्याच घरीं परत यायची. काका, काका, काय मांडलें आहे तुम्हीं हें ?

**धुंडिराज**–जें काय मांडलें आहे तें पूर्ण विचार करूनच मांडलें आहे. प्रभा, मला हा पोरासोरी कारभार आवडत नाहीं. मी घराचा मालक आहें, आणि मला सर्व कांहीं कळतें आहे! धनेश्वराच्या श्रीमंतीची किंमत मला चांगली माहीत आहे.

**प्रभाकर**—ठीक आहे! मी हा असा जाऊन त्या म्हाताऱ्याला विचारतों, कीं गोरगरिबांना पाजीपणानें पिळून मिळविलेल्या पैशाच्या जोरावर अनाथ जीवांची अशी खरेदी करतांना तुला शरम वाटत नाहीं का म्हणून! त्या पाजी थेरड्याची चारचौघांत फट्फजीती न करीन तर नांवाचा प्रभाकरच नव्हे–

**मालती**–थांब, दादा, माझ्यासाठीं असें धाडस करूं नकोस! असें साहस करूं लागलास तर उद्यां तुला लतिका अंतरणार नाहीं का ? लतिका तुला देणें देणें हें सर्वस्वीं त्यांच्या–मला मागणी घालतेवेळीं त्या दिवशीं घनश्याम

पुरुषासारखे पुरुष असून मला हांक मारतांना अडखळले, मग आज माझी दशा विचित्र झाली तर काय नवल! लतिकाताई, त्यांना–तुझ्या वडिलांना–आज मी काका म्हणूं, कीं धनेश्वरपंत म्हणूं, कीं–

**लतिका**––ताई, माझ्या बाबांना खाटीक, कसाई, मांग, काय तुझ्या तोंडाला येईल तें म्हण! तुझ्या तोंडाला मी कोणत्या तोंडानें आळा घालूं?

**मालती**–ताई, अशी वैतागून बोलूं नकोस. भांबावल्यामुळें मीं तुला सहजगत्या विचारलें. प्रभादादा, तुझ्या बोलण्यामुळें लतिकाताईला राग आला पहा! माझ्यासाठीं तूं जर धनेश्वरपंताना वाटेल तें बोलूं लागलास तर कसें होईल बरें? तुझ्या जन्माचें सुख लतिकेच्या वडिलांच्या हातीं आहे हें विसरूं नकोस!

**प्रभाकर**––ताई, भलत्या प्रसंगीं काय भलतें बोलणें काढलेंस हें! माझ्या जन्माच्या सुखाची मला तुमच्या क्षणभराच्या सुखापुढें सुद्धां कांहीं किंमत वाटत नाहीं. मालतीताई, हा प्रभाकर म्हणजे धुंडिराजपंतांच्या घरच्या उष्टावळीवर वाढलेला तुम्हां सर्वांचा एक जन्माचा गुलाम आहे. तुझ्या आईबापांनीं आईबापांविरहित पोरका झालेल्या, अन्नाला मोताद होऊन भटकणाऱ्या अशा एका अनाथाला अन्नाला लाविलें, आणि त्या भणंग पोराचा समाजाला हा सुशिक्षित प्रभाकर करून दाखविला. ताई, तुमच्या सुखासाठीं मला वाटेल ते कष्ट करायला नकोत का? धनेश्वर पाजीपणानें तुझ्या जन्माचें मातेरें करायला तयार झाला असतां लतिकेच्या लोभानें या वेळीं मी तोंडाला खीळ घालून बसूं? लतिका मला जीव कीं प्राण आहे; ब्रह्मांडाच्या तुलनेनें मी तिचें मोल करीन; पण माझ्या मालतीताईच्या सुखापुढें मात्र मला लतिकेची आठवण सुद्धां व्हायची नाहीं. या वेळीं गप्प बसण्याबद्दल मला लतिकेसारखा सुंदर लांच धनेश्वरानें देऊं केला तरी तें मला नको आहे. मालतीताई, लतिकेसारख्या नखशिखांत सर्वांगसुंदर अर्धांगीला या वेळीं माझ्या दृष्टीनें तुझ्या नखाचीही सर येत नाहीं. माझ्या ताईच्या सुखाच्या होळींत हृदय होरपळून निघत असतांना लतिकेच्या प्रेमळ दृष्टीची चंद्रिका मला काय सुख देणार? लतिका आणि प्रभाकर यांच्या लग्नांतला लाजाहोम मालतीताईच्या सुखाची चिता पेटवून मी उरकून घेऊं का? नाहीं, ताई, तुला निर्वाणीचें सांगून ठेवतों, कीं मालतीच्या क्षणमात्राच्या सुखावरून

लक्षावधि लतिका आणि कोट्यावधि प्रभाकर नुसते ओंवाळून फेंकून द्यायला मी केव्हांही तयार आहें.

**लतिका**—( स्वगत ) शाबास, प्रभाकर ! एवढ्यामुळेंच तुमची योग्यता मला किती तरी मोठी वाटते ! बघूं का त्यांच्याकडे एकदां डोळे भरून ? हो, पण यांचें तोंड न पाहाण्याची प्रतिज्ञा मोडायची नाहीं का अशानें ? पण तसेंही नव्हे; कारण तोंड दाखविणार नाहीं अशी प्रभाकरांचीच प्रतिज्ञा आहे; मला त्यांच्याकडे पाहायला काय हरकत आहे ? पण नको; यांच्याकडे पाहिलें तर या वेळीं यांच्याशीं बोलण्याचा मोह मला आवरणार नाहीं; आणि बाबांनीं मला कोणाशीं बोलूं नकोस म्हणून बजाविलेलें आहे. असा त्यांचा आज्ञाभंग करणें योग्य नाहीं. शंभर अंक मोजून हा आनंदाचा आवेग नाहींसा केला पाहिजे. [ उघड ] एक, दोन; तीन. चार—

**मालती**—लतिकाताई, राग आला म्हणून शंभर अंक मोजायला लागलीस वाटतें ?

**लतिका**–(स्वगत) राग गेला म्हणून मात्र शंभर अंक मोजते आहें खरी.

**मालती**–दादा, पाहिलेंस ? तुझ्या बोलण्यानें ताईला वाईट वाटलें.

**प्रभाकर**–त्याला कोण काय करणार ! जाऊं दे तें. काका, आजवर या प्रभाला तुम्ही मुलाप्रमाणें वागवीत आलां, त्या हक्कानेंच मी आतां तुम्हांला बजावून सांगतों, कीं कर्तासवरता मनुष्य या नात्यानें घराची सगळी जबाबदारी आतां माझ्यावर आहे. मालतीताईचें असें लग्न मी होऊं देणार नाहीं. ताई, तूं निश्चिंत ऐस. असा त्या धनेश्वराकडे जातों. त्या पाजी हरामखोराचीं हजारों पापी कुलंगडीं बाहेर काढून त्याचे दांत त्याच्या घशांत कोंबतों.

**मालती**–दादा, माझ्यासाठीं असें कांहीं करशील तर माझ्या गळ्याची शपथ आहे; आईच्या आणखी बाबांच्या पायांची तुला शपथ आहे.

**प्रभाकर**–मालती, काय घातकी मुलगी आहेस तूं ! भलत्या वेळीं अशी शपथ घालायला—

**धुंडिराज**–मालती, प्रभा, धनेश्वरांच्या मनाला जर कुणीं दुखविलें तर घरावर तुळशीपत्र ठेवून मला कुठें तरी काळें करावें लागेल हें नीट लक्षांत ठेवा. मी आतां उणें अधिक बोलत नाहीं; पण तुम्ही पोरें मला विष खायची पाळी आणणार असें मात्र आतां मला वाटायला लागलें आहे. [ जातो. ]

**मालती**–दादा, अखेर बाबा रागावले खरे ! जा, आधीं त्यांची समजूत घाल पाहूं !

**प्रभाकर**–ठीक आहे ! ( स्वगत ) मालतीताईनें मला शपथ घातली तरी हरकत नाहीं; कानडी वेषानेंच घरांत वावरून त्या धनेश्वराची खोड मोडतों, आणि हें अनन्वित लग्न फिसकटवून टाकतों. [ जातो ]

**लतिका**–मालतीताई, मी पण जातें; नाहीं माझ्यानें आतां तुझ्याकडे पहावत.

**मालती**–जा, पण उगीच जीवाला त्रास करून घेऊं नकोस.

**लतिका**–नाहीं. [ स्वगत ] आतां जातें आणि बाबांची भेट घेतें. बाबांना काय म्हातारचळ भरला कीं काय ? [ जाते ]

**मालती**–तुम्ही असे स्तब्ध कां ? बोलत कां नाहीं ?

**मनोहर**—मालती, झाला हा प्रकार झाल्यावर तुझ्याशीं मी काय बोलूं ? मला जें विचारायचें आहे तें तुला कोणत्या शब्दांनीं विचारूं ? मालती, मी तुला काय विचारूं ? मालती, मी तुला काय विचारूं हें मला नीट समजावून दे. माझ्या मनःस्थितीची तूंच मला नीट कल्पना करून दे.

**मालती**–तुम्हांला असें विवंचनेंत पडण्याचें काय कारण आहे बरें ?

**मनोहर**–कारण ? अवघ्या जीविताचें जें कारण तेंच कारण ! मालती, झालेल्या प्रकारामुळें मी मोठ्या आपत्तींत येऊन पडलों आहें. माझ्या मनोवृत्तींचा आवेग इतका तीव्र झालेला आहे कीं तो कसा व्यक्त करूं हेंच मला कळेनासें झालें आहे. मालती, माझी आपत्ति म्हणजे कांहीं राष्ट्रीय आपदा नव्हे किंवा एखादें सामाजिक संकट नव्हे. प्रस्तुत परिस्थितींत हिंदी तरुणांची जबाबदारी मी पूर्णपणें जाणून आहें. प्रेमामुळें उद्भवलेले वैयक्तिक शोकावेग मुक्तकंठानें व्यक्त करण्याचा हा काळ नाहीं हें मला पटतें; पण राष्ट्रीय संकटाच्या विचारांत व्यक्तींचीं दुःखें अजीबात भासेनाशीं होतात असें मात्र मुळींच नाहीं. सर्वांग व्याधीनें विकल झालेलें असलें तरी करंगळी कापल्याचें दुःख तिचें तिला व्हायचें तें होतेंच. मालती, तुझ्या वडिलांच्या आतांच्या उद्गारांवरून माझ्या भावी आयुष्याची कल्पना मला एकाएकीं भयाण वाटूं लागली आहे.

**मालती**—मनोहर, मी लतिकाताईसारखी नेहमीं बोलत नसलें, तरी माझ्या मनाची परीक्षा तुम्हांला अजून झालेली नाहीं का ? बाबांनीं कांहीं जरी मनांत आणलें, तरी माझ्या विनंतीचा ते अगदींच अनादर करतील का?

**मनोहर**—मालती, या संसारांत अगदीं सामान्य सत्येंच अनुभवाच्य कडवटपणानें कधीं कधीं आपल्या प्रत्ययाला येत असतात. हजारों वेळां कानांवरून गेल्यामुळें त्या सत्य सिद्धांतांचे शब्द आपल्या मनाशीं अगदीं रुळल्यासारखे होऊन बसतात, आणि त्यामुळें त्या सत्याची उग्र तीव्रता आपल्याला अनुभवावांचून मुळींच वाटत नाहीं. पण अगदीं ओळखीच्या वाटेवरच्या धोंड्याची सहज चालतांना पायाला जशी जबर ठेंच लागते त्याप्रमाणें संसाराच्या प्रवासांतही एखादे वेळीं अशा साध्या सत्यावर जीव अनुभवानें ठेंचाळून पडतो, आणि आजन्म प्राणांतिक यातना भोगीत राहतो. मालती, माझ्या भावि आयुष्यांत मलाही अशा सामान्य सत्याचा पडताळा पटण्याची माझ्या मनांत आज भीति उत्पन्न झाली आहे.

**मालती**—कोणतें असें सत्य तें ?

**मनोहर**—मालती, स्पष्टोक्तीची क्षमा कर. स्त्रियांचा स्वभाव चंचल असतो हेंच तें सत्य. मालती, मालती, हें सत्य व्यवहारज्ञ जरी खऱ्या नाण्याप्रमाणें उपयोगांत आणीत असले तरी मी आजपर्यंत त्यास खोटेंच मानीत आलों आहें.

[ राग जंगला, ताल त्रिताल. ]

**या चंचला नारी । वदती नर गमति सर्व ते तामसी भारी ॥ धृ० ॥ स्त्रीदाक्षिण्या देति न थारा । दुरितें धरा मळवीति ते सारी ॥ १ ॥ स्वपापगंधें दूषविती ते । वितता दिशा जरि निर्मला चारी ॥ २ ॥**

मालती, मालती, या सत्याचा विषारी अनुभव मला येणार नाहीं ना ?

**मालती**—पुरुष अधीरप्रकृति असतात या सत्याचा मला मात्र अनुभव आला खरा.

**मनोहर**—मालती, एकाएकीं मन बावरल्यामळें माझ्या विचारसरणींत कुठें चूक होत असेल तर मला क्षमा कर. मालती, तुझ्या वडिलांचा आजचा आग्रही निश्चय आणि तुझी प्रेमळ पितृभक्ति हीं एकदम लक्षांत घेतलीं म्हणजे मनाला असें वाटूं लागतें, कीं एखादे वेळीं तूं वडिलांच्या मनाला दुखविण्या-

पेक्षां त्यांच्या म्हणण्याप्रमाणें वागायला तयार होशील. मालती, हा विचार मनांत आला म्हणजे भावी कालाची भीषण कल्पना डोळ्यापुढें उभी राहून चित्तवृत्ति अगदीं व्याकुळ होऊन जाते. मघांपासून या मनःक्षोभानें मी इतका विषण्ण झालों आहें, कीं एकाएकीं जीविताचे सर्व प्रयत्न मला नीरस वाटूं लागले आहेत. तुझ्या वडिलांनीं आपला आग्रह शेवटास नेला तर माझ्या आशेचाही शेवट झालाच म्हणून समज !

**मालती**––मनोहर, असें बोलणें आजच्या स्थितीला शोभण्यासारखें नाहीं खरें, पण तुम्हांला धीर देण्यासाठीं म्हणून जरा निर्भीडपणानें मीं बोलतें; तुमच्याशीं विवाह करण्याचें तुम्हांला शपथपूर्वक वचन दिलें तर माझ्या मनोवृत्तीबद्दलचा तुमचा अविश्वास दूर होईल का ?

**मनोहर**––माझ्या अधीर मनाच्या समाधानाला एवढा एकच खात्रीचा आधार आहे. मालती, असें उधार वचन तूं मला देशील का ?

**मालती**––मोठया आनंदानें! मनोहर, या संसारांत प्रेम हेंच परमेश्वरस्वरूप आहे. त्या परमेश्वरस्वरूप प्रेमाची शपथ घेऊन तुम्हांला हें वचन देतें, कीं ही मालती आजन्म आपल्या चरणांची दासी आहे.

[ राग **गौडमल्हार,** ताल **त्रिताल** ]

**हृदयसुमन हें वाहतसें । धवल जें दिसे । युत मृदुपणें**
**असे । परिमळें रसें ॥ धृ ० ॥ मिसळुनि रेणु चरणराजिं**
**अपुल्या । समरसचि व्हावया जिव शिवीं तसें ॥ १ ॥**

वचनासाठीं हस्तस्पर्श न केल्याबद्दल कुमारिकेच्या संकोचवृत्तीला क्षमा करा, ही वचनाच्या निश्चयाची दुर्बलता नसून अभिजातवृत्तीची प्रबलता आहे. मनोहर, मालती आपल्याखेरीज दुसऱ्याला वरणार नाहीं या वचनाला प्रत्यक्ष परमेश्वर साक्ष आहे. ( दोघेंही जातात )

---

# प्रवेश तिसरा

( स्थळ–**धनेश्वराचें घर.** पात्र–तंबोरा घेऊन बसलेला **महेश्वर** )

**महेश्वर**–(स्वगत) या घनश्यामाच्या कारस्थानामुळें काय विचित्र परिस्थितींत

येऊन पडलों आहें मी ! हे खेळ करायला या सैतानाला मी बरा रिकामटेकडा सांपडलों ! भरलेल्या पोटाच्या भांडवलावर रिकाम्या डोक्यांत सैतान आपला कारखाना घालतो, हें या एकंदर प्रकारावरून मला खरें वाटायला लागलें आहे. या धनेश्वराची लतिका मला मिळवून देण्याचें कबूल करून त्यानें या घरांत मला आणून सोडला खरा; पण अजून एकदां तरी ती लतिका दृष्टीस पडली असेल तर शपथ ! इथला कार्यक्रम अगदींच निराळा होऊं पहात आहे. सकाळपासून संध्याकाळपर्यंत शेवटच्या चरणाला ' मिराके प्रभु गिरिधर नागर ' जोडून रंगेल टुंबऱ्या भक्तिरसांत कोळायच्या आणि आंधळ्याप्रमाणें दिवसाची रात्र करायची ! जिभेला कानडी कुलूप ! सेवेला ऋद्धिसिद्धीसारख्या या इंदु आणि बिंदु ! काय एकेकीचें रंगरूप आहे पण ! स्त्रियाच्या सौंदर्यांतल्या सर्व वैगुण्यांची स्मरणासाठीं हीं विधात्यानें टांचणें तर करून ठेवलेलीं नसतील कदाचित् ? त्यांचीं तीं नाकें, ते डोळे, तो काळाकुळकुळीत रंग ! छे: छे: छे: ! कोणा तरुणांचे गळे कापण्यासाठीं परमेश्वरानें हीं कृष्णकारस्थानें करून ठेवलीं आहेत नकळे ! या दोघींच्या कचाट्यात दिवस काढणें मोठें कठिण आहे. आणि धनेश्वराचे ते कागद लांबविल्याखेरीज हा वनवास आटपायचा नाहीं आणि लतिका लाभायची नाहीं, असें तर घनश्याम सारखा वजावीत सुटला आहे ! आतां या आंधळ्या अवतारानें वावरून हें चौर्यकर्म उरकायचें कसें ? चला, आली ही इंदुनामक काळी कर्मकटकट ! आतां अगदीं विचारमग्न असल्यासारखें बसावें झालें. ( इंदु प्रवेश करिते )

**इंदु**—( स्वगत ) मेली कटकट म्हणतात ती ही अशी ! धनेश्वरकाका आमच्या लग्नाची तर कधीं गोष्ट काढीत नव्हतेच, पण अलीकडे निदान लतिकाताईच्या लग्नाची तरी वाटाघाट करूं लागले होते; पण आतां तें सारें मागें पडून काका स्वतःचेंच लग्न लावायचा बोजवारा मांडून बसले ! आतां लतिकाताईच्याच लग्नाचें जिथें नांव निघत नाहीं तिथें आमच्या लग्नाचा काय पाड ! तरी बिंदुताईला मी नेहमीं सांगत आलें, कीं आपलीं लग्नें आपणच जमविलीं पाहिजेत ! आतां काय होईल तें होवो, मी तरी आपलें लग्न जमविणार झालें.

( राग **बहार**, ताल **त्रिताल** )

**मिळवितें त्वरिताचि नवरदेव । हृदयींची गमत सकल**

**जणुं ठेव ॥ धृ० ॥ गुरुजन लाविती विवाह् तोंवरि । निघे**
**धीर नच मातें ॥ १ ॥**

या मेल्या रूपाची अडचण पडते, त्यामुळें अगदीं नाइलाज झाला आहे. कुठें स्थळ बघावें हेंच कळत नाहीं मेलें ! हे दोघे कानडी बरे आले आहेत आयते घरीं चालून. पण यांच्यांत आधीं कुणाला विचारावें बरें ? तो डोळस म्हातारा, कीं तो आंधळा तरुण ? त्या डोळसापेक्षां हेच बरे. कारण आपलें रूप नाहीं चांगलें; आणि तें कांहीं यांना दिसायचें नाहीं. तेव्हां याच्याजवळच काढावी गोष्ट झालें. ( जवळ जाऊन ) कामण्णा, अहो कामण्णा, अहो काकांच्या लग्नाचें ठरलें.

**महेश्वर**—कुणाच्या लग्नाचें ठरलें ? काय म्हणालीस तूं ?

**इंदु**—अगबाई ! तुम्हीं चांगलें मराठी बोललांत आतां ! मराठी येत नव्हते ना तुम्हांला ?

**महेश्वर**–( स्वगत ) घात झाला ! ( उघड ) इंदुबाई, जीभ जरा चांचरली इतकेंच. बाकी मला मराठी मुळींच बोलतां येत नाहीं. देवाशपथ मला मराठी अक्षरसुद्धां बोलतां येत नाहीं.

**इंदु**—अहो अजूनसुद्धां मराठींतच बोलतां आहांत ना चांगलें ! दम ग्या, आतां अशी जाऊन बाबांना सांगतें, कीं या गवईबुवांना मराठी चांगलें बोलतां येतें म्हणून.

**महेश्वर**—थांब इंदू, असा माझा गळा कापूं नकोस ! तुझ्या पायां पडतों. काय वाटेल तें झालें तरी हें धनेश्वराना सांगूं नकोस.

**इंदु**— नाहीं सांगायची, पण एका अटीवर.

**महेश्वर**—कोणती अट ?

**इंदु**—तुम्हीं माझ्याशीं लग्न केलें पाहिजे.

**महेश्वर**—( स्वगत ) अरे बापरे ! घातवार, व्यतिपात, संक्रांत, किंक्रांत, मरीआई, बारावा बृहस्पति, साडेसाती, सारीं एकदम उपटलीं !

**इंदु**—काय हो, कबूल आहे का ही अट तुम्हांला ? करतां का कबूल माझ्याशीं लग्न करण्याचें ? नाहीं तर अशी या पावलीं काकांकडे जातें—

**महेश्वर**—तुझे पाय धरतों; मला विचार करायला तरी वेळ दे.

**इंदु**—विचार कसला करायचा त्यांत ? मी का म्हातारीकोतारी आहें, का रूपानें वाईट आहे ?

**महेश्वर**—( स्वगत ) अवदसा काय डोळ्यांदेखत थापा मारते आहे ! पण आतां हिच्या रूपाकडे डोळेझांक केलीच पाहिजे; नाहींतर हा आंधळेपणाही हिच्या नजरेस यावयाचा. ठीक आहे, तूर्त हिला थाप द्यावी झालें. आज या घराला रामराम ठोकण्यापेक्षां घटकाभर हा जुलमाचा रामराम पत्करला.

**इंदु**—कां कसला विचार करतां ? मी सुंदर नाहीं असें का वाटतें तुम्हांला ?

**महेश्वर**—वाः ! तुला सुंदर न म्हणायला माझे डोळे फुटले का आहेत ?

**इंदु**—मग आतां अडचण कोणती राहिली ?

**महेश्वर**—तूंच आतां विचार कर नीट ! अग, मी असा आंधळा. आंधळा नवरा चालेल का तुला ?

**इंदु**—मला आंधळा नवरा चालेल, मुका चालेल; पांगळा चालेल. कसा का असेना, मला कुंकवाला धनी पाहिजे.

**महेश्वर**—शिवाय मुख्य अडचण दुसरीच आहे. तूं अशी गरीब; मी तर बोलूनचालून भिकारी; त्यांतून असा आंधळा ! आपला चरितार्थ तरी कसा चालायचा पुढें ?

**इंदु**—अगदीं भिक्षा मागून पोट भरूं प्रसंग आला तर. तुम्हांला गातां येतें चांगलें. कुठेंही एकतारी घेऊन बसलों तरी पोटापुरतें मिळेल आपल्याला. शिवाय तुम्ही आंधळे असल्यामुळें लोकांना तुमची दया पण येईल तितकी.

**महेश्वर**—लोकांना दया यायला आंधळेपणाची कांहीं जरूर नाहीं. नुस्ता तुझा नवरा या नात्यानें जो पुरुष उभा राहील त्याची साऱ्या जगालाच दया येईल म्हणा !

**इंदु**—हं, हें कुत्सितपणाचें बोलणें कां निघालें आतां ? तुम्हांला कुणीं सांगितलें आहे वाटतें, कीं मी दिसायला आपली अशीतशीच आहे म्हणून ?

**महेश्वर**—कोणीं कांहीं सांगितलेलें नाहीं मला. आणि समज, तूं फारच कुरूप असलीस, तुझा रंग काळाकुळकुळीत असला, तुझी नजर तिरळी असली, तुझी मान तिरपी असली, तुझ्या तोंडावर तेहतीस कोटी देवांचा कबिला मुक्कामाला उतरला असला, तुझे डोळे एकदां नीट बसवल्यावर बाहेर

काढून ब्रह्मदेवानें पुन्हां वरच्यावर अलग ठेविल्यामुळें बटबटीत असले, तुझी हनुवटी शेवटाशीं दीड दोन बोटें चौकोनी कापून काढल्यासारखी असली, तुझे हातपाय धडाला खिळयांनीं ठोकून चिकटवल्यासारखे लुले दिसले—

**इंदु**—सांगितलें कुणीं हें सारें यथांबुज वर्णन तुम्हांला ?

**महेश्वर**—समज म्हणून म्हटलें होतें ना मीं ? मी म्हणत होतों कीं समज, तूं जरी अशी असलीस, तरी मला काय वाईट वाटायचें त्यांत ? आंधळयाच्या दृष्टीनें पद्मिनी आणि शूर्पणखा ही विजोड जोडी एकरूपच असते.

**इंदु**—बरें, मग माझ्याशीं लग्न करण्याचें शपथेवर वचन देतां ना ? पाहा नाहीं तर अशी निघालें काकांकडे !

**महेश्वर**—( स्वगत ) आमची प्रीतिविवाहाची पुरी हौस फिटण्याचा रंग दिसतो ! नायकानें नायिकेच्या संकटाची भीति दूर केल्यामुळें प्रीतिविवाह घडून आल्याचीं नाटककादंबऱ्यांतून कैक उदाहरणें सांपडतील; पण नायिकेनें नायकाला संकटाची भीति घालून घडवून आणलेला हा पहिला प्रीतिविवाह आहे.

**इंदु**—कामण्णा, कबूल करतां कीं नाहीं एकदम ? घेतां कीं नाहीं शपथ ?

**महेश्वर**—घेतों, घेतों शपथ ! ऐक नीट.

**इंदु**—नुसतें ऐक नाहीं, हातावर हात ठेवून शपथ घेऊन वचन द्या. देवाब्राह्मणांची शपथ घ्या चांगली.

**महेश्वर**—( तिचा हात धरून ) दे तुझा हात पाहूं ? हं ! हे स्वर्गस्थ देवांनो आणि हे स्वर्गाखेरीज दुसरीकडे खितपत पडलेल्या पितरांनो, तुमच्या साक्षीनें या इंदूला मी तिच्याशीं लग्न करण्याचें वचन देतों. इंदु, झालें ना तुझ्या मनासारखें ? बोलत कां नाहींस ?

**इंदु**—मी आतां लाजलें आहें ! या वेळीं माझ्या गालावर गुलाबी रंग चढला आहे.

[ राग **काफी**, ताल **धुमाळी** ]

**किती दुर्भाग्य तुमचें दृष्टिच अंधा झाली ॥ धृ० ॥ नच पळ आरक्त या गालिं अभागी खिळली ॥१॥ नच तारुण्या-चिया क्षण प्रभातीं रमली ॥ २ ॥ नच उकलाया कशी कूट**

**गुलाबी झटली ॥ ३ ॥ दृक्शल्यावीण या स्वत्व गुलाबा न मुळीं ॥ ४ ॥**

**महेश्वर**—हें बघ, दृष्टीलाच कळण्याजोगे हे जे शृंगारिक फेरफार होत जातील ते यापुढें वेळेवर मला शब्दानें कळवीत जा. बरें पण मला मराठी येतें हें कुणाला सांगणार नाहींस ना?

**इंदु**—आतां कशी सांगेन मी? चला आतां, अगदीं निर्धास्त रहा. [ जाऊं लागतात. ] [ स्वगत ] आतां हें लग्न जमल्याचें बिंदुताईला केव्हां सांगेनसें झालें आहे मला! हें ऐकतांच बिंदुताईला मत्सरानें सुचेनासें होईल अगदीं! काय आनंदाचा दिवस उगवला तरी हा आज! [ उघड ] हं, असे जपून चला.

**महेश्वर**—चला. [ स्वगत ] मिराके प्रभु 'गिरिधर नागर! तुझ्या नांवावर फसून काय संकटांत येऊन पडलों हा मी! बाकी घरांतली माहिती मिळवावयला हें चांगलें साधन हातीं आलें आहे. धनेश्वराचे कागद हस्तगत करायाला आतां वेळ लागणार नाहीं.

**इंदु**—चला सावकाश. [स्वगत] बिंदुताई कुठें भेटेल कुणाला ठाऊक.

[ जातात ]

---

# प्रवेश चौथा

[ स्थळ—**धुंडिराजाचें घर.** पात्रें—**मालती** व **धुंडिराज** ]

**धुंडिराज**—मालती, मालन, मालती?

**मालती**—काय बाबा?

**धुंडिराज**—मालती, बेटा, तूं बोलत कां नाहींस? बाळ, माझ्यावर रागावली का आहेस?

**मालती**—बाबा, मी बोलूं का? बोलतेंच मी. तुम्ही फट्दिशीं बोलूं नकोस म्हणायच्या आधींच मला बोलायचें तें बोलूं का? म्हणजे तुमचें सांगणें मोडण्याचें तरी माझ्या कपाळीं यायचें नाहीं. पण बाबा, मी तुम्हांला बोलूं तरी काय?

[ राग **केदार**, ताल **त्रिताल** ]

**भाव विरोधी प्रकट व्हावया । झटति शब्दरूपें वदनीं या ॥ धृ० ॥ वदन सदन हें नच शांतीचें युद्धक्षेत्र सजे या समया ॥ १ ॥ शद्ब न सजविति एकमेकां झुंजति वधिती शमती वायां ॥ २ ॥**

माझे जन्मदाते म्हणून तुमच्या गळयांत 'बाबा' म्हणून प्रेमानें मिठी मारूं, कीं माझ्या गळयाला फांस बांधायला तयार झालां म्हणून तुमच्यापासून दूर तोंड लपवून बसूं ? आजवर प्रेमानें माझी जोपासना केलीत त्याबद्दल तुमची उतराई कोणत्या शब्दांनीं होऊं ? उद्यां माझ्या जन्माचा सत्यानाश करतां आहां म्हणून तुम्हांला कठोर तरी कोणत्या शब्दांनीं बोलूं ? तोंडाकडे रागानें पाहीन म्हटलें तर तुमची आतांपर्यंतची उदार माया आठवून डोळ्यांत आंसवें उभीं रहातात, आणि तुमची लाडकी मुलगी म्हणून पायांवर डोकें ठेवूं लागलें तर आतांच्या बोलण्यावरून तुम्ही मला पायाखालीं तुडवून टाकाल अशी धास्ती वाटते. तुमच्यापासून दूर उभी राहिलें तर मायेनें माझ्या डोळ्यांतलीं आंसवें पुसून टाकायला दुसरें कोणी नाहीं म्हणून वाईट वाटतें, आणि तुमच्या पदराखालीं तोंड लपवायला आलें तर ममतेनें तोंडावरून हात फिरवितां फिरवितां चटकन् माझ्या कपाळाचें कुंकू पुसून टाकाल अशी भीति वाटते. बाबा, माझें लग्न जमवितां आहां या आनंदानें मी तुमच्या गळ्यांत मिठी मारूं, कीं आपल्या गळ्यांतल्या ताइतासारखी मालती वृद्ध पतीच्या गळयांत बांधूं नका म्हणून तुमच्या पायांशीं मिठी मारून बसूं ? कपाळीं कुंकू लाभतें आहे म्हणून हंसायला लागूं, कीं कपाळ फुटलें म्हणून रडत बसूं ? बाबा, तुमचें मन इतकें प्रेमळ, आम्हां मुलांना आईपेक्षांही तुमचा ओढा अधिक; आणखी आज एकाएकीं असे निर्दय, असे कठोर, निष्ठुर पाषाण-हृदयीं कसे हो झालां ? ही कसाबकरणी तुम्हांला कुणीं हो शिकविली ?

**धुंडिराज**—[ एकदम मालतीला साष्टांग नमस्कार घालून मुक्त कंठानें ] मालती, बेटा, मला क्षमा कर. मालती, मी तुझा अनंत अपराधी आहें. मालती, मला क्षमा कर.

**मालती**—बाबा, हें काय. उठा. माझ्या पायां पडतां ? उठा, बाबा.

**धुंडिराज**—बाळे, मला अभय दिल्याखेरीज मी तुझे पाय सोडणार नाहीं. मालती, मला क्षमा कर.

**मालती**—बाबा, बाबा, हें काय बरें असें? माझ्या गळ्याची शपथ आहे तुम्हांला! बाबा, हा काय प्रकार आहे? मला सांगा तरी. [ धुंडिराज उठून उभा राहतो ]

**धुंडिराज**—मालती, तुला काय सांगूं आणि कोणत्या तोंडानें सांगूं? बाळे मालती, मालती, आपल्यावर आकाश कोसळलें ग! आपल्या घरावर आगीचा पाऊस पडला! बाळे, आपण ठार बुडालों! बाळे, माझ्याच्यानें बोलवत नाहीं. मालती, मालती, मी काय करूं? कुठें जाऊन तोंड दडवूं? मालती, बाळे, हें काय झालें!

**मालती**—पण बाबा, हें काय झालें तें मला सांगा तरी. बाबा, रडूं नका. बाबा, मला भीति वाटते हो! बाबा, मला सांगा काय झालें तें आधीं!

**धुंडिराज**—बाळे, घरांतल्या घरांत मोठ्यानें बोलायची सुद्धां चोरी झाली आहे. एक अक्षर कुणाच्या कानावर गेलें तर आपल्या घरादाराचा सत्यानाश होईल. बाळे, इकडे ये. (तिच्या कानांत सांगतो) त्या दिवशीं स्टेशनावर हा प्रकार झाला. तो कबुलीजबाबाचा कागद त्या अधिकाऱ्यानें घनश्यामांच्या हातीं आणून दिलेला आहे. आणखी आतां घनश्याम म्हणताहेत, कीं मालती धनेश्वरपंतांना दिली नाहींत तर तो कागद मी उघडकीस आणीन. बाळे, असें झालें तर आपल्यावर ब्रह्मांड कोसळल्यावांचून रहाणार नाहीं. म्हणून आपल्या हातीं नेऊन तुला खाटकाच्या घरांत लोटावी लागते! बाळे, मी माझ्या मरणाला भीत नाहीं. मला तुरुंगांत घातला, फांशीं दिला तरी तुझ्या सुखासाठीं मला कशाचें कांहीं वाटणार नाहीं. पण माझ्या एकट्याच्या मरणानें भागत नाहीं, मी तुरुंगांत गेल्यावर आपल्या मुलांबाळांचें काय होईल? कैद्याचीं मुलें म्हणून जो तो त्यांना दूर लोटील! लोक आपल्याला हिडिसफिडिस कां करतात हें सुद्धां त्या बापड्यांना कळायचें नाहीं. बाळे, हें अपेश टाळण्यासाठीं मला अंगचोरपणानें मागें राहून तुला आपल्या हातीं विहिरींत ढकलावी लागते. तरच त्या घनश्यामांचें समाधान होईल.

**मालती**—बाबा, काय सांगतां हें तुम्ही! असें कसें हो झालें?

**धुंडिराज**—बाळे, तुला सांगितलें हें सारें खरें आहे. एरवीं तुझा असा गळा कापायला मी खाटीक आहें का कसाब आहें? पण बाळे, मी लाचार आहें! मालती, मी या जगांत चोर ठरलों! दरोडेखोर ठरलों! [मालतीला पोटाशीं धरून] बाळे, तुझ्यासारखीं अशीं रत्नें ज्याच्या हातापायांशीं पडलीं आहेत तो मी चोरी करीन का? कुबेराचें भांडार दारावरून जाऊं लागलें तरी सुद्धां ज्यानें तें नुसतें पहाण्यासाठीं तुमच्यावरून क्षणभर नजर हालविली नसती, तो दीडदमडीच्या दागिन्यांचा लोभ धरील का? बाळे, मी अपराधी नाहीं, मी नाडलों आहें. मी लबाड नाहीं, चोर नाहीं, बाळे, मीं कोणाचा कांहीं अपराध केलेला नाहीं. बाळे, बाळे, आल्या जन्मांत माझा एकच अपराध झालेला आहे! या व्यवहारी जगांत, या धूर्त जगांत, बाळे, मी भोळाभाबडा आहें, मी साधा आहें, मी वेडाबगडा आहें, एवढाच काय तो माझा अपराध आहे. माझ्यांत पांचपेंच नाहींत एवढाच काय तो माझा गुन्हा झाला! आणखी म्हणून बाळे, मला असा भुर्दंड भरावा लागतो आहे. बाळे, तुझ्या जन्माची माती या माझ्या हातांनीं कशागि करूं? बाळे, तूं मला काय म्हणशिल? जग मला काय म्हणेल? मालती, मालती, मी भांबावून गेलों आहें! मी काय करूं? या संकटांतून कसा ग मुक्त होऊं? माझ्या कच्चाबच्चांना कसा वांचवूं?

**मालती**—बाबा, हें मला आधींच कां नाहीं सांगितलें? बाबा, मला कांहीं माहीत नव्हतें म्हणूनच मी तुम्हांला वाईटसाईट बोललें. वेडेंवांकडें बोलून मीं तुमच्या काळजाला घरें पाडलीं. बाबा, बाबा, मला क्षमा करा. बाबा, ही मालती मोठी निष्ठुर आहे, चांडाळीण आहे. बाबा, मला ठाऊक नव्हतें हो! मी तुम्हांला नाहीं नाहीं तें टाकून बोललें. बाबा, हें पाप मी कुठें हो फेडूं?

**धुंडिराज**—बेटा मालती, बाळे, तूं काय पाप केलें आहेस असें? कांहीं नाहीं, कांहीं नाहीं. बाळे, मीच तुझा गळा कापायला तयार झालों आहें, मालती, आतां आपलीं पोरेंबाळें कुठें लपवून ठेवायचीं? मी करूं काय? मालती, मला कांहीं सुचेनासें झालें आहे. जिवाला उकडल्यासारखें झालें आहे. माझी कुसुम, माझी कुमुद, माझीं बाळें! मालती, मी काय करूं? यांतून कसा सुटूं? माझा धीर खचला!

**मालती**—बाबा, मुळींच धीर सोडूं नका ! ही पहा मालती तुमच्या पायांशीं उभी आहे. आपल्या मुलाबाळांचे जीव राखण्यासाठीं माझ्या जिवाचे हाल करून घ्यायला मी तयार आहें. धनेश्वरांशीं लग्न करायला मालती तयार आहे म्हणून खुशाल घनश्यामांना सांगून पाठवा. प्रेमानें पोसलेल्या या मालतीच्या देहाच्या रगतभाताचे घांस चारा; पण माझ्या भावंडांची उपासमार होऊं देऊं नका. बाबा, मी तुमची मुलगी आहें. आमच्या सुखासाठीं तुम्हीं काय काय केलें नाहीं ? मग माझ्या गोजिरवाण्या भावंडांसाठीं मलासुद्धां माझ्या सुखावर पाणी सोडायला नको का ? बाबा, कांहीं एक काळजी करूं नका. तुमचा गुंतलेला गळा मोकळा करण्यासाठीं, आपल्या लहान लहान भांवंडांच्या सुखासाठीं, ही मालती धनेश्वरांच्याच काय पण एखाद्या प्रेताच्या सुद्धां गळ्यांत माळ घालण्यासाठीं स्वतःचें सुख पायांनीं तुडवीत आनंदानें चालून जाईल.

[ राग–**मियाचा मल्हार**, ताल **एका** ]

**स्वसुख तृणाचि मानितें । जरि तें स्वजनसुखातें विघ्न घडवितें । सिद्ध तुडविण्यातें ॥ धृ० ॥ मत्कुलतरु-सुफलांचें अवन न करितां तें । अपहारी जीवनरस उत्पाटन उचित तरि तयातें ॥ १ ॥**

**धुंडिराज**–शाबास, बेटा मालती, शाबास ! तुझ्यावरचें हें अरिष्ट टाळण्यासाठीं माझ्या प्राणांचा सत्यानाश करून घ्यायला मी केव्हांही तयार आहें; पण मी मेल्यानें आपल्या लेंकरांचें मरण टळत नाहीं, आणि म्हणूनच तुझा बळी द्यायला मी तयार झालों आहें ! मालती, मालती, किती उदारपणा तुझ्या मनाचा हा !

**मालती**–बाबा, मी तुमची मुलगी आहें ! जा, मी समाधानानें, आनंदानें, संतोषानें धनेश्वरांशीं लग्न करायला तयार आहें असें घनश्यामांना आतांच जाऊन सांगा.

**धुंडिराज**—पण मालती, एक गोष्ट लक्षांत ठेवायला मात्र विसरूं नकोस. घनश्यामाच्या जुलमामुळें आपण अशा लग्नाला तयार झालों आहों असें कुणाला कळतां उपयोगी नाहीं. चिकित्सकपणानें चौकशी करितांना फट्दिशीं कुणाला त्या कागदाचें कारण उमजलें तर एकदम सारा घात होईल. आप-

णच आपखुशीनें या लग्नासाठीं धडपडतों आहों असें लौकिकांत आपण दाखवायला पाहिजे. खरी गोष्ट बोलण्याची आपल्यालाच चोरी आहे.

**मालती**—बाबा, त्याची तुम्ही मुळींच काळजी करूं नका. धनेश्वरांची श्रीमंती मला हवी म्हणून सांगायला मी तयार आहें. लोक काय वाटेल तें म्हणोत! बाबा, आतां आपण निःसंग झालो! दैवीं आलें तें सोंग साजरें करून दाखविलें पाहिजे. बाबा, तुम्ही आतां कांहींएक मनांत ठेवूं नका.

**धुंडिराज**—बाळे, मग या कामासाठीं जाऊं का म्हणून तुझा कसा निरोप घेऊं?

**मालती**—हो, बाबा, तुमच्या जवळ माझें एक मागणें मात्र आहे काय तें!

**धुंडिराज**—बाळ, काय मागणें आहे तुझें? [ मालती खालीं पहाते ] बेटा, बोलत कां नाहींस? काय मागणें आहे बाळ तुझें?

**मालती**—एकदां मनोहरांना भेटण्याची मला परवानगी द्या. बाबा, तुम्हांला सर्व माहीत आहेच.

**धुंडिराज**—खुशाल मनोहराला भेट! जाऊं मी आतां?

**मालती**—थांबा, बाबा, आणखी एक मागणें राहिलें. बाबा, मघांचें माझें सारें निष्ठुर बोलणें मोठ्या मनानें विसरून जा, आणि आपल्या लाडक्या मालतीला तोंड भरून एकदां आपला आशीर्वाद द्या; म्हणजे मनोहरांना भेटायचा मला धीर येईल. बाबा, मला तुमचा आशीर्वाद द्या!

**धुंडिराज**—आशीर्वाद! मालती, हा घे [ मालती धुंडिराजाच्या पायांवर डोकें ठेवते. ] माझा आशीर्वाद!

“ शास्त्राभ्यास नको, श्रुती पढुं नको, तीर्थास जाऊं नको।
योगाभ्यास नको, व्रतें मख नको, तीव्रें तपें तीं नको॥
काळाचें भय मानसीं धरुं नको, दुष्टांसि शंकूं नको।
ज्याचीया स्मरणें पतीत तरती तो शंभु सोडूं नको॥

देवराया, तुझ्या राज्यांत असा कायरे अपराध आम्हीं केला, का आम्हांला आपल्या दाराशीं आज असें पतितांसारखें ओढून आणीत आहेस? कुणाच्या कपर्दिकेचा कधीं लोभ धरिला नाहीं, कुणाच्या मनाला कधीं दुखविलें नाहीं,

मिळाली ती मीठभाकरी खाऊन दुसऱ्यांना मोकळ्या मनानें आशीर्वाद दिले, दुसऱ्याचा पाय लागला तरी आधीं आमचा नमस्कार घडला, त्या आमची कां रे अशी दैना व्हावी? हें नष्टचर्य आमच्या ललाटीं कां लिहून ठेविलेंस? अवघ्या पुण्याईचें हेंच का निर्वाणीचें फळ? ऊठ, मालती, माझी साधीभोळी पुण्याई अंगांत संचरून मी बोलतों आहें! बेटा मालती, खुशाल धनेश्वराशीं लग्न लाव. तुझें लग्न होतांच देवादारीं धरणें धरून बसेन, आणि मरून तुझ्या पोटीं येईन. बेटा मालती, अष्टपुत्रा सौभाग्यवती भव! जा म्हाताऱ्या धनेश्वराशीं लग्न कर, नाहीं तर अगदीं एखाद्या प्रेताशीं लग्न लाव, तुझा संसार सुखानें साजरा होईल. मालती, हृदय फोडून, रक्त आटवून तुझ्या बापानें तुला हा आशीर्वाद दिलेला आहे! तो खोटा करण्याची साक्षात् देवाच्या बापाची प्राज्ञा नाहीं! चल, हुषार हो, आणखी पुसून टाक तीं आंसवें. ( तिचीं आसवें पुसतो. )

**मालती**—बाबा, इतक्या प्रेमाचा आणखी पुण्याईचा हात आंसवें पुसायला तयार असल्यावर घटकोघटकीं रडायला कोण तयार होणार नाहीं? संसारांत रडण्याचें दुःख कधीं वाटत नाहीं; पण ऐन वेळीं आधिकारानें आंसवें पुसायला कोणी नसतें म्हणून वाईट वाटतें.

**धुंडिराज**—शिवहर, कैलासनाथ! कैलासनाथ! [ जातो ]

**मालती**—( स्वगत ) काय ऐकलें, काय पाहिलें, आणि काय झालें हें! झालें! आतां काय राहिलें? मनोहरांना भेटायचें. त्याची तसबीर—त्यांच्या प्रेमाची खूण—त्यांना परत करायची, त्यांचा निरोप घ्यायचा—संसाराचा निरोप आणि सुखाचाही निरोप घ्यायचा! एवढा माझा धीर कसा होईल? धनेश्वरांच्या श्रीमंतीसाठीं मी तुम्हांला लाथेनें झुगारून देत आहें असें मनोहरांना कोणत्या शब्दांनीं सांगूं? सुखाच्या भरल्या संसारांतून आपल्या पावलीं कशी निघून जाऊं? देवा, मला या वेळीं धीर द्या! [ कुमुद येते. ] कुमुदताई, कां रडतेस बाळ?

**कुमुद**—ताई, कुसुमताईनें हें बघ माझें कुंकूं विसकटलें! नीट रेखून लाव पाहूं.

**मालती**—लावतें बरें बाळ. जा, कुंकवाचा करंडा घेऊन ये.

**कुमुद**—मी नाहीं जात करंडा आणायला! वाटेंत कुसुमताई उभी आहे. तुझ्याच कपाळींचें थोडें कुंकूं काढून माझें कुंकूं नीट कर.

**मालती**—( स्वगत ) कुमुदताई, किती वेळेवर मला सावध केलेंस ! ( उघड ) लावतें अं; हलूं नकोस जरा. ( आपल्या कपाळचें कुंकूं तिच्या कपाळीं लावते. ) अस्सें ? पळा, आतां जा; खेळायला.

**कुमुद**—ताई, अग तुझें कुंकूं विसकटलें पण! करंडा आणून लाव नीट पुन्हां बरें का ? ( जाते. )

**मालती**—तथास्तु ! ( स्वगत ) कुमुदताई, तूं करंडा आणायला जाऊं लागलीस म्हणजे आपली कुसुमताई आड येते, पण मी कुंकवाचा करंडा आणूं लागलें तर माझें दुर्दैव आड उभें राहतें. विसकटलेल्या कुंकवानेंच मला आतां माझें सौभाग्य शृंगारायचें आहे ! मनांत रामराज्य योजून ठेवलें होतें; पण ! नशिबाला असा वनवास आला ! संपला सारा संसार ! सगळ्या सुखांचें, आशांचें, प्रेमाचें ब्रह्मांड लोपून गेलें ! आतां माझ्या जवळ काय राहिलें ? एक हा एवढा एकांतांतला एकच अश्रु ! बाबा निघून गेले; हा अश्रु आतां कुणी पुसायचा बरें ? वेडे मालती, हा एकांतांतला अश्रु आतां गालावरचा गालावरच वाळायचा !

( राग पिलु, ताल दीपचंदी )

**आलें नशिबिं या निःसार मनें ।। सांत्वन अपुलें भाषण करणें ।। धृ० ।। श्वासा श्वास न मिळतां अंतरिं । प्राण असे आतां विरणें ।। १ ।। नयनजला नच कुणि चुंबाया । शोक-दाहि ठरलें सुकणें ।। २ ।।**

---

# प्रवेश पांचवा

[ स्थळः—**धनेश्वराचें** घर, पात्र—**महेश्वर** कांहीं कागद पहात बसला आहे. ]

**महेश्वर**—[ स्वगत ] हेच ते कागद याबद्दल शंकाच नको. घनश्यामानें ज्या खाणाखुणा सांगितल्या त्या एकसारख्या जमताहेत तर खऱ्या !

कागद म्हणजे लतिकेचें खरेदीपत्र, इंदूची सोडचिठ्ठी, माझी लग्नकुंडली, काय वाटेल तें ! घनश्याम बुद्धिवान् खरा ! अंदाजानें या कागदपत्राचा पत्ता

काय नेमका सांगून टाकला त्यानें ? मोजून टाकावेत हे सारे एकदां म्हणजे झालें ! [ कागद चोरून मोजूं लागतो. मागाहून हळूच बिंदु येते. ]

**बिंदु**—[ स्वगत ] मनाला कसा चटका लागून राहिला आहे सारखा ! होय नव्हे म्हणतां म्हणतां इंदूनें आपल्या लग्नाचें जमवूनच टाकलें आपलें. आंधळा असो, कानडी असो, पण कसा झाला तरी तो नवरदेवच ! डोळे नसले म्हणून मुंडावळ्या बांधतां येत नाहींत किंवा कानडी आहे म्हणून वरात काढतां येत नाही असें थोडेंच आहे ! उद्यां तिचें लगीन उभें राहिलें म्हणजे माझें पापच उभें राहिलें म्हणायचें ! त्यांतून मी वडील बहीण ! आतां कसें खालीं मान घालणें आलें मला ! या कार्टीनें काय खटपटी केल्या त्या कांहीं कळत नाहींत ! मी वधते विचारून त्या कानडी म्हाताऱ्याला. पण नाहीं, इंदूचा तोरा अशानें नाहीं कमी व्हायचा. या कामण्णाचेंच स्थळ लाभलें पाहिजे ! पण हा काकांच्या खोलींतून गेला केव्हां बाहेर ? मीं सारखी पाळत ठेवली ती फुकटच गेली वाटते ? ( पाहून ) अगबाई ! हा तर इथें कमलेसे कागद घेऊन—अगबाई ! चांगला दोन्हीं डोळ्यांनीं पहात बसला आहे. आंधळा नव्हे हा ! अन् काकांचे मराठी कागद वाचतो आहे ! बरा दुहेरी तिहेरी सांपडला आहे ! [ हळूच त्याच्यामागें जाऊन उभी रहाते. ] कामण्णा, अहो कामण्णा, काय करितां हो हें ?

**महेश्वर**—[ स्वगत ] अरे बापरे ! [कागद लपवून व डोळे मिटून गाऊं लागतो. ] ' मिराके प्रभु गिरिधर नागर '.

**बिंदु**—आतां गाण्याचा आव घालतां काय ? काका, अहो काका !

**महेश्वर**—[ तिला नमस्कार घालून ] " दुगे दुर्धट भारी तुजविण संसारीं अनथनाथे अंबे करुणा विस्तारीं " बिंदुबाई, एका गरीब, परदेशी आंधळ्यावर दया करा ! " मुके आंधळे पांगळे आणि थोटे " या दुर्बळांच्या यादींत आम्ही आंधळे दुय्यम दर्जाचे अधिकारी आहोंत. कोणीही खुशाल डोळे मिटून आम्हां आंधळ्यावर दया करावी.

**बिंदु**—ही आंधळी कोशिंबीर पुरे करा ! या आंधळ्या सोंगानें मी कांहीं आतां फसायची नाहीं. तुम्ही आंधळे पण नाहीं, आणि तुम्हांला मराठी पण चांगलें येतें ! काकांचे मराठी कागद चोरून चांगले दोन्हीं डोळ्यांनीं पहात होतां ते ?

**महेश्वर**—हा प्रमाद माझ्याकडून अगदीं नजरचुकीनें झाला. निव्वळ नजरचूक! विंदुताई, माणसाच्या हातून अशी नजरचूक होत नाहीं का कधीं?

**विंदु**—तर तर! तुमच्या स्वतःच्या नजरचुकीनें नव्हे तर दुसऱ्याची नजर चुकवून तुम्ही हा कारभार करीत होतां.

**महेश्वर**—बरें, माझ्याकडून अपराध झाला खरा, पण तुम्ही मला क्षमा करणार नाहीं का?

**बिंदु**—करीन क्षमा; पण माझ्याशीं लग्न करण्याचें वचन द्याल तर क्षमा करीन.

**महेश्वर**—[ स्वगत ] अरे बापरे! हिला लग्नाचें वचन द्यायचें आतां! मी गिरणीच्या धुरांड्यांत पडून कासावीस होत आहें कीं आगगाडीच्या रुळाखालीं गळा सापडून चेंगरून मरत आहे? ज्वालामुखीच्या अग्निरसात शिजून निघत आहें कीं उत्तर ध्रुवावरच्या बर्फामुळें गोठून जात आहें? आकाश दुभंगून मी सदेह वैकुंठाला जात आहें कीं धरणीकंपांत गडप होऊन मी अमेरिकेंत प्रगट होत आहें?

**विंदु**—काय म्हटलें मी? तुम्ही माझ्याशीं लग्न करण्याचें वचन देत असाल तरच तुम्हांला क्षमा करीन, नाहीं तर तुमचीं शंभर वर्षे भरलींच म्हणून समजा!

**महेश्वर**—ही कसली क्षमा? अहो, तुमच्याशीं लग्न करण्यापेक्षां अधिक भयंकर शिक्षा ती कोणती उरली? माझीं शंभर वर्षे भरल्याची तुम्ही मला भीति घालतां आहां, पण मी म्हणतों शंभर वर्षांचें दीर्घायुष्य तुमच्यासारख्या सोबतिणीच्या सहवासांत घालविण्यापेक्षां तशी तडकाफडकी संसारयात्रा आटपलेली काय वाईट?

**विंदु**—ही तुमची बोलण्याची कारवाई नको आहे मला. घटकाभर असेंच म्हणाना कीं मी आपली कुरूपच आहें म्हणून—

**महेश्वर**—घटकाभर? मी तर तुम्हांला घटकाभर सोडून जन्मभर कुरूप म्हणायला तयार आहें. बिंदुबाई, तुम्हीं कधीं आरशांत डोकावलें आहे का?

**बिंदु**—हातच्या कांकणाला कशाला हवा आरसा? आहें, मी अगदीं कुरूप आहें; पण इंदुताईला लग्नाचें वचन देतांना तुमचे डोळे फुटले होते वाटतें? इंदुताई तेवढी तुमच्या नजरेंत भरली आणि—

**महेश्वर**—चुकतां आहां तुम्ही बिंदुबाई. इंदु नजरेंत भरली तेव्हां मी तिच्याकडे आंधळ्याच्या दृष्टीनें पहात होतों हें विसरतां तुम्ही !

**बिंदु**—पण खरोखरीच आंधळे कांहीं नव्हतां तुम्ही ! इंदुताईपेक्षां मी रूपानें वाईट आहें ?

**महेश्वर**—तुम्ही दोघी सख्ख्या बहिणी ! तुमच्यांत सरसानिरस कसें ठरवितां येणार ? प्रत्येक व्यंगाला व्यंग आणि काळ्या रंगाला हा काळा रंग दोघींच्या ठिकाणीं हजर आहेच. एक नूरजहान तर दुसरी मस्तानी ! फार गोरेपणामुळें विडा खातांना मस्तानीच्या गळ्यांतून पिक उतरतांना दिसत असे म्हणतात. त्याप्रमाणें बिंदुबाई, तुम्हीं जर डांबराचा रस गिळलांत तर या तुमच्यां काळ्या रंगामुळें तो सुद्धां खुलावटीनें घशाखालीं उतरतांना स्पष्ट दिसेल ! बरें, जो प्रकार तुमचा तोच इंदूचाही. खरें म्हटलें तर पूर्वीचे मोंगल बादशहा फार चांगलेपणाच्या कल्पनेनें आपल्या मुलींना बेगमा बनवीत असत, तशा फार वाईटपणामुळें तुम्ही दोघींनीं सुद्धां बेगमाच रहायला हवें. तुम्ही दोघी टवकारून पाहूं लागल्यावर तरुणांची तर गोष्टच नको, पण निर्जीव आरशांचीं भिंगें तडकतील आणि घड्याळांचे कांटे सुद्धां जागच्याजागीं थबकतील. तेव्हां तुम्हां दोघींत फरक तो काय काढावयाचा ? नाहीं म्हणायला फार बारकाईनें पहायचें म्हटलें तर तोंडावरच्या या देवीच्या वणांची संख्या काय कमी जास्त असेल तेवढीच ! तुमच्या कुरूपपणाची तुलनेनें मोजदाद करतांना सूक्ष्म दृष्टीनें या देवींच्या दशांशस्थलापर्यंत गणिताला हांकलीत नेण्याखेरीज उत्तर सांपडायचें नाहीं !

**बिंदु**—तुमचा हा पाचकळपणा बंद करा पाहूं ! देतां कीं नाहीं लग्न करण्याचें वचन ?

**महेश्वर**—अहो, पण मी इंदूला वचन दिलें आहे ना ?

**बिंदु**—तें मला काय सांगतां ? तिला दिलेलें वचन मोडा, नाहीं तर आम्हां दोघींशीं लग्न करा.

**महेश्वर**—खासा उपाय सुचविलात ! बाकी दोघींशीं लग्न केल्यावर तुमच्या काळ्या रंगाच्या आधारावर जन्माचें गुजराण व्हायला मात्र हरकत नाहीं ! पांढरी पातळें नेसवून उन्हातान्हांतून तुम्हांला घाम येईपर्यंत फिरवून आणावें, आणि तीं पातळें खुशाल काळ्या चंद्रकळा म्हणून विकीत सुटावें !

किंवा तसें कशाला? तुमच्या काळया रंगाच्या भांडवलावर ब्रह्मदेवाकडून निदान हपसाणांची एक तरी पिढी रंगवून काढण्याचाच मक्ता घ्यावा झालें आणि उद्यां काळ्या रंगाच्या पोराबाळांनीं घर भरलें म्हणजे गोऱ्या लोकांना शिद्दी बनवून युरोपखंडाची आफ्रिका करणें म्हणजे सुद्धां हातचा मळ होईल माझ्या! आणि आपला हा रंगाचा कारखाना श्वेतसमुद्रांत काढला तर मग तुमच्या दोन बुचकळयांनीं रशियाच्या दक्षिणेप्रमाणें उत्तरेलाही एक काळा समुद्र निर्मून चांगल्या भूगोलपंडिताची सहज दिशाभूल करून दाखवितां येईल! तुमच्या खग्रास मुखचंद्राचा धनी मनांत आणील तर इकडचा सूर्य सुद्धां तिकडे करून टाकील!

**बिंदु**—तुमची बडबड वाढायला लागली! हें बघा, मीं तुम्हांला बजावून सांगतें कीं, मुकाटयानें माझ्याशीं लग्न करण्याचें वचन द्या. इंदुताईला काय वाटेल तें सांगून निरोप द्या. नाहीं तर इथल्या इथें आरडून ओरडून सारें घर जमा करीन. काकांना तुम्ही अजून ओळखीत नाहीं? त्यांना सांगतें कीं, तुम्हांला मराठी चांगलें येतें, तुम्ही आंधळे नाहीं, आणि शिवाय तुम्ही खाजगी खोलीं-तून हे कागद चोरून आणले आहेत म्हणून. काका असेच्या असे तुम्हांला चौकीवर नेऊन पोंचवितील; आणि अखेरीस जाल चांगले काळ्या पाण्यावर. करतां लग्न, कीं, लागूं ओरडायला!

**महेश्वर**—( स्वगत ) काय नशीब कोलांटया उड्या मारतें आहे पहा! ती बया कशी तरी वाटेला लाविली, तेव्हां वाटलें कीं सारी अलाबला टळली म्हणून. पण लागलीच ही दुसरी बला पुढें येऊन उभी राहिली! माझ्या लग्न-कुंडलींतले सगळे शुभ ग्रह प्लेगामुळें बाहेरगांवीं रहायला गेले आहेत कीं काय!

**बिंदु**—अजून तुम्ही कबूल होत नाहीं? करूं का तुमची व्यवस्था एकदाची?

**महेश्वर**—तुमचें अंतःकरण तुमच्या बहिरंगापेक्षांही जास्त काळेंकुट्ट आहे म्हणायचें!

**बिंदु**—आतां उत्तर द्या एकदांचें पाहूं?

**महेश्वर**—( स्वगत ) घनश्यामानें या संकटांत घालते वेळीं मला फक्त काळ्या डगल्यांच्या पोलिसांचीच भीति घातली होती; पण इथें पाहातों तों मदनाच्या राज्यांतल्या या काळ्या रंगाच्या पोलिसांशीं गांठ येऊन पडली. आतां काय करावें हेंच कळत नाहीं. जन्मठेप काळ्या पाण्याचा चोर होऊं का

जन्मठेप काळया रंगाचा मालक होऊं ? जाऊं द्या; इंदूप्रमाणेंच ही पीडा पण ग्रळली पाहिजे.

**बिंदु**---काय झालें ? आहांत का कबूल लग्नाला ? का करूं आरडाओरड ?

**महेश्वर**---बस्स, बिंदू, शरण आहें तुला मी ! "घालीन लोटांगण। वंदीन चरण। डोळ्यांनीं पाहीन रूप तुझें !" मग तें कैदाशिणीचें रूप असलें तरी चालेल.

**बिंदु**---शपथ घ्या पाहूं अशी !

**महेश्वर**---देवांब्राह्मणांची शपथ घेऊन सांगतों कीं, तुझ्याशीं लग्न करायला केव्हांही तयार आहें ! या माझ्या शपथेंत अंतर होणार नाहीं. पण बिंदु, आतां माझा घात मात्र करूं नको.

**बिंदु**---आतां या वचनानें माझ्या मनाचें पूर्ण समाधान झालें ! आतां मी आपल्या अर्ध्या वचनांत राहीन. पण इंदूला दिलेलें वचन मात्र तुम्ही मोडायला हवें हो ?

**महेश्वर**---इंदूला माझें मराठी बोलण्याचें गुपीत माहीत झालें आहे, म्हणून इतक्यांतच तिला बिथरवून उपयोगी नाहीं; म्हणून तिच्याशीं जरा सावधगिरीनें वाग. तसेंच मी बाह्यात्कारीं आंधळा आहे हें विसरूं नकोस. शिवाय या कागदांच्या चोरीचा तर कुणाला मागमूससुद्धां लागतां कामा नये.

**बिंदु**---पण या असल्या चोरीवांचून अडलें होतें काय ? उगीच गळ्याला फांस !

**महेश्वर**---हें बघ, हें चौर्यकर्म अगदीं सात्त्विक पद्धतीचें आहे. हे कागदपत्र धनेश्वरपंतांच्या कामाचे आहेत. ते सांपडत नाहींसे झाले म्हणजे धनेश्वरपंत आपले हे कागद सांपडून देणारास बक्षीस लावतील. या गोष्टीची वर्तमानपत्रांतून जाहिरात येईल; आणि मग आपण कागद धनेश्वरपंतांना नेऊन देऊं, आणि ते आपल्याला हजारपांचशांचें बक्षीस देतील. यांत कुणाचें काय नुकसान झालें ? तूर्त ही गोष्ट कुणाजवळ बोलूं नकोस म्हणजे झालें. इंदूला लग्नाचें वचन दिलें तेव्हां चरितार्थाच्या सोईसाठीं मीं ही युक्ति योजून काढली, ती अनायासें तुझ्या उपयोगी पडणार आतां ! पण आतां कठें कांहीं बोलणार नाहींस ना ?

**बिंदु**—नाहीं बोलायची ! पण तुम्हीसुद्धां इंदूशीं फारसें बोलत जाऊं नका. चला आतां.

**महेश्वर**—चला. आतां मी पुन्हां आंधळा होतों ! ( स्वगत ) जय मिराके प्रभु गिरिधर नागर ! कृष्णावतारीं आपण एकच कुब्जा संभाळली; पण तुमच्या कृपेनें आज मी दोन कुब्जांचा धनी झालों ! ( जातात )

———

# प्रवेश सहावा

( स्थळ–**धुंडिराजाचें** घर, पात्र–**मालती**. मनोहराची तसबीर पुढें आहे. )

**मालती**—( स्वगत ) प्रेमाच्या मंगल चित्रा, प्रीतीच्या पवित्र परमेश्वरा, आज मी तुझा निरोप घेणार ! मस्तकावर हात ठेवणाऱ्या माझ्या पितृस्वरूप परमेश्वराच्या आज्ञेनें, गुडघ्याला मिठ्या मारणाऱ्या गुडघ्याएवढ्या, गोजिरवाण्या जगाच्या सुखासाठीं ही मालती आजवर प्रेमानेंच पाहिलेल्या, मनानें जोपासलेल्या, जिवापाड जपून ठेवलेल्या हृदयस्थ भावबंधनाचे धागे निर्दयपणानें आज तडातड तोडून टाकीत आहे. प्रेमळ चित्रा, मालती जड जिभेची आहे, मालती बोलत नाहीं हा केवळ लोकापवाद होता. लबाड चित्रा, आपल्यासमोर खिळवून मालतीला चित्रासारखी तटस्थ कोणीं करून ठेविली होती !

( राग **हमीर**, ताल **त्रिताल** )

**त्वां मजला भारिलें । मंत्रबलें मतिला मोहियलें ।**
**अपुलेंसें केलें अचल बनविलें ॥धृ०॥ स्वसम सुजन करि**
**निज संसर्गें । तच्चित्ताहि तरि चित्त न झालें ॥ १ ॥**

प्रेमाच्या नवरंगांनीं नटलेल्या देवा, तुझ्याकडे पाहतांना, डोळ्यांनीं आत्मा चरणीं अर्पण करितांना मालतीनें मनःसंकल्पानें काय बोलायचें बाकी ठेवलें

होतें ! आपल्या चिमुकल्या डोळ्यांत प्रेमाचें ब्रह्मांड उभारून चित्रदृष्टीनें टक लावून आपण माझ्याशीं बोलत होतां, त्या वेळीं जिवाची जीभ करून अणुरेणूच्या बोलांनीं ही मालती प्रत्युत्तरें देत सुटली नाहीं का ? सजीव चित्रा, आज तुमची आमची शेवटची भाषा होणार ! सांग, तुला समजणाऱ्या नेत्रपल्लवीनें आतांच माझें मनोगत तुला सांगून ठेवूं का ? संसाराचा खोटा खेळ मांडण्यासाठीं घटकाभरानें निर्बुज जगाच्या भाषेनें मी तुला या हातानें फेंकून देणार आहें. मालतीच्या संसारसुखाच्या मांडणींत, सुंदर चित्रा, आज आपण अडगळ म्हणुन ठरलां आहां. चित्रस्वरूप परमेश्वरा, मी टाकून देतांना माझ्या मुक्या मनाची करपल्लवी आपल्याला समजेल का ! प्रीतीच्या मंदिरांत चिरंजीवरूपानें राहिलेल्या प्रेमळ तरुणींनों, मालतीनें कृत्रिम रागानें फेंकून दिल्यावर या चित्राला आपल्या हृदयाच्या जाळ्यांत वरच्यावर झेलून धरा. पण नको; या मालतीचें दुर्दैवी हृदयच मनोहरांना समाधानाचें सर्वस्व म्हणून वाटत आहे. तुमच्या दिव्य हृदयांचा स्पर्शसुद्धां या त्यांच्या छायेला आवडणार नाहीं. मीच हें चित्र मनोहरांच्या पायांवर जाऊन पडेल असें टाकीन; म्हणजे त्या चरणांशीं जडवून ठेवलेल्या मालतीच्या पंचप्राणांच्या जाळ्यांत तें सुखानें जाऊन पडेल. या सुखानें मी आपल्या मूळ स्वरूपाला आज दुखविणार आहें; म्हणून या सुखाचा शेवटचा श्वास किती कोमल आणि नाजूक होता याची आपल्या मुखमंडलावर एकदां कल्पांतापर्यंतची साक्ष वठवून ठेवतें. मनोहर चित्रा, आपल्या मुक्या प्रेमाची ही शेवटची तोंडमिळवणी—पण नाहीं—तितका तरी अधिकार आतां मला कुठें आहे ? या देहानें, मनानें, जिवानें, दृष्टीनें, दृष्टीच्या अखेरच्या आशेनें, आशेच्या नुसत्या कल्पनेनें, कल्पनेच्या स्वप्नानें, स्वप्नांतल्या कल्पनेनें सुद्धां ही मालती आज दुसऱ्याची झाली ! धनेश्वरांच्या भावी धर्मपत्नीला मनोहरांच्या चित्राचें चुंबन घेण्याचा काय अधिकार उरला आहे ? पातकी जगाच्या निश्वासांनीं हलणारीं हीं झाडें लागलींच पानांच्या हजारों जिभांनीं माझी निंदा बडबडायला लागतील. मग नुसतें एकदां डोळे भरून पाहून तरी घेऊं का ? पण मेलेल्या प्रेमाला तेंही सुख नाहीं ! निष्ठुर दुर्दैवानें माझ्या डोळ्यांवर पाण्याचा पडदा बांधून सुखाचें चित्र सुद्धां माझ्या दृष्टीआड केलेलें आहे. निर्दय देवा, हजारों धर्मांकडून हजारों उपचारांनीं आपली पूजा होत आहे; पण प्रेमाच्या

जगांत स्त्रीधर्मानें वागतांना आपल्या हातानें फोडून टाकलेल्या मूर्तीची पूजा बांधायचा एखादा प्रकार आपल्याला माहीत आहे का ? मालतीच्या प्रेम-स्वरूप परमेश्वरा, हृदयाच्या मनोहर देवा, आपल्यावांचून मला बोध कोण देणार ? [ मनोहर प्रवेश करितो ] (स्वगत) मनोहर, दगडाच्या सगळ्या जातींचा आपण अभ्यास केलात, पण आपला मनोभंग करणारा हा स्त्रीहृदय नांवाचा दगड आपल्या दृष्टीस पडणार आहे. प्रेमाच्या परमेश्वरा, आजवर प्रीतीच्या कोमल प्राणपुष्पांनीं आपली चरणसेवाच करीत आलें; आणि आजच कठिण दगडाधोंड्यांनीं मी आपल्या हृदयाचा भेद करणार आहें !

**मनोहर**—मालती, कशाला बोलावलेंस मला ? तुझा निरोप ऐकतांच मी निघून आलों.

**मालती**—तुम्हांला कायमचा निरोप देण्याकरितां.

**मनोहर**—तूं काय बोलतेस हें मला समजत नाहीं.

**मालती**—माझें मलाच जिथें नीटसें समजत नाहीं तिथें तुमचा तरी काय अपराध ? मनोहर, मनुष्याला हृदय असतें अशी तुमची कल्पना आहे का ?

**मनोहर**—मालती, आपणां दोघांना तरी या प्रश्नाचें उत्तर खात्रीनें माहीत आहे.

**मालती**—योग्य कारण मिळालें तर माणसाचें मन बदलतें का ? बदल-लेलें मन दुसऱ्याला स्पष्टपणें सांगितलें तर तो अपराध होतो का ? प्रेमाचा विश्वासघात करणें हें खरोखरीच पातक आहे का ? नुसत्या शब्दांच्या वच-नानें माणूस जन्माचें बांधलें जातें का ? तुमचें प्रेम तुमच्या अंगावर परत फेंकून दिलें तर मला कोणी विचारणार आहे का ? वाटेल त्या वेळीं राक्षसा-प्रमाणें निर्दय व्हायचा मनुष्याला थोडा सुद्धां अधिकार नाहीं का ?

**मनोहर**—कोण विचारतें आहे हें सारें ?

**मालती**—मालती नांवाची एक सुंदर आणि चंचल स्वभावाची स्त्री.

**मनोहर**—मालती, तुला हें बोलायला कोणीं शिकविलें ?

**मालती**—स्त्रीहृदयानें.

**मनोहर**—मालती, मी एकदम दिङ्मूढ झालों आहें. माझ्या बधिर बुद्धीला समजून येईल अशा शब्दांनीं तुझें म्हणणें नीट सांग.

**मालती**--[ पत्र देऊन ] हें घ्या, वाचून पहा.

[ मनोहर पत्र वाचतो ]

**मालती**--( स्वगत ) स्पष्ट शब्दांनीं हृदयें जोडण्याचा भाव सांगतां येईना म्हणून शकुंतलेनें प्रणयपत्रिका लिहिली, आणि स्पष्ट शब्दांनीं हृदयें तोडण्याचा भाव व्यक्त करितां येईना म्हणून मालतीनें ही प्रणयपत्रिका लिहिली.

**मनोहर**--मालती, मालती, काय लिहिलें आहेस तूं ?

**मालती**--जें काय सांगायचें होतें पण सांगतां येईना, तें ! शरीराप्रमाणेंच मनानें दूर झालेल्या व्यक्तीलाही आपलें हृदय पत्रद्वाराच कळवावें लागतें.

**मनोहर**--मालती, मी दरिद्री म्हणून तूं माझा त्याग करणार, आणि धनेश्वरांच्या--काकांच्या श्रीमंतीसाठीं तूं त्यांच्याशीं लग्न करणार ?

**मालती**--यांपैकीं पहिली गोष्ट मी करून चुकलें आहें. आणखी दुसरी लवकरच करणार आहें. [ स्वगत ] बोलण्यानें बोलणें वाढवून दोघांनीं दुःखी होण्यापेक्षां यांच्याशीं नाइलाजानें इतकें कठोर बोललें पाहिजे कीं, त्यांना एकदम माझा तिटकाराच येईल.

**मनोहर**--असें करण्याचें कारण काय ?

**मालती**--या संसारांत वैभव हेंच एक सुखाचें साधन आहे; आणि मला पाहिजे तितकें वैभव आज तुमच्याजवळ नाहीं किंवा उद्यांही तुम्हांला मिळण्याचा संभव नाहीं !

**मनोहर**--प्रथम तुझे विचार असे नव्हते. इतक्या थोड्या अवकाशांत इतका फरक कसा झाला ?

**मालती**--विचार बदलण्याला कालावधीची आवश्यकता मुळींच नसत. ज्या जगांत क्षणमात्राच्या धरणीकंपानें पर्वतांच्या जागीं सरोवरें निर्माण होतात, त्यांत एकाद्या व्यक्तीच्या विचारांत क्रांति व्हायला फार वेळ लागला नाहीं, ह्यांत नवल तें कोणतें ?

**मनोहर**--मालती, तूं मला वचन दिलें होतेंस !

**मालती**--हो, आणि तें मी आज मोडणार आहें.

**मनोहर**--मालती, मालती, ही निष्ठुरता तुझ्या अंगीं कोठून आली ? त्या वचनाच्या आनंदाच्या भरांत काल रात्रीं त्यांतल्या एकेका अक्षराची मी आकाशांतल्या चांदण्यांशीं तुलना करीत बसलों होतों; तेव्हांची ती मनःस्थिति

व आतांची मनःस्थिति यांच्यामध्यें जमीनअस्मानाचें अंतर पडावें ना ? त्या तारका आज पुन्हां तितक्याच तेजानें उजळ माथ्यानें मिरवतील, आणि त्या वचनांतल्या अक्षरांना मात्र तूं निर्दयपणानें पायदळीं तुडवून मातीला मिळवीत आहेस ! मालती, कठोर, निर्दय, मालती, या अघटित प्रकाराला म्हणायचें तरी काय ?

**मालती**—या अघटित स्थित्यंतराच्या समूहालाच संसार असें म्हणतात. रात्रींच्या प्रशांत वेळीं मनुष्य आकाशांतल्या तारा एकमेकींना जोडून आशावादीपणानें सुखाचीं सतेज स्वप्नचित्रें जुळवीत बसतो, आणि सकाळीं दिवस उगवल्यामुळें तीं स्वप्नें मावळतांच पायांखालचे खडे तुडवीत रखडत फिरतो.

**मनोहर**—मालती, त्या वचनाबद्दल माझा कठोर तर्क शेवटीं खरा ठरला !

**मालती**—त्याला मी तरी काय करूं ? प्रेम-भरांत दिलेलीं वचनें प्रेमाभावीं दुःखवृद्धीला मात्र कारणीभूत होतात. दिवसाच्या उजेडांत रस्त्यावरच्या खुणा पटवून देणारे दगड रात्रीच्या अंधारांत ठेचाळण्याचें दुःख मात्र देतात. तशींच ही प्रेमाचीं वचनें दुःखकालीं आठवणीला कठिण काय तीं होऊन बसतात.

**मनोहर**—मालती, मालती, अशी निष्ठुर होऊन माझी जन्माची निराशा करूं नकोस. आपल्या साऱ्या सुखमय आयुष्याचें नीट स्मरण कर.

**मालती**—त्या गत आयुष्याचें विस्मरण पाडायचें ही एकच गोष्ट भावि आयुष्यभर मला स्मरणांत ठेवावयाची आहे. मनोहर, तुम्ही मला वेळोवेळीं लिहिलेलीं पत्रें उद्यां तुमच्याकडे पाठवून देईन.

**मनोहर**—प्रेमाचा नाश झाल्यामुळें अनुभवाचा आपलेपणा नाहींसा होतांच प्रणयपत्रांना गोड शब्दांनीं भरलेल्या कादंबरीच्या छापील पत्रांची सुद्धां किंमत उरत नाहीं.

**मालती**—आणि मनोहर, ही तुमची तसबीर ! ही आठवणीसाठीं तुम्हीं मला नजर केली होती; पण आतां माझ्या दृष्टीनें हिच्यावर नजर टाकणें म्हणजे निव्वळ पाप आहे. ही घ्या परत. [ चित्र टाकून देते; मनोहर चित्र उचलतो. ]

**मनोहर**—तुझ्या चरणीं अर्पण केलेलें हें चित्र शेवटीं माझ्याच पायांवर पडलें ना ? पण जिथें मूळ स्वरूपाचीच पायमल्ली झाली तिथें बिचाऱ्या

चित्राची काय कथा ! मालती, मनुष्यांना परमेश्वरानें अशीं चंचल हृदयें देण्यापेक्षां या चित्राप्रमाणें त्रिकालाची बाह्य एकरूपताच देऊन ठेविली असती तर किती चांगलें झालें असतें ! हें चित्र त्या वेळीं जसें होतें तसेंच आजही आहे ! त्या अशा पूर्ण प्रेमाचें हें चित्र—

**मालती**—मनोहर, तें आशापूर्ण प्रेम म्हणजे एक वेड होतें.

**मनोहर**—वेड होतें ? मालती काय म्हणतेस ? तें सारें वेड होतें ?

**मालती**—वेड नाहीं तर काय ? तुमच्या दारिद्र्याची–तुमच्या परिस्थितीची नीटशी कल्पना बांधल्यावांचून तुम्हीं मनाचे मनोरे बांधून वाटेल त्या प्रेम-मूर्तीची त्यांत स्थापना करीत बसलां हें वेडच नाहीं का ? माझ्या स्त्री–गुणांची यथार्थ कल्पना झाल्यावर मीं वैभवशाली संसाराची इच्छा कां करूं नये ? जा, मनोहर, माझ्या प्रेमाचें हें भलतेंच वेड मनांतून काढून टाका.

**मनोहर**—[खरें आहे ! मालती, माझें प्रेम म्हणजे एक वेडच होतें. मालती, आपल्या भाग्यशाली संसाराच्या सुखोपभोगांत मग्न होऊन एखाद्या उंच इमारतीच्या गच्चीवर बसून जगाची गम्मत पहातांना हा दरिद्री मनोहर रस्त्यावरून रखडतांना तुझ्या दृष्टीस पडला, म्हणजे आपल्या भोंवतालच्या श्रीमंत मैत्रिणींना हंसविण्यासाठीं केवळ करमणूक म्हणून मनोहराच्या दरिद्री वेडाची कहाणी सांग. हंसतां हंसतां शेवटीं तुझ्या डोळ्यांत आनंदाश्रु आले म्हणजे तुला क्षणभर थांबावें लागेल. त्या एका क्षणांत चटकन् तुला आपल्या गत–जीविताची दुःखमय स्मृति होऊन आनंदाश्रूंनीं डबडबलेल्या तुझ्या पापण्या किंचित् करुणाश्रूंनीं भिजून निघतील. तेवढ्यांत इतकें सांगायलामात्र विसरूं नकोस कीं, मनोहराचें वेड दरिद्री होतें, हंसण्यासारखें होतें, धिक्कारण्यासारखें होतें; पण शेवटीं सांग कीं, मनोहराचें हें वेड खरें होतें. मालती, संपली माझी वेडी बडबड ! मला आणखी कांहीं सांगायचें आहे ?]

**मालती**—आतां सांगायचें कांहीं उरलें नाहीं एवढेंच आतां सांगायचें उरलें आहे !

**मनोहर**—मग कुठं जायचें हें माहीत नाहीं, पण इथून तरी जातों मी आतां. [जाऊं लागतो]

**मालती**—थांबा मनोहर; शेवटीं एक मागणें उरलें आहे. विरहांत प्रेमाची स्मृति कायम ठेवायची असली म्हणजे गोड शब्दांनीं निरोप घ्यावा लागतो, पण प्रेमस्मृतीचा नाश करण्यासाठीं शेवटीं कठोर शब्दांची जरूरी असते. मी तुम्हांला कठोर बोलल्यामुळें तुमच्या मनांत यापुढें माझी आठवण नेहमीं कडवटपणानें होत जाईल. माझ्या हृदयांतली तुमच्याबद्दलची कल्पना कडू करून ठेवण्यासाठीं तुम्हीही जातां जातां माझ्यावर विषारी शब्दांचा वर्षाव करून जा. मनोहर, मनोहर, ( त्याच्या पायांवर मस्तक ठेवून ) मला तुमच्या आशीर्वादाची अपेक्षा नाहीं, पण तुमच्या चरणीं मस्तक ठेवून मी शापाची याचना करीत आहें. मनोहर, मला एक शेवटचा शाप देऊन जा.

**मनोहर**—मालती, आजन्म तुझ्या सुखासाठींच प्रयत्न करण्याची मी प्रतिज्ञा केली आहे. मी तुला शापकठोर शब्द कसा ऐकवूं ? मालती, तुझी विनंति मला मान्य आहे. मालती, क्षमा कर ! तुझ्या प्रेमानें पवित्र झालेला मनोहर तुला शाप द्यायला तयार आहे ! मालती, ऐक माझा शाप ! प्रत्येक सुखाचा प्रसंग यापुढें मला विषासारखा वाटणार आहे. म्हणून माझ्या दैवीं विधात्यानें भावी कालीं जे सुखप्रसंग योजून ठेवले असतील त्या सर्वांचा तुला लाभ होवो ! हे दयाघन परमेश्वरा—

[ राग **भूप**, ताल **झपताला** ]

**विनति अंतिम असे ईशवर तव पदां ॥ धृ० ॥**
**भालिं मम रेखिला । आखिल सुखलेख जो ।**
**अंकित प्रीतिच्या । चरणतलिं करि सदा ॥ १ ॥**
**दु:ख खरतर वितरिं । प्रभुवरा मम शिरीं ।**
**देई इजसी परी । सकल सुखसंपदा ॥ २ ॥** [ जातो ]

**मालती**–[ स्वगत ] एक मनोहर स्वप्न संपलें ! ललाटींचा मनोहर चरणस्पर्श मालतीला दुरावला ! मनोहर, मनोहर, असेच जलदीनें माझ्या हांकेच्या आटोक्याबाहेर जा, म्हणजे–आतां नाहीं ना हांक ऐकूं येणार ? म्हणजे त्रिवार मोठ्यानें हांक मारतें. ( उघड ) मनोहर मनोहर, मनोहर––मनोहर नादब्रह्म वाऱ्यावर विरून गेलें !–झालें, मनोहर दिसेनासे झाले ! सर्वस्वाची मेनाहर-

सृष्टि दृष्टीआड झाली! एक मनोहर स्वप्न सर्वतोपरी संपलें! जीवाला चिमटा बसून जागी झाल्यावर आतां पुढें काय पहायचें? गळयांत मगरमिठी मारण्यासाठीं वृद्ध धनेश्वराच्या रूपानें पुढें आलेल्या क्रूर काळपुरुषाचे पसरलेले बाहु! आणि मागें माझ्या प्रेमळ पित्याचे आशीर्वादासाठीं उभारलेले बाहु! मालती, देवाचें नांव घेऊन संसारांत पहिलें पाऊल टाकायला तयार हो. परमेश्वरानें नेमून दिलेलें कर्तव्य प्राणिमात्राला प्रेमाच्या भरानें पार पाडावें लागतें. संसारांत पडण्यापूर्वी तरुण जीवाला वाटत असतें कीं, प्रेम परमेश्वरस्वरूप आहे, पण शेवटीं प्रत्ययास येत जातें कीं, परमेश्वर प्रेमस्वरूप आहे. संसारांतला हा पहिला आणि सरता धडा या मालतीला सुरवातींतच शिकावा लागला. जन्माला येऊन आशाळभूत मानवी जीवानें संसाराच्या शाळेंत येवढाच पाठ शिकावयाचा असतो कीं—

[ राग **मांड**, ताल **धुमाळी** ]

मोह नसावा । त्याग ठसावा । भावहि हृदयिं
विरावा ॥धृ०॥ आशामय हें । स्वप्नचि आहे ।
हा भाविं अनुभव यावा ॥१॥ जीव निदानीं ।
नयनजलांनीं । ब्रह्मार्पणचि करावा ॥ २ ॥

( जाते )

-----

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

[ स्थळः—**स्मशान,** पात्र—**घनश्याम** खड्डा खणीत आहे. ]

**घनश्याम**–(स्वगत) कल्पनेनें खेळ बसवला, आणि तसा होतही चालला आहे. महेश्वरानें काम मात्र चोख बजाविलें खरें! मला फार धास्ती होती कीं, या फटिंगाच्या हातून एवढें जबाबदारीचें काम कसें उरकेल म्हणून! बस झाला हा खड्डा! या संध्याकाळच्या वेळीं या स्मशानांत अशा अवतारानें वावरतांना मला कोणीं पाहिलें तर छाती हबकून जाईल बघणाराची! वस्तुतः हे कागद या स्मशानांत आणून दडविण्याचें तितकें कारण नव्हतें; पण या कागदांचें रहस्य या महेश्वराला माहीत आहे; तो कदाचित् या बाबतींत दुखावला जाण्याचा संभव आहे; आणि असें झालें म्हणजे न जाणों तो हे कागद हुडकायच्या नादाला लागायचा. आजच कांहीं त्याला माझ्या घरीं मज्जाव करतां येत नाहीं. तेव्हां इथेंच हे कागद पुरून ठेवले म्हणजे भीतीमुळें महेश्वर स्मशानांत यायची भीति बाळगायला नको! त्यांतल्या त्यांत मुलें पुरण्याच्या बाजूच्या विरुद्धची ही स्मशानाची बाजू तर फारच भयाण आहे! या बाजूचीं हीं पडकीं भिंताडें, हे भेसूर वृक्ष, सारें कांहीं पिशाचांनीं पछाडल्यासारखें दिसतें आहे! अश्रूंच्या सिंचनानें पोसलेल्या आणि दुःखनिश्वासांनींच हलणाऱ्या या स्मशानवृक्षांना आनंद म्हणून काय पदार्थ आहे याची जाणीव तरी असेल का? एखाद्या मत्सरी मनुष्याला सुडाच्या त्वेषानें मारलेल्या दुबळ्या देहाच्या राखेवर बसून सैतानी समाधानानें हंसतांनाच काय तो या वृक्षांनीं पाहिलेला असेल! दुःखाचें मात्र यांना कांहींच वाटत नसेल! पहा, किती संथपणानें हे वृक्ष त्या जळत्या चितेकडे पहात आहेत! तेंच आम्हां जित्या जिवांना या चितेकडे पाहातांच काय वाटतें? त्या प्रेतदेहापेक्षां आमच्या मनालाच या चिताग्नीचा जास्त चरका बसत असतो. केवढा का कर्तबगार प्राणी असेना, शेवटीं सरणावर भाजून निघण्याचें मरण कांहीं त्याला टळत

नाहीं. लांकडांच्या शेजेवर गोवऱ्यांच्या गिरद्या रचून, थंडगार पडलेल्या अंगावर आगीची भरजरी शाल पांघरून मलाही कधींतरी या उघड्या रंगमहालांत काळझोंप घ्यावी लागणारच! वा:! काय भलत्या कल्पनांचें काहूर उत्पन्न झालें! हृदयाची क्रिया बंद पडल्यामुळें एका क्षणाची आगाऊ सूचना दिल्यावांचून तडकाफडकीं जगाची भाडोत्री वस्ती सोडून जाणाऱ्या जीवाच्या प्रेतासाठीं रचलेलें सरण ढांसळतांना नीट करीत करीत सुद्धां कांहीं लोक चिरंजीवांच्या संघटित सामर्थ्यानें इमलेइमारती बांधण्याचा बेत करतात, तर लतिकेच्या शृंगारमंदिराचा हा पाया खणीत असतांना मी तितक्याच वेडेपणानें या उघड्या रंगमहालांतल्या अखेर झोंपेचें स्मशानवैराग्य मनांत आणीत आहें! तूर्त या विचारावांचून कांहीं अडलेलें नाहीं. मघांचा तो हिरवा दगड कुठें पडला? ठीक, आतां हा धुंडिराजाचा कबुली जबाब, धनेश्वराचे हे खोटे कागद आणि माझी ही रोजनिशी ठेवावी या डब्यांत! हो, पण हे कागद माझ्या हातीं आहेत याची धनेश्वराला साक्ष पटवून देण्यासाठीं ही एखादी खोटी हुंडी विसारादाखल जवळ ठेवलेली बरी! [एक कागद खिशांत ठेवतो व बाकीचे डब्यांत ठेवतो.] वा:, या एवढ्याशा जस्ती डब्यांत दोन थेरडे; दोन तरुण आणि दोन पोरी इतक्या जणांचीं कमनशिबें कोंबून भरलेलीं आहेत! आतां याची समाधि बांधून मोकळें व्हावें. [खड्डयांत डबा पुरतो.] आतां हा हिरवा दगड अर्धवट पुरून ठेवावा यांत; म्हणजे हजारों दगडांच्या या माळरानांत या जागेची खूण पटायला केव्हांही हरकत नाहीं. बस, झालें हें काम व्यवस्थेशीर. आतां धनेश्वराकडे जाऊन मोकळ्या मनानें लतिकेबद्दल मागणी घालावी. त्याचप्रमाणें लवकरच महेश्वराला त्या घरांतून बाहेर काढला पाहिजे. नाहीं तर बेवकूफपणानें तो भलतेंच करून बसायचा! परमेश्वरानें त्याला डोकें दिलेलें आहे तें उपयोगासाठीं नसून केवळ मनुष्यदेहाची परंपरा संभाळावी म्हणूनच! चला, हिरव्या दगडाची ही ठळक खूण असल्यावर या जागेच्या जास्त खाणाखुणा बारकाईनें पहात बसण्याची कांहीं जरूर नाहीं.

[जातो]

---

# प्रवेश दुसरा

[ स्थळ— **धनेश्वराचें** घर. पात्र—**महेश्वर** आंधळ्याप्रमाणें येतो. ]

**महेश्वर**—( स्वगत ) या पोरींनीं भंडावून सोडलें बुवा ! लहान मुलांच्या उत्सुकतेनें प्रत्येकजण माझ्या हृदयांतलें आपलें प्रेमाचें रोप शाबूत आहे कीं नाहीं हें घटकेघटकेनें येऊन पाहून जात आहे ! झालें, आली काळ्या रंगाची एक उधळपट्टी ! [ इंदु हळूच लपत लपत येते. ]

**इंदु**—( स्वगत ) आतां पाठीमागून हळूच जाऊन यांचे डोळे झांकावेत; म्हणजे यांना खूप आनंद होईल !

**महेश्वर**—( स्वगत ) ही हळूच माझा घांस घेणार आहे कीं काय ! [ तंबोरा एकदम फिरवितो. ]

**इंदु**—हें काय हें ? लागलें असतें ना मला ?

**महेश्वर**—कोण ? इंदु ? मला काय माहीत तूं येथें आहेस म्हणून ? अशी लपत छपत कां आलीस ?

**इंदु**—मी हळूच मागून येऊन तुमचे डोळे झांकणार होतें; म्हणजे तुम्हांला दिसलें नसतें कोण आहे तें. असे गुपचुप डोळे झांकणें हा प्रेमाचा एक प्रकार आहेसें म्हणतात !

[ राग **काफी**, ताल **त्रिताल** ]

**प्रणय अंध करितो। तदनुकृतिकुशल युवति करिं मिटित**
**नयनयुग पटुमति करि निज रमण अंध तो॥ धृ०॥**
**मृदुल करकमल-मृदुस्पर्श कीं। शीघ्र सुचवि निज धानिन वराकी।**
**अपजयहि गाणित। विजय ती मुदित॥ १॥**

**महेश्वर**—पण आंधळ्यांचे डोळे झांकण्यांत कुठें प्रेम उरलें ? जन्मांधाच्या डोळ्यांना चष्मा लावून जसा कांहीं फायदा नाहीं तसें डोळे अजिबात झांकल्यानें नुकसानही होत नाहीं.

**इंदु**—दम खा; बिंदुताई आली. [ बिंदु येते. दोघी एकमेकींकडे बघतात. ]

**महेश्वर**–आली, बरें झालें ! ( स्वगत ) ही दुसरी अवकळा आली ! ज्या स्त्रीजातीच्या नामकरणासाठीं ललना, रमणी यांसारख्या ललित शब्दांची योजना झाली, त्याच सुंदर वर्गावर अवदसा, कंजारीण या शब्दांची आग कशी पाखडण्यांत आली असावी या गोष्टीचा खुलासा या दोघींकडे पाहिलें म्हणजे ताबडतोब होतो ! विधात्यानें आधीं शूर्पणखा, हिडिंबा कुब्जा हीं विद्रूप वळणें गिरवून कसलेल्या हातानें या दोन परीक्षेसाठीं पुरल्या काढल्या असाव्या असें दिसतें ! एकेकीच्या चेहेऱ्याकडे बघतांक्षणींच मुळीं मनुष्य अर्धामेला होऊन जातो ! यांचे आईबाप इतक्या लवकर कां मेले हें सांगणें कांहीं मोठेंसें कठिण नाहीं. आईबाप आणि कुणीतरी दोन तरुण अशा चौघांच्या मुळावर या दोन पोरी जन्मास आल्या असाव्यात ! परमेश्वरा, तीन वर्षांच्या आंतील पोरें हातोहात हातांवेगळीं करण्याची विद्या या काळ्या कारट्यांच्या लहानपणीं तुझ्या हस्तगत झाली नव्हती का ! काय रागानें एकमेकींकडे पहाताहेत पण ! आतां या काळ्याकुट्ट कोकिळांना कर्कश कंठ केव्हां फुटणार ?

**बिंदु**–काय हो कामण्णा, पुन्हां तुम्ही इंदूशीं बोलत बसलांतच ?

**महेश्वर**–( स्वगत ) आली कंबक्तीची वेळ ! ही राक्षसीण बचकभर तोंड उघडून बोलायला लागली म्हणजे खायला उठल्यासारखी वाटते. हा काळा कोळसा पण धुमसतोच आहे ! आतां पायांखालीं वणव्याची आग भडकावी आणखी टाळक्यावर वीज़ कडकडावी अशांतली दशा होणार माझी ! मिराके प्रभु, संभाळा आतां आपल्या गुलामाला !

**इंदु**–काय ग, काय झालें माझ्याशीं न बोलायला ग ? मग काय तुझ्याशीं बोलायचें का ?

**बिंदु**–हो, हो, मला टाकून हिच्यासारख्या कुब्जेशीं बोलत बसायला तुमचे डोळे फुटले का आहेत ?

**इंदु**–इकडे बघा हो–म्हणजे इकडे तोंड करा. ही तुम्हांला हिणवायला लागली बरें !

**महेश्वर**–[ इंदूकडे ] मी काय पहाणार, तूंच पहा आतां. [ बिंदूकडे वळून डोळे उघडून ] आंधळ्याला असें हिणविणें चांगलें का ?

**बिंदु**—झालें काय तुम्हांला आंधळें व्हायला ?

**इंदु**—हीं का कुणाच्या हातची गोष्ट आहे वाटतें ? अहो तुम्ही तिकडे बघूंच नका. आपले माझ्याकडे पहा म्हणजे झालें !

**महेश्वर**—[ इंदूकडे ] तुझ्याकडे तरी काय पाहाणार कपाळ ! माझ्या कपाळीं मुळीं कुणाकडेच पाहाणें नाहीं !

**बिंदु**—झालें, दोन लघळ शब्द बोलल्याबरोबर तुमची नजर बदलली !

**महेश्वर**—(बिंदूकडे डोळे उघडून) माझी नजर कशी बदलणार ? मीं आंधळा आहें हें रागाच्या भरांत विसरलीस वाटतें बिंदू तूं ?

**बिंदु**—[ स्वगत ] खरेंच, भलतेंच बोलून जात होतें मी ! [ उघड ] कामण्णा, मला बोलायचें भानच राहिलें नाहीं ! तुम्ही खरे-खुरे आंधळे नसतां तर हिच्याशीं एक शब्द तरी बोललां असतां का ?

**इंदु**—इतकी मी वाईट आहें वाटतें ? नाहीं हो, कामण्णा ! माझें तोंड किनई कमळासारखें आहे !

**बिंदु**—हो. कृष्णकमळासारखें ! मग माझें तोंड तर चंद्रासारखें आहे !

**इंदु**—पण त्या चंद्राला खग्रास ग्रहण बरीक लागलें आहे तेवढें !

**बिंदु**—हिची मान वांकडी आहे, बरें का हो ?

**इंदु**—अग, मी तुझ्या वांकड्या मानेचें वेडावणें दाखवितें आहें.

**बिंदु**—खरें हो खरें ! मात्र जन्मापासून ही मला अशी वेडावीत सुटली आहे, आणि ही जित्याची खोड मेल्यावांचून मात्र जायची नाहीं आतां.

**इंदु**—कामण्णा, ही कांहींतरी सांगते आहे हो तुम्हांला ! खरें पहाल तर मी अप्सरेसारखी सुंदर आहें !

**महेश्वर**—(स्वगत) मात्र चौदा रत्नांबरोबर अप्सरांचा तांडा क्षीर-समुद्रांतून बाहेर आला, आणि ती गर्दी टाळण्यासाठीं ही काळ्या समुद्रांतून वर आली !

**बिंदु**—अहाहा ! अप्सरेचा अवतार बघा ! अग, तूं जर अप्सरेसारखी असशील, तर मग मला तर रतिसारखें समजावें लागेल !

**महेश्वर**—[ स्वगत ] रतीसारखी कां ? प्रत्यक्ष रतिच आहेस तूं ! मात्र शंकरानें मदनाला जाळलें त्यावेळीं पतिभक्तिच्या भरांत फार जवळ गेल्यामुळें त्या आगीच्या लोळांत तूं नखशिखान्त करपून निघालीस, एवढेंच ! बाकी

शंकरानें त्यावेळीं मदनदहनाची उगीच घाई केली ! आपल्या सैन्यांत या दोघींची भरती झालेली पाहून मदनाच्या अंगाचा खास भडका उडाला असता ! काय तावातावानें शिरा ताणून भांडताहेत एकमेकींशीं ! अशांत एकीचा रागानें दम कोंडून प्राण गेला आणि दुसरी त्या धक्क्यानें हृदयाची क्रिया बंद पडून मेली तर काय बहार होईल ! अहाहा ! मृत्यु हा केवढा आधार आहे जगाला ! मृत्यूनें कधींतरी या पीडा टळणार आहेत, या कल्पनेनें काय समाधान वाटतें मनाला ! पुढली पिढी किती भाग्याची !

**बिंदु**—काहो, तुम्ही कां बोलत नाहीं ? तुम्हीच सांगा पाहूं आमच्यांत कुणाचें रूप चांगलें तें ?

**महेश्वर**—मी काय बोलूं दगड ? जी. आय. पी. आणि बी. बी. यांच्या दुहेरी धुमधडाक्यांत सांपडलेल्या मुंबई शहराप्रमाणें माझ्या मनाची स्थिति झाली आहे ! शिवाय बिंदु, तुला मीं एकदां सांगून टाकलें आहे ना, कीं तुमचीं हीं काळीं कोडीं आपल्याला उलगड नाहींत म्हणून ?

**इंदु**—तें कांहीं का सांगेनात, मी कुठली ऐकायला ! असें यांचें बगोटें धरून फरफटीत ओढीत नेतें इथून यांना ! ही बघ !

**बिंदु**—मी बरी गप्प राहीन ! यांची शेंडी धरून इथल्या इथें डांबून ठेवीन यांना !

**महेश्वर**—अरे ! बापरे ! धांवरे रामराया । किति अंत पहासी । प्राणांत मांडियेला । न ये करुणा कैशी । धांवरे रामराया ॥ बायांनों, माझी अशी दैना करायला मी कांहीं एकीचाही नवरा झालों नाहीं अजून ! हें पहा तिलोत्तमेसाठीं सुंदोपसुंद झगडून मेले त्याप्रमाणें तुम्ही माझ्यासाठीं आधीं द्वंद्वयुद्ध खेळा. तोंपर्यंत कुंवारपणाला न शोभण्याजोगें मी कुणाला कांहीं करूं देणार नाहीं. बिंदु, तुला काय म्हणावें हेंच कळत नाहीं ! मला डोळे नाहींत म्हणून माझ्यावर दया करायची विसरलीस वाटतें ? इंदु, चल पाहूं मला घेऊन इथून !

**इंदु**—चला ! [ त्याचा हात धरून नेऊं लागते. ] काय करावें ! तुम्हांला डोळे असते किनई म्हणजे या बिंदुताईची चांगली गंमत पाहिली असती आपण !

**महेश्वर**—चल. उद्यां चार पोरें झालीं म्हणजे मला दृष्टि मिळण्यासाठीं गुलबकावलीचें फूल आणायला पाठवूं त्यांना ! चल. ( स्वगत ) लतिके-सारखी चटकचांदणी लाभावी म्हणून इथें यावें, आणि या दोन नक्षत्रांनीं असें राशीस बसावें, याला म्हणतात ग्रहयोग ! जय मिराके प्रभु !
[ इंदु व महेश्वर जातात. ]

**बिंदु**—[ स्वगत ] हे इंदूला फसवीत आहेत की मला ? धड कांहींच कळत नाहीं मेलें ! बघावें बघावें, नाहीं तर यांचा नाद द्यावा सोडून, आणि त्या गिरमाप्पांना लग्नाचें विचारावें झालें. ते म्हातारे असले तरी ह्यांच्याइतके दुटप्पी तरी खास नसतील. इथें मेला सारा संशयाचा गोंधळ !

[ जाते ]

---

# प्रवेश तिसरा

[ स्थळ—**धनेश्वराचें** घर. पात्र—**लतिका** ]

**लतिका**—[ स्वगत ] वेडी मालतीताई बिचारी ! मलाच ती वेडी समजते ! एकाद्या माणसाचा बोलका स्वभाव असला म्हणजे त्याच्या बोलण्यांत कधींच का अर्थ नसतो ? मी दिसतें तशी खरोखरीच नुसती बेजबाबदार बडबड करणारीच का आहे ? या वयांत बाबा लग्न करायला तयार झाले; आणि आतां मुद्धां त्यांना तोडून बोलूं नको का ? माझें बोलणें कडू असलें तरी त्याला कारण बाबांची करणीच ना ? बाबांना उणीं उत्तरें बोलतें म्हणून लोक मला नांवें ठेवतील; पण पापांची उपेक्षा किती दिवस करायची ? पातकां-बद्दल मनांत आदर कसा ठेवावयाचा ? बाबांनीं गोरगरिबांना पिळून पैसे मिळविले, खोटयानाटया हुंड्या करून इष्टमित्रांना बुडविलें, आपल्या भागी-दारांची फसवणूक केली, तें पाप निस्तारण्यासाठीं मला मोरेश्वरांच्या गळ्यांत बांधावयाला तयार झाले हें सारें मला कळत का नाहीं ? या साऱ्या वैभवाचा मला कसा वीट आलेला आहे ! तरी मी तोंडाला कुलूप घालून बसतें ! पण आज बाबा मालतीचा गळा कापायला उभे राहिले ! अजून, अजून सुद्धां गप्पच बसूं का ? माझ्या मनाचा कसा कोंडमारा झाला आहे. त्याची मालती-ताईला कल्पना तरी आहे का ?

[ राग **मांडबेहाग**, ताल **केरवा** ]

**अंतरीं होत महाक्षोभ हलवितो या देहा ॥ धृ० ॥**
**या भावनोर्मि बळें व्योमिं चढावितो वेगें हा ॥ हृदयाचा**
**चूर्ण करी या धरिं ना संदेह ॥१॥**

जित्या जीवांच्या राखेंत वाढलेल्या स्मशानवृक्षाची पालवी धुरकटलेली दिसली तर त्यांत तिचा काय दोष ? तोच माझ्या कडू वाणीचा प्रकार. [प्रभाकर कानडी वेषानें येतो. ] ( स्वगत ) हा कडू कानडीचा काढा आला !

**प्रभाकर**—भवति, पोथि, आणलों. योगवासिष्ठ ! भवति ऐकतो का ? वकत है !

**लतिका**—माझ्याभोंवतीं ही ग्रहदशा कुठून उद्भवली ! हें पहा, तुमच्या वसिष्ठ गोत्राशीं माझें कांहीं पटावयाचें नाहीं.

**प्रभाकर**—फिर पोथी तशी राहतो ! काय करावा ?

**लतिका**—त्या कोपऱ्यांत बसा, आणि त्या पोथीचीं पानें मोजून काढा. सगळीं मोजून झालीं म्हणजे पुनः पहिल्यापासून मोजायला लागा; आणि इतक्याउप्पर जिवंत राहिलांत तर जीव जाईपर्यंत मोजीत बसा !

**प्रभाकर**—जसा मर्जी असतो. ( कोपऱ्यांत बसतो. मालती येते. )

**लतिका**—ये, मालतीताई. पण या घरांत तुला ' ये ' म्हणून म्हणायला तोंडच घेत नाहीं आतां. आमचे बाबा पडले पुण्यश्लोक !

**मालती**—हां ताई, लागलीस तूं बोलायला ! मला नाहीं खपायचें असलें बोलणें ! हजार वेळां आर्जवून सांगितलें कीं, वडिलांचा असा उपमर्द करणें बरें नाहीं म्हणून ! हें काय हें ?

**लतिका**—अग, वडील झाले म्हणून काय झालें ? या वयांत तुझ्याशीं लग्न करून स्वतःची बेअब्रू आणि तुझ्या जन्माचा सत्यानाश करायला बाबा तयार झाले तरी मी कांहीं सुद्धां बोलूं नको ? काय करूं, या वेळीं प्रभाकर इथें नाहींत ! मालती, मला आतां प्रभाकरांची फार वेळ आठवण होते ! प्रभाकर यायचें नाहींत का ? कुठून त्यांच्याशीं भांडलें असें झालें आहे मला !

**मालती**—अग, आपलें आवडतें माणूस जवळ नसलें म्हणजे असेंच होतें. प्रेमाविषयीं असें म्हटलें आहे कीं—

[ राग पिलू, ताल धुमाळी ]

रमते सहवासें प्रीति विलासीं । परि विरहें येत
भरासी ॥ धृ० ॥ चमके रवितेजें हीरशलाका ।
घन तिमिरीं प्रीति परि अधिका । तळपे
किरणीं त्या कांचाहि तैशी । तामीं विसरे परि
तेजासी । मिथ्या प्रीतीच्या चंचल जाति ।
विस्मरणें पावति विरति ॥ १ ॥

**लतिका**–मला काय समजून तूं हें म्हणून दाखविलेंस? प्रभाकरांबद्दल माझ्या मनांत कितीहि प्रेम असलें तरी या प्रसंगीं तेवढ्यामुळें झुरत बसण्याइतकी राक्षसीण नाहीं मी! बाबांशीं मनांत असेल नसेल तितकें कठोर बोलून टाकतांना प्रभाकरांनीं मला किती धीर दिला असता! पण या वेळीं प्रभाकरांच्या ऐवजीं हें कानडी सोंग बघायचें कपाळीं येऊन बसलें आहे! का हो गिरसाप्पा, अन्यायानें एखाद्या पोरीशीं म्हातारपणीं लग्न लावायला कुणी तयार झालें तर त्याची कानउघाडणी करायला नको का?

**प्रभाकर**—खुशाल बोलना! डरना नहीं! लग्न तर प्रेम म्हटलें. तो प्रेम फार नाजूक!

**लतिका**—या पिकल्या पानांत बराच हिरवटपणा आहे!

**मालती**–पण गिरसाप्पा, वडिलांना बोलण्यापेक्षां जरा दम खाल्लेला बरा नाहीं का?

**प्रभाकर**–दम खाना, लेकिन थोडा खाना.

**लतिका**–कशाला कपाळाला दम खाना, लेकिन थोडा खाना! सोंग नाहीं तर! बाबांनीं बंदी केली आहे, नाहीं तर अशी प्रभाकरांना घेऊन आलें असतें, आणि दोघांनीं मिळून बाबांना इतकें बोलून घेतलें असतें कीं बोलण्याची सोय नाहीं! मनाला तळमळ लागली आहे सारखी! या वेळीं प्रभाकर तेवढे इथें पाहिजे होते!

**प्रभाकर**–(एकदम दाढी व पागोटें काढून) शाबास! लतिके–

**लतिका**–अगबाई, हें काय!

**प्रभाकर**–लतिके, हा पहा प्रभाकर तुझ्यापुढें हजर आहे.

**लतिका**—आणि तुम्हीं हें सोंग घेतलें होतें?

**प्रभाकर**—हो, तुझ्या मनाची कसोटी पाहण्याकरितां. पण प्रेमाच्या या परीक्षेंत तुझी मनोवृत्ति अढळ पाहून मला संतोष झाला.

**लतिका**—माझी परीक्षा पाहण्याकरितां हें सोंग घेतलेंत? मला हिणवायचा बेत होता नाहीं का तुमचा? काहो, माझी परीक्षा पाहण्याचा तुम्हांला कुणीं अधिकार दिला हो? अशीं सोंगें घेऊन दुसऱ्याच्या घरांत शिरतां काय? दम खा, आतां सरकारी शिपाई बोलावून आणवितें आणि खोड मोडतें तुमची चांगली! मालतीताई! बाई, तें दार तरी लावून घे तेवढें! हें सोंग कुणीं बघितलें तर तिकडूनही पंचाईत व्हायची!

**मालती**—दार लावून घेतल्यावर शिपाई कसे येणार आंत?

**प्रभाकर**—अग, ती काय बोलाविते शिपायांना! तिचा वकूब समजला मघांच्या बोलण्यावरून! मनाला तळमळ लागली आहे सारखी; आणि ही शिपाई बोलविणार?

**लतिका**—(स्वगत) सांपडलें खरी बोलण्यांत यांना! (उघड) शिपाई बोलवायला मला चोरी आहे वाटतें तुमची? माझें बोलणें खोटें होतें हो सारें! (स्वगत) आतां खोटेंच बोलतें चांगलें. (उघड) तुमचें सोंग मीं पहिल्या-नेंच मुळीं ओळखलें होतें. तुम्हांला फसविण्यासाठीं मीं मघांचे उद्गार काढिले होते बरें! मला असें तुमच्यासारखें वेड नाहीं लागलें! मला कुणाची पर्वा नाहीं. अशी बहुरूप्यासारखी प्रेमाची भीक मागणारी मी नव्हे.

**प्रभाकर**—मोठी कुबेरकन्याच कीं नाहीं तूं! मला तरी काय पर्वा आहे तुझी?

**लतिका**—तें दिसतेंच आहे! माझ्यासाठीं मतांत केंसभर सुद्धां फेर करा-यला तयार नव्हतां, ते अखेर या दाढीमिशांचें जंगल बांधून आलांत इथें! आतां मुकाट्यानें हा बाळसंतोष घेऊन जातां कीं बाबांना बोलावूं?

**प्रभाकर**—हा चाललों मी! पुन्हां तोंड नाहीं पहायचा तुझें.

**लतिका**—हं, निघालांत? आंतां काय जीव देणार का रागाच्या भरांत जाऊन?

**प्रभाकर**—ज्याच्या अंगांत जीव नसेल त्यानें जीव द्यावा! तशी निर्वाणीची वेळ आली तर श्रीकृष्णानें सोळा हजार एकशें आठ बायका खाड्दिशीं कृष्णार्पण करून टाकल्या तसा चालता होईन.

**लतिका**—पहा बरें ? मग म्हणत याल, कीं लतिके, तुझ्यामुळें हें जग एक सुंदर काव्य वाटतें !

**प्रभाकर**—जग हें सुंदर काव्य असलें तरी शेवटीं पटलें कीं तें एक निर्यमक काव्य आहे. त्या जगाची आणि या घराची मला मुळींच जरूर नाहीं. लतिके, हा निघालों मी. या उप्पर या घरांत एक क्षणभर सुद्धां रहाण्याची माझी इच्छा नाहीं. लतिके, एक विशिष्ट कार्य घडवून आणण्यासाठीं—किंवा एक विशिष्ट अकार्य घडत असलेलें टाळण्यासाठीं या वेषानें आणखी कांहीं दिवस मात्र या घरांत राहण्याची माझी इच्छा आहे.

**लतिका**—रहा नाहीं तर नका राहूं !

**प्रभाकर**—तोंपर्यंत माझ्या वेषांतराबद्दल आपल्या वडिलांच्या कानांवर वर्दी नेऊन पोंचवूं नका.

**लतिका**-मला कुणीं सांगितलें आहे एवढें ? [ बाहेर धनेश्वर 'लतिके अग लतिके' ] अगबाई, बाबा आले ! झाला का पुरता घात आतां ? थांबा, या दरवाज्यानें चला बाहेर; नाहीं तर भलतेंच होईल आतां ! ( दुसरा दरवाजा उघडते. ) हं निघा. [ प्रभाकर जातो व लतिका दरवाजा बंद करून घेते.] (स्वगत) प्रभाकर गेले आणि बाबा आले, त्याबरोबर ओंठावर दाबलेलें हसूं आपोआप मावळलें आणि डोळ्यांत आंसवें येऊन उभीं राहिलीं. चमत्कारिक जगता, काय म्हणावें तुला ! इकडे एकीसाठीं तरुणानें वृद्धाचें सोंग घ्यावें, तर दुसरीसाठीं वृद्धानें तरुणासारखें वागायला जावें. [ दार उघडते. धनेश्वर येतो. ]

**धनेश्वर**—( स्वगत ) मालती स्वतांच आपण लग्नाला तयार असल्याचें सांगायला आली आहे म्हणून घनश्यामानें सांगितलें, तें खरेंच कीं काय ?

**लतिका**—काय बघतां, बाबा ?

**धनेश्वर**—मालती आली आहे ना ? हो, बरें झालें ! मालती, मला तुझ्याशीं थोडें बोलायचें आहे.

**लतिका**—थांबा. बाबा, तुमचा चष्मा आणून देतें; म्हणजे पन्नाशीपलीकडच्या या वयांत निदान चाळिशीच्या दृष्टीनें पाहिल्यामुळें तुम्हांला स्पष्ट ओळखूं तरी येईल कीं, तुम्हीं पहायला आणलेली मुलगी कोणती आणखी तुमची स्वतःची मुलगी कोणती म्हणून ?

**मालती**—ताई, लागलीस पुन्हां वेडेंवाकडें बोलायला ?

**धनेश्वर**—म्हणजे पहा आतां ! माझ्या बोलण्याचा मालतीला राग येत नाहीं, आणि ही उगीचच थैमान करीत सुटली आहे ! ( स्वगत ) रागानें लतिकेचें देहभान नाहींसें झाल्यासारखें झालें आहे. आतां मला हिच्या बोलण्याची इतकी भीति कां बरें वाटूं लागली आहे ? गुडघ्याएवढ्या मालतीशीं लग्न करायला तयार झालों, या पातकामुळें तर मन कचरत नसेल ?

**लतिका**—काय बोलूं बाबा आतां तुम्हांला ? मालतीला राग न यायला ती का वेडी आहे का एखादें जनावर आहे ?

**धनेश्वर**—अग, मालतीला कां राग यावा ? लग्नासंबंधाच्या गोष्टींनीं मुलींना आनंदच होतो !

**लतिका**—हो, पण हें कसलें लग्न ? जिथें लग्नाच्या घटकेबरोबरच जन्माच्या सुखाचीही घटका भरण्याची वेळ, तें कसलें लग्न ? अशा लग्नाच्या गोष्टींनीं मालतीला आनंद होणार ? गुदगुल्यांनीं एरवीं हंसूं येतें; पण बाबा, अस्वलीच्या गुदगुल्यांनीं श्वास कोंडून प्राण जातो !

**धनेश्वर**—या पोरीला काय म्हणावें हेंच कळेना ! अग वेडे, कसें झालें तरी लग्न तें लग्नच ! लग्न हा आयुष्यांतला अत्यानंदाचा सण असतो.

**लतिका**—सण असतो खरा; पण हा सुतकांतला सण आहे, बाबा ! यानें रोजच्यापेक्षां रडायलाच जास्त यायचें !

**धनेश्वर**—मग मला कांहीं तारतम्यज्ञानच नाहीं वाटतें ? माथ्यावर काळ्या केंसांचे पांढरे झाले ते कांहीं आल्यावांचून का ?

**लतिका**—काय म्हणावें ह्या मनुष्यस्वभावाला ! वयोमानामुळें एखादा दुसरा पांढरा केंस डोकावूं लागला म्हणजे दूषण समजून त्यावर कलप करायचा आणि अति झाले म्हणजे त्यांच्यावर शहाणपणाची भिस्त टाकून भूषण म्हणायला लागायचें !

**धनेश्वर**—लतिके, बस कर तुझें बोलणें ! तुला कांहीं कांहीं कळत नाहीं !

**लतिका**—बाबा, मला काय काय कळत नाहीं सांगा पाहूं ? तुम्हांला पंचावन्नावें वर्ष लागलें हें मला कळत नाहीं ? मालती तुमच्या मुलीच्या सारखी हें मला कळत नाहीं ? या लग्नानें तिच्या जन्माची माती होईल हें मला कळत नाहीं ? चारचौघांत तुमची बेअब्रू होईल हें मला कळत नाहीं ? सांगा, बाबा, सांगा एकदां, मला काय कळत नाहीं तें तरी सांगा ! बाबा,

बाबा, लोकांत तोंड तरी कसें दाखवायचें आतां ? बाबा, तुम्हांला एकाद्या गरीब अर्भकाचा गळाच कापायचा असेल तर सरळ एक सुरा घ्या, आणि आपल्या पोरीच्या मानेवरून फिरवा ! परक्याच्या बाळाचा असा गळा कां कापतां ? बाबा, माझें मस्तक भ्रमण करायला लागलें ! बाबा, आणखी बोलूं का तुम्हांला !

**मालती**—लतिकाताई, काय हा आततायीपणा असा ! जीव तोडून तुम्हांला सांगितलें-निर्भीडपणानें आणखी किती सांगूं ? लतिकाताई, मला हेंच स्थळ हवें आहे. या लग्नानेंच माझ्या मनाला आनंद होणार आहे. आतां जास्त बोलशील तर माझ्या गळ्याची शपथ आहे तुला ?

**लतिका**—काय वाटायचें आहे या तुझ्या शपथेचें ? जिथें तुझी तूंच गळ्याला फांस लावायला तयार आहेस तिथें दुसऱ्यांनीं तुझ्या गळ्याकडे कां बघावें ?

**मालती**—लतिकाताई, तुझ्याशीं कसें बोलायचें बरें आतां ? [ धनेश्वरास ] हें पहा, बाबांना आपला निरोप आला तो त्यांनीं मला सांगितला; आपली योजना आम्हांला-मला सुद्धां आवडली !

**लतिका**—चांडाळणी, कां असा छळवाद मांडला आहेस? आपल्या हातीं आपल्या संसाराला आग लावायला कां तयार होतेस ? आमच्या घरांत जीव देऊन मरण्याचा तुझा नवसच असेल तर आमच्या बागेतल्या विहिरी तळ्यांत पडून मर, बाबांच्या गळ्यांत पडून मरूं नकोस ! त्या तळ्याच्या कांठीं बसून, माझी मालती इथें मेली म्हणून रात्रंदिवस आंसवें ढाळीत बसण्याचें तरी समाधान मिळेल ! पण बाबांच्या तोंडाकडे पहाण्याचा मला कसा धीर होईल ? ताई, ताई, इतक्या मोठ्या मनानें आजवर या तुझ्या वेड्या लतिकेचे लाड केलेस; मग तुझ्यासाठीं जन्मभर रडायची तरी जोड मला देणार नाहींस का ग ? तुझ्यामागें कुणाच्या पदराखालीं मला असें तोंड लपवायला जागा मिळेल ? ताई, ताई, तशी आई होऊं नकोस, अशी आई हो ! ( तिच्या पदराआड तोंड झांकून रडते. )

**मालती**—लतिकाताई, काय बरें वेड्यासारखें करावें असें ! वर पहा पाहूं ! ( तिचे डोळे पुसते )

**लतिका**—माझीं आंसवें पुसायला लागतेस! मी कुणाची मुलगी आहें आहेना ठाऊक तुला ! तुझ्यासारख्या गरीब गाईचा गळा कापणाऱ्या--ताई, माझें तोंड पाहिलेंस तरी सुद्धां तुला पाप लागेल ! माझ्यावर कसली दया करतेस !

[ राग सारंग, ताल धुमाळी ]

**शांत मनिं या। न धरिं कधिं दया। न धरिं**
**कधिं माया॥ पदिं तुझ्या विनति ही। न**
**सखि मुख हें कधिं पाहिं बाई॥ धृ०॥**
**ही कृतांताची। क्रिया ज्याची। सुता त्याची।**
**म्हणुनि याचीं। न सखि मुख हें कधिं**
**पाहिं बाई॥ १॥**

**धनेश्वर**—लतिके, बेटा, ये इकडे ! किती जिवाचा संताप करून घेशील ! [ लतिका एकदम धनेश्वराच्या गळ्यांला मिठी मारते. ]

**लतिका**—बाबा, लतिकेची तुम्हांला दया येते, आणि आपल्या मालतीताईची कांहो दया येत नाहीं तुम्हांला ? पहा, बाबा, बापडी कशी गरिबासारखी दिसते ती ! लहानपणीं घेतलेला माझ्या ताटलींतला दूधभाताचा घांस अजून तिच्या गळ्याखालीं उतरला नसेल तोंच तुम्ही त्यावर सुरा फिरवायला उभे राहिलां! असे निष्ठुर कसे हो झालां? बाबा, तुमच्या मनाला कशानें करुणा येईल हो ? हातभर जीभ काढून तोंडास येईल तें बोलत सुटूं, कीं जीभ हासडून तुमच्यासमोर प्राण देऊं ? तुमच्या पायांवर संतापानें डोकें फोडून तुमच्या चरणांना रक्ताचा अभिषेक करूं ? ( त्याचे पाय धरून ) बाबा, दया करा आणि हा राक्षसी विचार सोडून द्या. या दीन गरीब मालतीला सुखानें तिच्या घरीं नेऊन सोडा; तोपर्यंत तुमचे पाय मी सोडणार नाहीं ! बाबा, मला मोरेश्वरांना द्या, मला विहिरींत नेऊन लोटा; पण माझ्या मालतीताईला नका हो छळूं ! तुमची ही निर्दय करणी पाहून देवाघरीं माझ्या आईला काय वाटत असेल हो ? बाबा, बाबा, तुम्हांला कांहींच कशी दया नाहीं हो ? आईग, या तुझ्या पोरक्या पोरीवर मायेचें पांघरूण घालण्यासाठीं तुला कधीं वर बघून हांक मारली नाहीं; पण आज बाबांच्या अब्रूवर पांघरूण घालण्यासाठीं मात्र

तुला टाहो फोडून हांक मारतें ! आई, कांग इतक्या लवकर आम्हांला टाकून गेलीस ? बाबा, मी काय करूं हो ? ( त्याच्या पायांवर डोकें ठेवून रडते. )

**धनेश्वर**—ऊठ, लतिके, ऊठ ! बाळे रडूं नकोस !

**लतिका**—रडूं नको तर काय करूं, बाबा ? उघड्या डोळ्यांनीं हें मारें पाहूं तरी कसें ?

**धनेश्वर**—बाळ, ऊठ ! मी लग्नाचा विचार सोडून दिला.

**लतिका**—खरें, बाबा ?

**धनेश्वर**—हो, बेटा ! हा पहा तुझ्या गळ्याची शपथ घेऊन सांगतों. यापुढें मालतीशींच नाहीं पण मला मुळींच लग्न करायचें नाहीं ! तुझ्या गळ्याची शपथ घेऊन सांगतों !

**लतिका**—बाबा, बाबा, तुम्ही किती, किती चांगले आहां ! ताई, पाहि-लेस ना माझे बाबा, किती विचारी आहेत ते ? तरी मी माझ्या मनाला सांग-तच होतें ! बाबा अशी जाऊन ही आनंदाची बातमी काकांना सांगून येऊं का ?

**धनेश्वर**—जा बाळ, मोठ्या आनंदानें जा ! मालती, सुखानें आपल्या घरीं जा !

**लतिका**—आणखी बाबा, ओव्हरकोट घालून जाऊं ना ? नाहीं तर म्हणाल लतिका थिल्लरच आहे म्हणून !

**धनेश्वर**—जा बेटा ! नाहीं म्हणायचा ! [ लतिका जाते ]

**मालती**—आपले उपकार मी—

**धनेश्वर**—माझे कसले उपकार ! मालती, माझ्या सद्‌गुणी मुलीनें मला आज सद्‌बुद्धि शिकविली ! मालती, माझी लतिका शिकलेली आहे म्हणूनच इतकी शहाणी आहे, नाहीं ?

**लतिका**—[ येऊन ] ताई, चल लौकर. का गाडी जोडायला सांगूं बाबा ? काकांना हें केव्हां सांगेन असें झालें आहे मला !

**धनेश्वर**—हो, आणखी एका माणसाला सांग कीं, मीं लतिका मोरे-श्वराला देण्याचा विचार रहित केला आहे ! त्या माणसाला आनंद वाटेल नाहीं, बाळ, हें ऐकून ? बरें, लौकर जा; नाहीं तर तें माणूस फिरायला जाईल.

**लतिका**--बाबा, थट्टा नाहीं करायची अशी! हें काय? डियर फादर, यू आर व्हेरि काइंड. यू आर व्हेरि गुड. बट यू आर व्हेरि, व्हेरि, व्हेरि बॅड. चल ताई.

[ राग **सोरट**, ताल **केरवा** ]

**पद सुखीं स्थलिं या न जरा ठरे ॥ मन उताविळ हो**
**स्थिरता नुरे ॥धृ०॥ मनुजीं कोपुनि गाति 'धरि पदिं' कीं।**
**मंदाचे शोकीं । परि सुखीं करि दूर तया त्वरें ॥ १ ॥**

( मालती व लतिका जातात. )

**धनेश्वर**—( स्वगत ) माझी लतिका म्हणजे एक निर्दोष, आनंदी, गोजिरवाणें फुलपांखरूं आहे! हंसतां हंसतां रडते आणि लागलींच रडतां रडतां हंसते! लतिके, सद्‌गुणी मुली, जन्मजन्मांतरीं अशीं काय संचितें करून ठेविलीं होतीस कीं तेवढ्यासाठीं या पातकी धनेश्वराच्या पोटीं आलीस? नाहीं, लतिका मोरेश्वराला द्यायची नाहीं हा मनाचा निर्धार झाला! तसेंच मालतीशीं लग्न मला कर्तव्य नाहीं म्हणून घनश्यामाला सांगून टाकतों. लतिके, तुझ्या सदुपदेशानें, मी एवढा पातकी; पण आज सद्‌गुणी झालों!

[ जातो. पडदा पडतो. ]

———

# प्रवेश चौथा

( स्थळ–**धनेश्वराचें घर.** पात्र–**बिंदु.** )

**बिंदु**–( स्वगत ) या कामण्णाचा मुळींच भरंवसा देववत नाहीं! आतां एक बोलणें अन् घटकेनें एक बोलणें! मिळून काय, कशांत काय आणि फाटक्यांत पाय तशांतली गत! या स्थळाचा नादच सोडून द्यावा झालें! ते गिरसाप्पाशास्त्री कुठें भेटतच नाहींत. त्यांना गळ घालावा हेंच बरें आपलें! अग बाई, आलेच कीं अगदीं नांव काढल्याबरोबर! ( प्रभाकर येतो. ) आतां बोलूं कसें यांच्याशीं?

**प्रभाकर**–( स्वगत ) धनेश्वराचा नवा निश्चय मालतीनें सांगतांच मला किती मोकळ्यासारखें वाटायला लागलें ! आतां लतिकेची खोड मोडण्याचा प्रयत्न करून बघायला कांहीं हरकत नाहीं. स्त्रियांच्या मनोवृत्तीची परीक्षा पहाण्याचा मत्सरजागृती इतका अचूक उपाय दुसरा कोणताही नाहीं. या बिंदूवर प्रेम करण्याचा बहाणा केला म्हणजे लतिकेच्या मनाचा ठाव तेव्हांच लागण्याजोगा आहे. ही बिंदु इथेंच उभी आहे. [ उघड ] बिंदुताई–[स्वगत] बिंदुताई काय ? बोलण्यांत परभाषेची सामान्य रचना पाहिजे. [ उघड ] बिंदुताई, काय करितो म्हटलें ?

**बिंदु**–कांहीं नाहीं ! करायचें काय आहे असें ?

**प्रभाकर**—[ स्वगत ] ही आतांशा अशी उद्विग्न कां दिसते ? [ उघड ] बिंदुताई, सांप्रत आपण दुःख करतो का ? प्रकृति काय होतो ? आम्ही मनांत वाईट वाटतो ! कष्ट होतो !

**बिंदु**—[ स्वगत ] मोठा प्रेमळ दिसतो बिचारा ! [ उघड ] हें पहा, मी हल्लीं मोठ्या दुःखांत आहें.

**प्रभाकर**–अयय्यो ! कोण दुःख ?

**बिंदु**—तुमच्याजवळ बोलतें स्पष्ट. पण तुम्ही कोठें बोलणार नाहीं ना !

**प्रभाकर**–नहि नहि, नहि ! कसा बोलतो ? तो मोठा पाप राहतो. आपण स्पष्ट बोलना.

**बिंदु**–मी आहें माझ्या लग्नाच्या काळजींत. कुठें स्थळच मिळत नाहीं. आपले ते कामण्णा गवई आहेत ना ? त्यांनीं माझ्याशीं लग्न करायचें कबूल केलें होतें. पण आतांशा त्यांची वृत्ति जरा चंचल झाल्यासारखी दिसते. म्हणून मी मोठ्या विवंचनेंत पडलें आहें.

[ राग **खमाज**, ताल **त्रिवट** ]

**मम का पावति आशा नाशा ॥ धृ० ॥ ठेवि धनुसि**
**शर एकाचि त्याची । हो निराशा ॥ १ ॥**

**प्रभाकर**—फार खराब ! दुष्ट गोष्ट !

**बिंदु**—[ स्वगत ] आतां करावा धीर झालें ! आपलें हित बघायला आहे कोण काळजिचें दुसरें ? [ उघड ] हें पहा, आपलें झालें आहे का लग्न ?

**प्रभाकर**—आम्हीं लग्न नाहीं झालों ! विद्याभ्यास ! आतां कुटुंबिनी तपासतो ! प्रगल्भ वधू योग्य !

**बिंदु**— आणि ती रूपानें बरी नसली तर ?

**प्रभाकर**—चालतो ! भार्या रूपवती शत्रुः वेदवाक्यम् प्रमाणम् ! सुंदर ते शत्रू राहतो ! नाप !

**बिंदु**— मग मला पदरांत—

**प्रभाकर**—फार आनंद होतो ! लग्न मान्य ! पण आपला प्रेम त्या गायकाला असतो. तो पुनरपि येतो तर आपण आम्हांस वचन मोडतो.

**बिंदु**—नाहीं, अगदीं देवाशपथ नाहीं ! त्या कामण्णाशीं लग्न आतां मला मुळींच नको आहे ! अहो, तुम्हीं किती प्रेमळ. किती पोक्त ! तो कामण्णा कसला ! माणूस का म्हणायचें त्याला ?

**प्रभाकर**—वाईट दुष्ट असतो काय ?

**बिंदु**— अहो, नाहीं तर काय ? अहो, तो कामण्णा मोठा भयंकर माणूस आहे—कुणाजवळ बोलूं नका मध्यां ! अहो, तो मराठी चांगलें बोलतो. तो आंधळा नाहीं.

**प्रभाकर**—मराठी बोलतो ? आंधळा नसतो ? काय सांगतो ?

**बिंदु**—अहो, इतकेंच काय ? [ स्वगत ] आतां कामण्णानें कागद चोरल्याचेंही सांगून टाकावें, म्हणजे यांचा माझ्यावर विश्वास बसेल. पण नको ! अशी त्यांची अगदीं आशा सोडणें इतक्यांत बरें नाहीं. हे फटदिशीं बोलायचे कुणाजवळ ! आंधळेपणाचें उगीच सांगितलें यांना !

**प्रभाकर**—इतकाच काय ?

**बिंदु**—कांहीं नाहीं; तो माणूस चांगला नाहीं इतकेंच. तें राहूं द्या ! पण तुमचा विचार कायम राहील ना ?

**प्रभाकर**—स्थिर निश्चय ! चिंता नको ! चल.

**बिंदु**—चला. पण हें कुणाजवळ बोलूं मात्र नका.

**प्रभाकर**—नाहीं. [ स्वगत ] हा काय घोटाळा आहे कळत नाहीं. लतिकेच्या कानावर ही गोष्ट घातलीच पाहिजे. [ दोघे जातात ]

———

# प्रवेश पांचवा

[ स्थळ–**धनेश्वराचें घर.** पात्र–**लतिका** व **महेश्वर** ]

**महेश्वर**—[ स्वगत ] किती चतुर आणि मर्यादशील मुलगी आहे ही ! एक शब्द स्पष्टपणें बोलल्यावांचून किती स्पष्टपणानें माझ्याशीं लग्न करण्याची आपली इच्छा व्यक्त केली ! नाहीं तर त्या कैकाडणी ! प्रेमाची मंडई मांडली आहे नुसती ! पण त्यांच्याप्रमाणेंच हिनेंही माझ्याशीं लग्नाला तयार असावें हें यांच्यांतलें साम्य मात्र चमत्कारिक आहे. मी हिच्यापुढें एक गरीब, आंधळा, कानडी म्हणून उभा आहें. मग हिचें माझ्यावर कां प्रेम बसावें ?

**लतिका**—आपण गप्प बसलां ?

**महेश्वर**—आश्चर्य करतो ! आम्ही अंध दरिद्र कन्नड ! भाषा हे ! तुम्ही प्रेम, लग्न बोलतो ! काय ? आश्चर्य फार !

**लतिका**—आपण बरोबर विचारलें ! हे पहा, मी आहे फार लहरी ! श्रीमंत बापाची एकुलती एक मुलगी ! लहानपणीं माझी आई वारल्यामुळें बाबांनीं मला अतिशय लाडांत वाढविलें. तेव्हा साहजिकच मला एवढासा विरोध खपत नाहीं. हे डोळस तरुण रूपावर लुब्ध होऊन माझ्या अर्ध्या वचनांत वागायचीं वचनें देतात; पण रूप क्षणभंगुर असल्यामुळें यांपैकीं कोणालाही असें वचन आजन्म पाळतां येणार नाहीं, आणि पुढें मला त्रास होईल. म्हणून मला असा लग्नसंबंधच आवडूं लागला आहे. आपण खात्रीनें जन्मभर माझ्या आज्ञेंत वागाल अशी माझी खात्री आहे. आपल्यासारख्यांना त्याखेरीज गत्यंतरच नाहीं. शिवाय आपण पडलां दरिद्री, आणि मी पडलें लक्षाधीशाची मुलगी. आपला प्रतिपाळ माझ्या संपत्तीमुळें होत गेल्यानें तोही आपल्यावर माझा उपकार होत जाईल. समजतें ना माझें बोलणें नीट ?

**महेश्वर**—सहवास मराठी येथें होतो. भाषा समजतो. आपला संकल्प सयुक्तिक ! योग्य ! आम्ही लग्न संमत ! यावच्चंद्रदिवाकरौ दास होतो ! हें निश्चय अचल काय ?

**लतिका**—अगदीं अचल निश्चय आहे माझा ! पण तुम्हांला जन्माची गुलामगिरी पत्करावी लागेल ! [ इंदु प्रवेश करते ]

**महेश्वर**—आज्ञा प्रमाण !

**इंदु**—ताई. घनश्याम तुला भेटायला आले आहेत.

**लतिका**—मग त्यांना पाठवून दे इकडे. आणखी हें पहा इंदुताई, जातांना या कामण्णांना आंत घेऊन जा बरें!

**इंदु**—चला कामण्णा !

**महेश्वर**—( जातां जातां स्वगत ) बरें, पण हा घनश्याम कशाला भेटतो आहे हिला ? माझ्यासाठीं मागणी घालायला कीं काय ? बाकी मला आतां त्याची काय फिकीर आहे म्हणा ! लतिका स्वतःच पाणिग्रहणाला तयार झाल्यावर घनश्यामाच्या ओंजळीनें पाणी पिण्याची मला काय जरूर आहे ? आज मी घनश्यामाला रामराम ठोकायला अगदीं मोकळा आहें.

**लतिका**–[ स्वगत ] याच्याशीं असें भलतेंसलतें बोलायचें किती जिवावर आलें होतें माझ्या ! पण एरवीं प्रभाकरांच्या डोळ्यांत अंजन कसें पडलें असतें ? माझ्या मनांत चलबिचल उत्पन्न करण्यासाठीं त्यांनीं बिंदूवर प्रेम करण्याचा आव घातला आणि मुद्दाम ते सारें माझ्या कानांवर घालण्याचा प्रयत्न केला काय ! अशा सोंगानें फसायची नाहीं मी ! आतां मी या आंधळ्याशीं लग्न लावायला तयार झाल्याचें कळलें म्हणजे त्यांचीं बोटें चांगलीं त्यांच्याच डोळ्यांत जातील ! हा त्रास कशाला आला कुणास कळे !

( घनश्याम येतो )

**घनश्याम**—[ स्वगत ] महेश्वर फसतां फसतां पुरतेपणीं माझ्या हातीं सांपडल्यामुळेंच आज लतिकेच्या हाताची मागणी करण्यापर्यंत माझी मजल येऊन ठेपली. ( उघड ) लतिकाताई, मी आलों आहें.

**लतिका**—चमत्कार आहे मोठा ! तुम्ही याउप्पर माझी गांठ घेण्यासाठीं याल हें मला स्वप्नांत सुद्धां अशक्यच वाटलें असतें.

**घनश्याम**–हें जग इतकें चमत्कारिक आहे कीं, त्यांत एका वेळीं अशक्य वाटणाऱ्या गोष्टी दुसऱ्या वेळीं सहज घडून येतात. रामावतारी श्रीरामाचें नांव घेण्याची एखाद्या स्त्रीची प्राज्ञा नव्हती;पण तेंच रामनाम आज पोरीबाळींच्या सुद्धां हातीं सांपडलेलें पहायला मिळतें ! लतिके–क्षमा करा हं;आपल्या मोठ्या नांवाला आटोपशीर एकवचनांत--पण तेंच मी सांगणार आहें—लतिके, त्या दिवशीं तुझें नांव काढण्याची माझी योग्यता नव्हती; पण तुला आज माझ्या नांवानें नटविण्याकरितां मी आलों आहें. लतिके, तुझे शब्द तुला आठवतच

असतील—'उद्यां तुम्ही मला मागणी घालाल!' ती उतावळी उद्यां आजच उगवली आहे. लतिके, आज मी तुला मागणी घालण्यासाठीं तुझ्यापुढें उभा आहें.

**लतिका**—घनश्याम, तुम्ही काय बोलतां याचा तुम्हांला अर्थ तरी समजतो आहे का?

**घनश्याम**—मूर्ख पोरी, माझ्या बोलण्याचा अर्थ समजण्याची तुला मात्र नवेपणामुळें जरा पंचाईत पडेल. पुन्हां नीट समजून घे. लतिके, हा घनश्याम तुला मागणी घालण्यासाठीं तुझ्यापुढें उभा आहे. उगीच शब्दांचा पाल्हाळ मला नको आहे. एका शब्दांत सांग. मात्र आधीं सर्व परिस्थितीचा नीट विचार कर. माझ्या मागणीचें मला उत्तर दे पाहूं!

**लतिका**—नीट विचार कसला करायचा त्यांत? घनश्याम, इथून चालते व्हा आधीं; नाहीं तर बाबांना हांक मारून तुम्हांला या घरांतून कायमचा निरोप देववीन!

**घनश्याम**—आपण कशाला ही तसदी घेतां? मीच आपल्या वडिलांची भेट घेणार आहें, आणि ती याच कामासाठीं! वाः! जुन्या पद्धतीनें मालतीला मागणी घालण्यासाठीं तिच्या वडिलांना भेटलों तों त्यांनीं संमतीसाठीं मालतीकडे बोट दाखविलें, म्हणून या वेळीं नव्या पद्धतीप्रमाणें मागणीसाठीं प्रथम आपणांकडे आलों आणि आपण वडिलांच्याकडे जायला सांगतां आहां! आपल्या लग्नाची गोष्ट मीं आपल्या वडिलांजवळ काढली तर काय होईल असा आपला उर्मट अंदाज आहे बरें!

**लतिका**—माझ्या लग्नाबद्दलचीं मुक्ताफळें तुमच्या तोंडून निघतांच बाबा हातोहात तुम्हांला वाटाण्याच्या अक्षता देतील.

**घनश्याम**—आपल्या वडिलांपाशीं माझें किती वजन आहे याची आपल्याला कल्पना नाहीं. तुमचा हात मात्र ते हातोहात माझ्या हातीं देतील!

**लतिका**—माझा प्राण गेला तरी मी माझा हात तुमच्या हातीं देणार नाहीं.

**घनश्याम**—शिष्टसांप्रदाय सोडून बोलायचें म्हणजे तूं हात दिला नाहींस तर तुझा बाप तुझा हात माझ्या हातीं देईल.

**लतिका**—असें कल्पांतीं व्हायचें नाहीं! आणि इतक्या उप्पर तुम्हांला सांगून ठेवतें कीं, फार झालें तर बाबा माझा हात तुमच्या हातीं देतील, पण

माझें हृदय तुमच्या हातीं देणें हें बाबांच्या हातीं तर नाहींच, पण माझ्याही हातीं नाहीं. लग्नाच्या जुलमानें माझा हात तुमच्या हातीं येईल; पण हातापासून हृदय दोन हात दूर असतें; माझ्या हृदयांत तुम्हांला जागा मिळणें शक्य नाहीं!

**घनश्याम**--बरोबर आहे! तुम्हां नटव्या पोरींच्या हृदयांत स्थळ मिळविण्यासाठीं तरुणाच्या मूर्तीला प्रतिबिंबरूपानें डोळ्यांतून उतरावें लागतें, आणि डोळ्यांतून उतरण्यासाठीं आधीं डोळ्यांत भरावें लागतें. लतिके, तुझ्या दृष्टीनें मी लग्नाला नालायक आहें खरा; पण तुझ्या बापाच्या दृष्टीनें या लग्नाचा चमत्कार कसा दिसतो तो आतां पहा! लतिके, जातों मी.

[जातो]

**लतिका**--(स्वगत) काय बेमुर्वतखोर मनुष्य आहे! माझें मस्तक अगदीं फिरायला लागलें आहे. आतां अशी जाऊन बाबांना सांगतें कीं, आधीं या उन्मत्त मनुष्याला आपलें घर बंद करा! काय बोलायची तऱ्हा ही!

[राग **बागेसरी**, ताल **दादरा**]

**कोप मानुं का नीचचेष्टा बघोनी ।। चेष्टा बघोनि हासुं का मोकलोनी ।। धृ० ।। फुगवोनी उदर बहुत । वृषभसाम्य करूं पहात । दर्दुर निज अंतिं अंत । मूर्ख घे करोनी ।।१।। उभवुनी फणा फणीहि । स्वामीतें दंशुं पाहि । पाडुनि निज दंत घेइ । मूढता वरोनी ।।२।।** [जाते]

---

# प्रवेश सहावा

[स्थळ--**धनेश्वराचें** घर; पात्र--**मनोहर**]

**मनोहर**--(स्वगत) मालती! मालती! मालतीबरोबर माझ्या जगांतली रमणीयताहि मला अदृश्य झाली, आणि जीवित जड होऊन बसलें आहे. मालतीच्या सहवासांत काळ किती नकळत निघून जात असे! तरुण प्रणयीजनांच्या सुखसंवादाच्या वेळीं कुलीन आणि गंभीर वृत्तीचा काळपुरुष मर्यादशीलपणानें ओशाळून चोरट्या पावलीं भराभर चालता होतो, आणि दुःख-

प्रसंगीं कष्टी जीवाचें सांत्वनपर समाधान करण्यासाठीं थोर मनानें त्याच्याजवळ तिष्ठत बसतो. दुःख जितकें मंदगति आहे तितकेंच सुख चंचल आहे. या मृत्युलोकच्या वस्तींत सुखाचा संसार इतका क्षणभंगुर आहे कीं, कधीं कधीं पहिल्या चुंबनानें गालावर लाली येते न येते तोंच ती शेवटच्या वियोगाच्या अश्रूंनीं धुवून काढण्याची घाई होते. सुखाच्या आयुष्याप्रमाणें गुणधर्महि चंचलवृत्ति असतात. सुखाच्या सृष्टींतला प्रेमाचा घोंट ओंठांना अमृताचा आस्वाद देतो, आणि जिभेवर जाण्यापूर्वीच जहराप्रमाणें जाळायला लागतो. सुंदर तारा अक्षय आहेत पण दुर्लभ आहेत; आणि सहज लाभण्यासारखीं फुलें क्षणिक आहेत; म्हणून मानवी सृष्टींत सुखस्थिति पाहण्याच्या लोभानें विधात्यानें त्या दोघांचे प्रमाणशीर गुण घेऊन स्त्रियांचे सुंदर नेत्र निर्माण करून पाहिले तर त्यांत त्याची सर्वस्वीं निराशा झाली! त्या गुणांऐवजीं स्त्रियांच्या सुंदर नेत्रांत तारांची दुर्लभता आणि फुलांची क्षणभंगुरता मात्र दिसून येऊं लागल्या! वाः, प्रभाकराला हंसतां हंसतां परिस्थितिमुळें आज मीच तारापुष्पांची काव्यें करायला लागलों!

[ प्रभाकर कानडी वेषांत घाईघाईनें येतो ]

**प्रभाकर**—मनोहरा, हें बघ—

**मनोहर**- म्हणजे? हा काय—

**प्रभाकर**—मी प्रभाकर आहें. हें रूपांतर कां केलें तें मग सांगेन.

**मनोहर**—प्रभा, तुझ्या बहिरंगाइतकेंच माझ्या अंतरंगाचें रूपांतर झालेलें आहे. आज मी तुझ्यासारखा तारापुष्पांचा कवि झालों आहें!

**प्रभाकर**—आणि मी तुझ्यासारखा दगडांशीं झटापटी करण्याइतका व्यवहारी झालों आहें! तूर्त मी काव्यमय मनःस्थितींत नाहीं. मला आतां अगदीं वेळ नाहीं. मनोहरा, धनेश्वरपंतांच्या घरांत कांहीं घोंटाळा चालला आहे असा माझा तर्क आहे. तो कानडी गवई म्हणजे सोडवण्यासारखें एक कोडेंच आहे. त्या लबाड आंधळ्याची नजर साफ नाहीं; आणि त्याला घनश्यामानें घरांत आणून सोडलेला आहे. त्या दोघांचें खास कांहींतरी संगनमत आहे. हल्लीं घरांत जे दुःखदायक चमत्कार होत आहेत त्यांच्या मुळाशीं या दोघांची खटपट असावी अशी माझी खात्री होत चालली आहे. धनेश्वरपंतांच्या हितासाठीं हें रहस्य आपल्याला हुडकून काढणें अवश्य आहे. कदाचित् यांत मालतीच्या—

**मनोहर**—हां प्रभा एक्सक्यूज! या विषयावर कोणाशीं एक अक्षरही न बोलण्याची मीं शपथ घेतलेली आहे.

**प्रभाकर**—बरें राहिलें! पण धनेश्वरपंतांची काळजी तरी आपल्याला घ्याव-याला नको का?

**मनोहर**—बरें मग काय सांगतोस मला?

**प्रभाकर**—सध्यां तसें निश्चयात्मक काय सांगतां येणार? तूर्त मी या गव-याचा गळा धरून बसतों, आणि तूं घनश्यामाच्या मागावर रहा. मात्र तो फार धूर्त आहे, तेव्हां त्याच्यावर दुरूनच पाळत ठेवीत जा. याचा परिणाम काय होईल हें आतां सांगवत नाहीं; पण हें काम फार महत्त्वाचें एवढें मात्र विसरूं नकोस. घनश्यामाच्या हालचालींवर नीट नजर ठेव.

**मनोहर**—म्हणजे काय होईल?

**प्रभाकर**—सांगतों ना, आज कोणत्या रस्त्यानें जायचें एवढेंच आप-ल्याला दिसतें आहे; तें कां जायचें हें सध्यां कळत नाहीं. सांगितल्या कामाची हेळसांड मात्र करूं नकोस. सध्यां मी घाईत आहें. कांहीं कमजास्त कळलें, तर ताबडतोब मला येऊन सांग. जरा काळजीनें मात्र वाग, बरें का!

[ जाऊं लागतो ]

**मनोहर**—ठीक आहे. तूं अगदीं काळजी करूं नकोस.

**प्रभाकर**—( परतून ) आणखी हें बघ, या वेषांतराच्या अवस्थेंत मला या घरीं भेटूं नकोस. आमच्या घरीं माझी भेट घे बरें का? [ जातो ]

**मनोहर**—ऑल राइट, [स्वगत] धनेश्वरांच्या सुखासाठीं! माझ्या सुखाची ज्यांनीं होळी केली त्या धनेश्वरांच्या सुखासाठीं! मालतीचें हरण करून ज्यांनीं माझ्या प्रेमांत विष कालविलें, आणि माझ्या जन्माचा सत्यानाश केला—पण त्यांनींच आजन्म माझें पालनपोषणही केलेलें आहे! माझ्या अन्नदात्याशीं मला कृतज्ञतेनें वागायला नको का? नाहीं, प्रेमासाठीं मी कर्तव्य सोडणार नाहीं! अरेरे! प्रेमा, तूं अमृतमय आहेस कीं विषमय आहेस? तुझ्या संसर्गामुळें दूषित झालेल्या हृदयांत कृतज्ञतेसारख्या दैवी गुणाला सुद्धां जागा मिळण्याची पंचाईत पडते काय? किती भयंकर आहेस तूं!

[ राग **भीमपलास**, ताल **धुमाळी** ]
**सुखा पारखा झाला । अभागी जो या प्याला ।**
**भरला का प्रेमाचा हा विषारी ऐसा प्याला**
**॥ धृ० ॥ नवरसलीला कोमल जाळुनियाच रस**
**हा भीषण केला । हृदयदहन करि दुरुनिच हा ।**
**पळभरि अधरीं न जो ठरला ॥ १ ॥**

[ जातो व पडदा पडतो ]

---

# प्रवेश ७ वा

[ स्थळ—**धनेश्वराचा** दिवाणखाना. पात्रें—**धनेश्वर** कागद शोधीत आहे. मागें बराच दूर हातांत एक कागद घेऊन **घनश्याम** उभा आहे. ]

**धनेश्वर**—( स्वगत ) म्हणजे ? झाले काय कागद ?

[ इकडे तिकडे शोधतो ]

**घनश्याम**—काकासाहेब, आपल्याला जें पाहिजे तें हें पहा !

[ धनेश्वर मागें पाहातो ]

**धनेश्वर**—काय आहे तें ? [ जवळ येऊन कागदाकडे पहातो ] काय पहातों आहें हें मी ?

**घनश्याम**—हें आम्हांला नवीन आहे; आपल्याला याचा पूर्ण परिचय आहे. काकासाहेब, ही आपण तयार केलेली एक खोटी हुंडी ! तुम्हां सर्वांच्या स्वैर इच्छांचें मृत्युपत्र, माझ्या इच्छेची जन्मकुंडली ! हुशार हातीं पडल्या-मुळें हिचा बाजारभाव आपल्या घरादाराच्या किंमतीपेक्षांही हल्लीं जास्त चढ-लेला आहे ! हा एकच कागद पाहिल्याबरोबर आपले डोळे पांढरे होतील, म्हणून उगाच बाकीचे कागद बरोबर आणण्याची मी तसदी घेतली नाहीं. बाकी या हुंडीच्या जोडीचे आणि तोडीचे सारे कागद-आपल्या सर्व खोट्या हुंड्या

आणि खोटे दस्तऐवज हल्लीं सुरक्षितपणें माझ्या कबजांत आहेत. दंगाधोपा करून फार झालें तर हा एकच कागद आपण मजकडून हिसकावून घ्याल.

**घनेश्वर**—कसे मिळाले हे कागद तुला ?

**घनश्याम**—[ हंसून ] हे कागद मीं आपल्या घरांतून चोरले.

**धनेश्वर**—चोर, हरामखोर ! हंसत हंसत हें सांगायला तुला लाज वाटत नाहीं ? तुझ्या जिवाला कांही भय भीति आहे कीं नाहीं ?

**घनश्याम**—माझा काय संबंध यांत ? या गोष्टीची सारी लाजलज्जा आपल्या मनाला आणि भयभीति आपल्या जिवाला वाटायला हवी ! रागाच्या भरांत आरडाओरडा कसला करितां आहा ? काकासाहेब, आपण कुठें आहां आणि काय करितां आहां—निदान आपण हें काय केलें आहे, आणि यामुळें कुठें जाऊन पडाल याचा विसर पडला आहे वाटतें आपल्याला ? करा पाहूं आरडा-ओरड ! जमवा चारचौघांना ! हा चोरीचा मुद्देमाल ! यासकट या आपल्या चोराला सरकारी शिपायांच्या ताब्यांत द्या पाहूं ! करून पहातां का ही मौज जरा ? मेहेरबान, ही अशी चमत्कारिक चोरी आहे कीं, जी मुद्देमालानिशीं उघडकीस आली तर चोराऐवजीं मालकालाच भयंकर मुदंड भरीत बसावें लागेल. बेअकलीपणामुळे कधीं कधीं चोरासाठीं तिऱ्हाईत संन्याशालाच सुळीं जावें लागतें; पण अकलेच्या कसरतीनें चोराबद्दल मालकालाच सुळावर चढ-वितां येतें तें असें ! याच त्या चोराच्या उलट्या—

**धनेश्वर**—उलट्या काळजाच्या राक्षसा—

**घनश्याम**—बस, धनेश्वरपंत ! आतां शब्दांच्या देवघेवी करायला मला वेळ नाहीं. तुमच्यावर वेळ काय आली आहे ती नीट ओळखा, आणि माझें म्हणणें नीट ऐकून घ्या. मालतीच्या आणि आपल्या लग्नाचा तिथिनिश्चय केव्हां करायचा ?

**धनेश्वर**—यापुढें लग्न न करण्याचा मी निश्चय केलेला आहे.

**घनश्याम**—( कागद दाखवून ) या लग्नकुंडलींत तसा योग दिसत नाहीं. आपण मालतीशी लग्न केलेंच पाहिजे.

**धनेश्वर**—म्हणजे ?

**घनश्याम**—ही माझी इच्छा आहे ! आपल्याला काय वाटलें ? आपल्या लग्नाच्या खटपटीत मी पडलों तो आपल्या थेरडयाच्या शोकासाठीं ? मालतीच्या

जन्माचा सत्यानाश करायचा हा माझ्या प्रतिज्ञेचा एक भाग आहे. आपल्या अमर्याद मुलीनेंच मला या प्रतिज्ञेच्या भरीस पाडलें; आणि तिच्याशीं-आपल्या लाडक्या लतिकेशीं–माझें लग्न लावणें हा त्या प्रतिज्ञेचा उत्तरार्ध. धनेश्वरपंत, या दोन्ही गोष्टी बिनबोभाट घडून आल्याच पाहिजेत.

**धनेश्वर**—नीचा, काय म्हणतोस तरी काय हें ? चल जा, मला तुझें म्हणणें कबूल नाहीं !

**घनश्याम**—ठीक आहे. मग मी आपला निरोप घेतों. [जाऊं लागतो]

**धनेश्वर**—थांब, चांडाळा ! काय करण्याचें योजिलें आहेस मनांत तूं !

**घनश्याम**—आपण जाणतच आहां, कीं मी पाजी मनाचा मनुष्य आहें म्हणून ! मी काय करणार आहें होय ? बेचाळीस पिढ्यांसकट आपल्याला मातीला मिळवणार आहें मी !

**धनेश्वर**—दम ग्या, घनश्याम. जरा थोर मनानें विचार करा—

**घनश्याम**–धनेश्वरपंत, ही दर्शनी हुंडी आहे. ही नाकारून तर चालत नाहींच, पण वायदे सवलतींची मुद्दां अळंटळं केल्यावांचून पहातांक्षणींच पटवावी लागते. मणि हरपल्यामुळें सापाप्रमाणें नुसती आपलीच फणा आपटीत बसाल, तर नाहक प्राणाला मुकाल. पण आपल्याला माझें बोलणें रुचत नाहींसें दिसतें ! उगीच आपण मला परत बोलाविलें. [जाऊं लागतो]

**धनेश्वर**—निर्दया, थांब ! तुझा हुकूम मला कबूल आहे.

**घनश्याम**—ठीक आहे. मात्र एवढें लक्षांत ठेवा, आपण जरा हालचाल केलीत कीं या गळफांसाची सरकगांठ ओढून मी आपला गळा आंवळलाच !

**धनेश्वर**—तुमचें म्हणणें मला अक्षरशः कबूल आहे.

**घनश्याम**—मग हीं दोन्हीं लग्नें तीन दिवसांच्या आंत उरकलींच पाहिजेत.

**धनेश्वर**–पण मीं मालतीला वचन दिलें आहे कीं–

**घनश्याम**–तें मोडून टाका वचन ! हं, ही आपली लतिका येते आहे. आतांच हिचें भविष्य हिला सांगून टाका. तुमच्या लग्नाचाही निश्चय तिला सांगा. एकेका शब्दानें एकेक कामांतून पार पडा, गोडीगुलाबीनें तिची समजूत घालणें किती दुरापास्त आहे हें आपल्याला मजपेक्षां जास्त माहीत आहे. यांत चूक झाली तर– [ लतिका येते ]

**लतिका**–बाबा, या उद्दाम मनुष्याला आधीं–

**धनेश्वर**—लतिके, उगीच कांहीं तरी बोलत सुटूं नकोस! लतिके, मालतीशीं लग्न करण्याचा माझा विचार पुन्हां कायम झालेला आहे.

**लतिका**—बाबा, काय बोलतां हें?

**धनेश्वर**—पोरी, आणखी काय बोलतों तें ऐकून घे आधीं. तुझें लग्न या घनश्यामाशीं करायचें मीं कायमचें ठरवून टाकलें आहे. हीं दोन्हीं लग्नें तीन दिवसांतच व्हायचीं.

**लतिका**—माझी मान कापली तरी मी याच्या गळ्यांत माळ घालणार नाहीं!

**धनेश्वर**—मग माझी मान काप! लतिके, मीं सांगितलें तसें झालेंच पाहिजे! माझ्या नांवाची, घरादाराची, कुणाची तुला कांहीं चाड असेल तर मुकाट्यानें तुला घनश्यामाशीं लग्न केलेंच पाहिजे! चला, घनश्याम. [ दोघे जाऊं लागतात ]

**लतिका**—घनश्याम, थांबा जरा!

**घनश्याम**—काकासाहेब, आपण व्हा पुढें; मी आलोंच (धनेश्वर जातो) काय म्हणणें आहे आपलें?

**लतिका**—आपण आपलें म्हणणें शेवटास नेलें तरी माझें हृदय आपल्याला मिळेल असें का वाटतें आपल्याला?

**घनश्याम**—आपल्या हृदयाची किंवा संमतीची या लग्नाला काडीइतकीही जरूर नाहीं. रविकरांच्या स्पर्शानें उषेचें तोंड फिकें पडतें तद्वत् माझ्या हस्तस्पर्शानें आपलें तोंड गोरेंमोरें झालें काय किंवा रंगाऱ्याचा हात लागल्याप्रमाणें माझ्या हातांनीं आपलें श्रीमुख रंगून निघालें काय, मला दोन्ही प्रकार सारखेच वाटणार आहेत. लतिके, गुलाबाचा वास कसाही घेतला तरी गुलाबासारखाच यायचा; आंसवांच्या दंवानें झाली तर रंगाची खुलावट तेवढीच जास्त मात्र होईल! लतिके, या रंगेल गोष्टी बोलायला पुढें पुष्कळ वेळ आहे. तूर्त मला आपल्या लग्नसभारंभाच्या व्यवस्थेला लागलें पाहिजे. (जरा पुढें जाऊन पुन्हां मागें फिरून) हो, ही तुझ्या लग्नाची व्यवस्था झाली. मालती तुझी जिवाभावाची मैत्रीण; तेव्हां तुझ्या जिवाबरोबर तिचीही दैना कशी होणार हें कळलेंच तुला! बाईसाहेब, त्या दिवशीं धनीपणाच्या धुंदींत आपण मला मालतीच्या लग्नांत सामानाची यादी लिहिण्यासाठीं हजर रहाण्याला फर्माविलें होतें! आपल्या हुकमाप्रमाणें मालतीच्या लग्नाची एकंदर यादी तयार आहे. ही पहा, ऐका नीट! (एक कागद वाचीत) प्रथम श्रीकार आहे. 'मालतीच्या लग्नाच्या

सामानाची यादीः—तपशील एक—नवरदेव, धनेश्वर नांवाचा एक रंगेल, स्वार्थी, पंचावन वर्षांचा म्हातारा!' बाईसाहेब, पुढें सगळी यादी मालतीच्या आंसवांनीं पार धुवून निघाली आहे! लतिके, त्या वेळीं तुला कल्पनाही नसेल, कीं मालतीच्या लग्नाची यादीच नाहीं, पण तुम्हां सर्वांचे ललाटलेख सुद्धां खरडण्याचें या घनश्यामाच्या हातीं आहे म्हणून! ( जातो )

**लतिका**–( स्वगत ) देवा, काय होऊं पहात आहे हें सारें ?

[ राग **सारंग**, ताल **दादरा** ]

**खल छलित कसा धरुनि दंशा। जडवित सकला**
**कपटपाशा ॥ धृ० ॥ समसुखी सखी ती। होई समार्ति।**
**सुख का विचारांत ऐशा ॥ १ ॥** [ जाते ]

———

# अंक चौथा

## प्रवेश पहिला

[ स्थळ—**स्मशान**; पात्र—**मनोहर** ]

**मनोहर**—( स्वगत ) प्रभाकराचा स्वभाव जरासा तऱ्हेवाईक खराच! काय कल्पनेच्या भरांत त्यानें मला घनश्यामावर पाळत ठेवयला सांगितलें हेंच कळत नाहीं! बरें, त्याचें म्हणणें न ऐकलें तर लागलींच माथ्यांत राख घालून बसायचा! एव्हांपर्यंत नीट पाहिलें, घनश्याम रोजचे व्यवहार रोजच्याप्रमाणेंच करीत आला. नाहीं म्हणायला रोजच्या राबत्यांतला रस्ता सोडून आतां या स्मशानांतल्या ओसाडीवरून गेला एवढेंच! पण इतक्यांत घनश्याम नाहींसा झाला कसा? पुन्हां गांवांत तर गेला नाहीं? असेंच असेल; कारण या उघड्या जागेंत कुठें दडून बसायला एखादा आडोसाही नाहीं. घनश्याम तांतडीनें गांवांत गेला; पण मला तितकी घाई करून गांवांत जाण्याचें काय कारण उरलें आहे? या शांत स्मशानांत मनाला अंमळ विश्रांति मिळणार नाहीं का? अरेरे, मालती, तुझ्या अवकृपेमुळें विश्रांतीसाठीं मला हें स्मशान प्रिय वाटण्याची वेळ यावी ना! झाली त्या दुःखदायक विचाराची सुरुवात! छेः, स्मशानांत सुद्धां विसाव्याची आशा नाहीं.

[ राग **बहार**, ताल **त्रिवट** ]

**व्यग्र चित्त झालें जरि या स्थलीं पसरली शांति मूर्ता**
**॥धृ०॥ चिरनिद्रेच्छा येथ धरूनि जन पहुडति हो र्ता**
**पूर्ण पूर्ता ॥ १ ॥ विस्मृति पडते अभंग येथें दुःखाघांची**
**आर्तधूर्ता ॥ २ ॥**

**देहासुद्धां** मनानें जिवंत असतांना जित्या जगाच्या जांचण्या चुकविण्याच्या हेतूनें आयुष्याचें शेवटचें टोक गांठण्यासाठीं जितेपणींच एकदम या स्मशा-

नांत येऊन बसणें म्हणजे लवकर कालक्षेप करण्यासाठीं घड्याळाचे कांटे पुढें सरकवण्याइतकेंच हास्यास्पद आहे! पण आतां माझ्यांत जिवंतपणा तरी काय राहिलेला आहे? मालतीनें त्याग केल्यामुळें हा मनोहर तिनें फेंकून दिलेल्या या त्याच्या चित्राइतकाच निर्जीव झाला नाहीं का? (चित्र खिशातून बाहेर काढतो.) दुर्दैवी चित्रा, तुझी आणि माझी सजीवता सारखीच! पण हें चित्र तरी मीं कशाला जवळ ठेवलें आहे? एका निर्जीव चित्रानें आठवणीसह दुसऱ्याचा भार कशाला बाळगावा? हें चालतेंबोलतें देहाचें चित्र मला आज टाकतां आलें नाहीं तरी हें चित्र या स्मशानांत कुठें तरी पुरून टाकून जिते-पणींच एक प्रकारें स्वतःची स्मशानयात्रा उरकतां येण्यासारखी आहे. देतों एखाद्या दगडाखालीं ठेवून झालें! (इकडे तिकडे पाहून) अरे, पण या काळ्या दग-डाच्या माळरानांत तो हिरव्या जातीचा दगड कुठला? काय बरें या दगडाच्या जातीचें नांव? (हंसून) पण मला आतां या शास्त्रीय ज्ञानाशीं काय करायचें राहिलें आहे? प्रेमाचा संसार सजविण्यासाठीं मनुष्याला ज्ञानाची आवश्यकता असते. माझी प्रेमाची सृष्टि जळून गेल्यामुळें या माझ्या ज्ञानाची तरी मला काय अपेक्षा आहे? जाऊं देत! हें चित्र या हिरव्या दगडाखालींच पुरून टाकून माझ्या प्रेमाच्या सृष्टींतील ही शेवटची साक्ष आणि ज्ञानाच्या संपर्काचा हा शेवटचा विषय या दोघांचा एकवाक्यतेनें कायमचा निरोप घेतों. आतां प्रेमही नको आणि ज्ञानही नको! [हिरव्या दगडाकडे जातो] वा:! माती काढायला हा मोडका लोखंडी तुकडा बरा मिळाला! काय गंजलेला आहे! [दगड उचलून जमीन उकरूं लागतो] किती भुसभुशीत जमीन आहे ही! अरे बापरे, हा कसला आवाज? हें काय आहे? [डबा काढून] हा जस्ताचा डबा आहे! [उघडतो] आणि यांत कांहीं कागद आहेत! [कागद पाहून] प्रभाकराचा तर्क बरोबर आहे. घनश्यामाचींच हीं सारीं कुलंगडीं! आणि हेंच पाहून जाण्यासाठीं घनश्याम स्मशानांतून गेला! किती चमत्कारिक कल्पना डोक्यांत एकदम खेळूं लागल्या! आधीं हें सर्व घेऊन प्रभाकराकडे जावें. [उठून] माझ्या आशेसाठीं खड्डा म्हणून खणायला गेलों, तो सुदैवानें तिचा पाळणा मात्र ठरूं पहात आहे! लोकांच्या संसारसुखाचा स्मशानांत शेवट होतो; पण या मनोहरच्या संसारसुखाचा स्मशानांत जन्म व्हावा अशी रे दैवी योजना नसेल ना? चला. अरे, पण मी वेडा तर नाहीं? हा दगड

पुन्हां जसाच्या तसा ठेविला पाहिजे. नाहीं तर घनश्याम पुन्हां इकडे फिरकतांच सारा प्रकार त्याच्या लक्षांत यायचा !

[ खळगा पुन्हां भरूं लागतो. पडदा पडतो ]

---

# प्रवेश दुसरा

[ स्थळ—**धनेश्वराचें** घर. पात्र—**धनेश्वर** ]

**धनेश्वर**–( स्वगत ) पातकांच्या भयप्रद जाणिवेनें तळमळणाऱ्या अंतःकरणाचें ओझें वागविण्याइतकी भयंकर शिक्षा नरकयातनांत तरी असेल का ? एका इंग्रजी प्रवासिनेनें एका ज्वालामुखी पर्वतावरचें धडाडलेलें अग्निसरोवर आणि गिरसाप्पाचा धबधबा हीं दोन स्थळें बघायला फार भयाण आहेत असा आपला अनुभव लिहून ठेवला आहे. कड्यावरून या दोन्ही ठिकाणीं डोकावून पहातांना तिला घेरी आली ! या धनेश्वराच्या पातकी मनांत तिनें जर क्षणमात्र डोकावलें असतें तर तिला त्या अग्निसरोवराच्या ज्वालामय लाटा आणि धबधब्याची अखंड धडकी हीं दोन्ही एके ठिकाणीं दिसून आलीं असतीं, आणि धाडसीपणा बाजूला राहून हृदयाला धक्का बसून ती ताबडतोब गतप्राण झाली असती ! बिचाऱ्या कोमलवृत्ति लतिका आणि मालती तर आपापल्यापरीनें माझ्या हृदयतापामुळें दुरूनही पोळून निघत आहेत ! नाहीं, मी लतिकेलाही जळूं देणार नाहीं आणि मालतीलाही जळूं देणार नाहीं. माझी गुंतलेली मान सोडविण्यासाठीं या हरामखोर घनश्यामाच्या गळ्यांत मी माझ्या लाडक्या मुलीला तिच्या मनाविरुद्ध—पण नाहीं, ही बापाची दया नाहीं ! हा घनश्यामाच्याबद्दलचा माझ्या मनांतला पीळ आहे. माझा जीव वांचविण्यासाठीं मी लतिकेचें मोरेश्वराशीं लग्न लावून द्यायला तयार झालों नव्हतों का ? त्या वेळीं लतिकेच्या मनाची मीं काय कदर केली ? अरेरे, त्या वेळीं त्या बिचारीला किती दुःख झालें असेल ! पण मग मालती माझ्याशीं लग्न करायला आपखुशीनें कशी तयार झाली ? माझ्याप्रमाणेंच या घनश्यामानें धुंडिराजपंतालांही एखाद्या अडचणींत पकडलें नसेल ना ? तर काय धुंडिराजा-

सारखा प्रेमळ बापही आपल्या संरक्षणासाठीं या नीच मनाच्या धनेश्वरा-प्रमाणेंच स्वतःच्या पोरीचा बळी द्यायला तयार होतो ? छेः छेः ! मालतीच्या जन्माचें मातेरें करण्याऐवजीं धुंडिराज अशा अडचणींतून स्वतःचा जीव देऊन—काय भयंकर कल्पना मनांत आली ही एकदम !—मग लतिकेसाठीं मी कां जीव देऊं नये ? मी जगांतून नाहींसा झालों तर माझ्या पातकांमुळें पीड-लेले किती तरी जीव एकदम दुःखमुक्त होतील ! लतिका, मालती—छेः, या विचारानें कांहींच्या कांहींच व्हायला लागलें ! आधीं मालतीला बोलावितों आणि ती माझ्याशीं लग्न करायला कशी तयार झाली याची शहानिशा करून घेतों. आज माझी लतिका दुःखांत पडल्याची मला जाणींव झाली, तेव्हां माल-तीच्या मनःस्थितीची मला आठवण झाली ! परमेश्वरा, तशी वेळ आलीच तर प्रसंगीं आत्मह—देवाधिदेवा, मी पातकी आहें, भेकड आहें, स्वार्थी आहें मला इतकें बोलण्याचा धीर कुठून होणार ! पण आपण सर्वज्ञ आहां !

[ जातो. पडदा पडतो ]

---

# प्रवेश तिसरा

[ स्थळ—**धनेश्वराचें** घर. पात्र—**मालती** ]

**मालती**—( स्वगत ) काल तसा प्रकार आणि आज असा प्रकार दैवाची गति कोणत्या दिशेनें होत आहे हेंच कळेनासें झालें आहे !

[ राग **देसकार**, ताल **झपताला** ]

**विधिचें हृदय लोल । चल जेंवि कल्लोल । कमलाहि**
**हिंदोल—। गत चंचला ती ॥धृ०॥ लतिकाजनक होई ।**
**विधिकंठमणि जेंवि । कमलाहि त्याठायिं । बहु पक्षपाती**
**॥ १ ॥ मति चंचला म्हणुनि त्याचीहि ये दिसुनि ।**
**फिरवीत हेतु मनिं । शतशा क्षणांतीं ॥ २ ॥**

लतिकेच्या वडिलांनीं हें मांडलें आहे नगी काय ? [ धनेश्वर येतो ] आपण मला बोलावणें पाठविलें होतें ?

**धनेश्वर** — हो. मला तुझ्याशीं बरेंच बोलायचें आहे. पण आधीं एका गोष्टीचा खुलासा करून टाकूं. तुला कळलेंच असेल कीं, तुझ्याशीं लग्न करण्याचा विचार मीं पुन्हा कायम केला आहे ?

**मालती**—हो !

**धनेश्वर**—या वचनभंगामुळें तुला माझा तिरस्कार वाटूं लागला असेल ?

**मालती**—( स्वगत ) वचनभंगामुळें दुसऱ्याचा तिरस्कार करण्याचा या मालतीला काय अधिकार आहे ?

**धनेश्वर**—तूं बोलत नाहींस ? या वचनभंगानंतरही तूं या लग्नाला पहिल्याप्रमाणें तयार आहेस का ?

**मालती**—काल आपणच होऊन हा विचार रद्द केला होता ! आपली इच्छा असली म्हणजे मी केव्हांही या लग्नाला संतोषानें तयार आहेच.

**धनेश्वर**—हेंच सध्यां मला गूढ वाटत आहे. मालती, कोणत्या मोहानें तूं या लग्नाला आनंदानें तयार होत आहेस ?

**मालती**—काय विचारलेंत आपण हें ? किती किती बरें वेडावाकडा प्रश्न आहे हा ! प्रसंगांत सांपडलेल्या मुलीनें काय उत्तर द्यावें या प्रश्नाला ? माझे वडील गरीब आहेत, पण कुलीनही आहेत. वाईट विचारलेंत आपण मला.

[ रडूं लागते ]

**धनेश्वर**—मालती, तुझ्या मनाला दुखविण्याच्या इच्छेनें मीं हा प्रश्न टाकला नाहीं. तुझ्या वडिलांचा उपमर्द करण्याच्या हेतूनें किंवा मिळालेल्या उत्तराचा कांहीं दुरुपयोग करण्याच्या बुद्धीनें मी बोलत नाहीं. सर्वांच्या कल्याणासाठींच मी बोलत आहें. मीं शपथ मोडली आहे, वचन मोडलें आहे, म्हणून माझ्या शब्दावर तुझा विश्वास बसणार नाहीं. पण मी अगदीं शुद्ध मनानें विचारतों आहें, या लग्नाला तूं कां तयार झाली आहेस ? धुंडिराज एखाद्या संकटांत का सांपडले आहेत ? तुझ्या वडिलांना संकटमुक्त करण्यासाठीं तूं या संकटांत उडी टाकीत आहेस का ?

**मालती**—स्वतः संकटमुक्त होण्यासाठीं माझे वडील मला संकटांत टाकतील ? छेः छेः, असें कधीं—कधींही व्हायचें नाहीं. आपल्याजवळ खरें सांगायला

हरकत नाहीं; माझ्या लहानग्या भावंडावर आलेले जन्माचें संकट टाळण्यासाठीं मी संकटांत उडी टाकीत आहें. सामान्य स्थितींत राहिल्यामुळें माझे बाबा किती उदार मनाचे आहेत याची आपल्याला नीटशी कल्पना व्हायची नाहीं. आम्हां मुलांच्या एवढ्याशा सुखासाठीं सुद्धां बाबा आपला जीव देतील.

**धनेश्वर**–( स्वगत ) मुलांच्या एवढ्याशा सुखासाठीं सुद्धां बाबा आपला जीव देतील! जीव देतील! नीच मनाच्या धनेश्वरा, हें ऐकून सुद्धां आतां कसला विचार करीत आहेस अजून? लहानग्या भावंडांसाठीं मालती जिवावर उदार झाली, मालतीसारख्या मैत्रिणीसाठी लतिका मोरेश्वरांशींही लग्न करायला तयार झाली; आणि या बिचाऱ्या कोवळ्या जीवांच्या हत्या टाळण्यासाठी तुला म्हातारडी आत्महत्या करायला धीर होऊं नये? बस, ठरला माझा विचार. आत्महत्या कितीही उग्र असली, भयावह असली तरी तिनें माझ्या पातकी जीविताचा शेवट करायला मी आता तयार आहें. ( उघड ) मालती, मला तुझ्याकडून एक वचन हवें आहे. तें वचन तुझ्या मनोवृत्तीइतकें पवित्र आहे. तें वचन कायावाचामनसा देण्यासाठीं क्षणमात्र माझ्या पातकी हस्तस्पर्शाला तूं तयार होशील का?

**मालती**–असें हिणविण्यासारखें विचारण्याचें काय कारण आहे? ज्या हातांत जन्माचा हात देण्यासाठीं मी तयार झालें त्या हाताच्या नुसत्या वचनापुरत्या स्पर्शाला माझी काय हरकत असणार? मजपासून असें कोणतें वचन हवें आहे आपणाला?

**धनेश्वर**–मालती, तें वचन तूं मनापासून दिलेंस तर तुझ्याशीं लग्न करण्याचें कारण राहणार नाहीं, आणि लतिका घनश्यामाला देण्याचेंही कारण उरणार नाहीं!

**मालती**–माझ्या सुखाची मी किती पर्वा करितें हें आपण जाणतच आहा. माझ्या बालिश आत्मप्रौढीची मला क्षमा करा–पण माझ्या लतिकाताईच्या सुखासाठीं मी आपल्याला नुसतें शब्दाचेंच वचन काय, पण माझ्या प्राणाचें वचन द्यायला सुद्धां तयार आहें.

[ राग **ललत,** ताल **त्रिताल** ]

**प्राणांहुनि लतिका प्रिय जिवासी। तिजवरि संकट**

**लघुहि ये तरी। हरिन त्या तनु त्यजुनि कीटशी ।।धृ०।।**
**अपूर्णता तत्सुखि जरि कांहीं । पूर्ण करिन तें देउनि**
**ममही । नवल न, आत्मा गणित तियेसी ।। १ ।।**

या गरीब मालतीवर आपल्या उदार कन्येचे उपकारच तसे आहेत. काय वचन हवें आपल्याला?

**धनेश्वर**—मला तुझ्यापासून एवढेंच वचन हवें, कीं माझ्या पश्चात् तूं आणि तुझ्या पतीनें माझ्या लतिकेचें सर्वतोपरी संरक्षण करावें. कसल्याही संकटांत, कुठल्याही प्रसंगीं तुम्हीं तिला अंतर देऊं नये. मालती, मालती, माझा सर्व नीचपणा विसरून जाऊन उदार मनानें मला एवढें वचन देशील का?

**मालती**—देवानें अशी वेळ मुळीं आणूंच नये; पण माझ्याकडून असें वचन मागण्याचें आपणाला कांहींच कारण नव्हतें. हें घ्यावें वचन! माझ्या बाबांचे पाय साक्षीला स्मरून सांगतें कीं, आपली आज्ञा मला प्रमाण आहे. (वचन देते) आणखी आपणांला ही कल्पना तरी कां आली? लतिकेवर कसलें संकट येणार? आपल्याशीं असें वैर तरी कोण धरणार?

**धनेश्वर**—समज उद्यां हा घनश्यामच तिच्यावर संकट कशावरून नाहीं आणणार? मालती कुणाजवळ बोलूं नकोस—आपल्या लतिकेनें या घनश्यामाला बोलण्यानें केव्हां तरी दुखविलेलें आहे, आणि म्हणून तो तिच्याशीं लग्न करण्याच्या हट्टास पेटलेला आहे. आतां आपण आग्रहानें लतिकेला दुसऱ्या स्थळीं दिली तर असला खुनशी मनुष्य कोणत्या वेळीं काय करील हें कुणीं कसें सांगावें? मला त्याची फार भीति वाटते. माझ्यामागें तुमच्या घराचाच काय तो लतिकेला आधार! मी आतां म्हातारा झालों. मनुष्यदेहाचा काय नेमानेम सांगावा! आज आहे उद्यां नाहीं!

**मालती**—आपली ही भीति अगदीं निराधार वाटते मला.

**धनेश्वर**—(हंसून) भिण्यासारखें कांहीं नाहींच! बरें, मालती, मी जातों. तुझ्या वचनामुळें धीर येऊन मी किती निश्चिंत झालों! मात्र मालती, मीं तुला एकदां दिलेलें वचन मोडलें हें मनांत आणून या तुझ्या वचनाची हेळसांड करूं नकोस. कांहीं झालें तरी तुझ्याशीं लग्न करणार नाहीं असें तुला आज मीं पुन्हां वचन दिलें आहे. हें वचन किती पवित्र निश्चयानें पाळतों तें

पहा. पण कांहीं झालें तरी तूं मात्र आपलें वचन विसरूं नकोस. तुझ्या वचनाचाच काय तो माझ्या मनाला आधार वाटतो माझ्यामागें लतिकेला तुमच्याखेरीज आपलें म्हणायला कोणीही नाहीं. मालती, माझी लतिका अगदीं लहान आहे, अल्लड आहे. मालती, जातों मीं. [ जातो ]

**मालती**—( स्वगत ) पहिल्यानें मला नुसता तुरळक संशय आला, पण शेवटीं खात्रीच झाली माझी. जातां जातां आधीं हंसल्यासारखें करून बोलले, आणि शेवटीं यांचे डोळे पाण्यानें भरून आले. यांच्या निर्वाणीच्या बोलण्यावरून खास यांनीं आत्महत्येचा निश्चय केला आहेसें वाटतें. घनश्यामाचीच यांनाही भीति वाटते. बाबांच्याप्रमाणें यांचाही गळा घनश्यामांनीं गुंतविला आहे कुठें तरी ! कां बरें घनश्याम असा सर्वांचा गळा कापायला तयार झाले? माझें लग्न यांच्याशीं ठरविण्याचा सुद्धां घनश्यामांचाच दुराग्रह दिसतो. इतका दुष्टावा करण्याचें घनश्यामांना काय कारण ? दुसरें काय ! यांनीं सांगितलें तेंच कारण ! यांना तें पुरतें माहीत नाहीं, पण मला त्याच वेळीं कळून आलें होतं ! त्या दिवशीं लतिकाताई घनश्यामांना विनाकारण नाहीं नाहीं तें तोडून बोलली, त्याबद्दल घनश्याम हा सर्वांवर सूड उगवीत आहेत. तरी लतिकाताईला मी सारखी सांगत होतें ! लतिका लतिकाताई, हा सारा तुझ्या फटकळ बोलण्याचा परिणाम !

[ राग **भैरवी**, ताल **पंजाबी** ]

**तव रसना आणी गुरु सकट तें ॥ धृ० ॥ चपला**
**रसना शस्त्र दुधारी । उलटत निज शिरिं पुरतें ॥ १ ॥**
**निज वाक्पाटवफलरस घेणें प्राप्त कधीं तिज होतें ॥२॥**

बिचारे घनेश्वर कसे दीनासारखे झाले आहेत ! कांहीं होवो, अजून तरी लतिकाताईला चांगलें बजावून ठेविलें पाहिजे. पण आतां उपयोग काय ? घातवेळा तर येऊन ठेपलीच ! तरी पण तिला उपदेश करायचा तो केलाच पाहिजे. [ लतिका येते ] ताई, नीट बैस अशी. मी काय बोलतें तिकडे चांगलें लक्ष दे. मी तुला आज वाईट बोलणार आहें; फार—फार—फार वाईट बोलणार आहें; अगदीं मनापासून रागानें बोलणार आहें. मी माझ्या सुखासाठीं बोलत नाहीं.

पण तुझ्या सुखासाठीं बोलतें आहें. माझ्या बोलण्यांत एखादी चूक कोठें सांपडते ती शोधून काढण्यासाठीं ऐकूं नकोस. सांपडलेल्या चुकीचें काय उत्तर द्यावें हें ठरविण्यासाठीं ऐकतांना मधून मधून विमनस्क होऊं नकोस. माझ्या बोलण्यांत जेवढें खरं असेल तेंच ऐकून घे; आणि शांतमनानें त्याचाच विचार कर. ताई, तुझ्या गुणांचें मोल माझ्यासारख्या गरीब आणि साध्या मुलीला कसें करतां येईल? मला तुझ्या सांवलीची सुद्धां सर येणार नाहीं. तूं वैभव-संपन्न आहेस, रूपसंपन्न आहेस, बुद्धिसंपन्न आहेस, प्रेमळ आहेस, सुशील, कुलीन आहेस, सर्वांचा जीव कीं प्राण आहेस. ताई, हें झालें; आतां इतकें असूनही आज तूं कोणत्या परिस्थितींत आहेस तें पहा. आतांच तुझे वडील मला भेटून गेले. त्याचें तें निर्वाणीचें बोलणें, ती दीन मुद्रा, ती निराश वृत्ति-त्याच्याकडे अगदीं पाहवेना मला! तूं अशी सदाची हंसतमुख, पण तुला सुद्धा रडूं कोसळलें असतें. त्यांनीं आज आत्महत्येचा निश्चय—अशी संशयानें बघूं नकोस, माझा तर्क अगदीं खरा आहे—आत्महत्येचा निश्चय तर आहेच, त्याबद्दल शंकाच नाहीं, पण माझी इतकी सुद्धां खात्री आहे कीं आज रात्रींच ते आत्महत्या करणार आहेत. आणि म्हणून आज तुमच्या घरून माझें पाऊल बाहेर निघत नाहीं. माझ्यामागें माझ्या लतिकेचा सांभाळ कर असें त्यांनीं मला किती काकुळतीनें कळवळून सांगितलें! किती अजिजीनें हातापायां पडून त्यांनीं माझ्याकडून तसें वचन घेतलें! घनश्यामांनीं तुझ्या बाबांना आणि माझ्या बाबांना कसल्या तरी अडचणींत पकडलें आहे. तेवढ्या साठीं माझ्या बाबांना मला तुमच्या घरीं देणें भाग पडलें. तुझ्या वडिलांना स्वतःच्या इच्छेविरुद्ध माझ्याशीं लग्न करण्याचें कबूल करावें लागत आहे. केवळ माझ्यापुरतीच ही गोष्ट होती, म्हणून मी आजवर तुला या गोष्टीची ओळखही दिली नाहीं. पण आज स्वतः तुझ्यावर प्रसंग आला आहे. घन-श्यामांच्या हुकमाबरहुकूम तुझें त्यांच्याशीं लग्न करून टाकायलाही तुझ्या वडिलांना आज तयार व्हावें लागत आहे, आणि या साऱ्या अपेष्टा टाळण्या-साठीं जीव देण्यापलीकडे तुझ्या वडिलांना दुसरा इलाज सांपडत नाहीं. कैक जीवांचा आणि दोन भरल्या घरांचा असा सर्वस्वीं सत्यानाश करायला घन-श्याम इतक्या त्वेषानें कां बरें झटत आहेत? आपणां सर्वांवर अशी आग पाखडण्याइतके घनश्याम कां निष्ठुर झाले? लतिकाताई, घनश्याम मला पहा-

यला आले त्या दिवशीं तूं आणि प्रभाकरदादा त्यांना जें सारखें टाकून बोलत होतां तें! तुझ्या वडिलांनीं या गोष्टीचें हेंच कारण सांगितलें. ताई, हा सारा अनर्थापात म्हणजे निव्वळ तुझ्या बोलण्याचा परिणाम. किती तुटून पडून तुम्हीं दोघे घनश्यामांच्या काळजाला घरें पाडीत होतां! त्या परक्या माणसानें असा तुमचा काय अपराध केला होता बरें? आपलेपणामुळें तुमची मालती तुम्हांला अधिक असेल; पण सामान्य स्थितींतल्या घनश्यामांनीं सामान्य स्थितींतल्या मालतीला पहायला यावें यांत असें अघटित तें काय होत होतें? हुरूपानें आलेल्या अभ्यागतावर एवढ्यासाठीं तशा बोलण्याचा मारा करायचा? बोलतां येतें म्हणूनच बोलत सुटायचें? आपल्या बुद्धीचा तरतरीतपणा दाखविण्याच्या भरांत वाटेल त्याला वाटेल त्या वेळीं आणि वाटेल तें बोलायचें? सारासार विचार म्हणून कसा तो नाहींच का? काय बोलावें याच्यापेक्षां जें मनांत येईल तें कसें बोलावें याचाच विचार करणें म्हणजे विचार झाला का? प्रसंगाच्या तव्रितेलाच शोभण्याजोगें बोलणें, बुद्धीची तीव्रता दाखविण्यासाठीं बोलायचें, एकमेकांच्या चढाओढीनें कोटिक्रम लढविण्यासाठीं तिसऱ्याच्या हृदयावर घाव घालायचे हाच तुमच्या बुद्धीचा, शहाणपणाचा आणि ज्ञानाचा सारांश वाटतें? सरळ साध्या संसारांत अष्टौप्रहर अशा आडव्यातिडव्या कोटिक्रमानें बोलण्याजोगे प्रसंगच कोणते आहेत असे? कुणाच्या मनाला दुखविल्यावांचून एकाद्या वेळीं सहजगत्या बोलण्यांत चटकदार कोटिक्रम होऊन गेला तर त्याची शोभा! पण सदानूकदा तोच प्रकार! आपलें बोलणें दुसऱ्याला पटलें नाहीं तर तें चांगल्या शब्दांनीं नीट समजावून द्यायचें का लागलीच त्याच्यावर निर्दय कोटिक्रम करीत सुटायचें? गळ्यांत सरी बसत नाहीं म्हणून मान कापून सरी बसवायची? नेहमीं असें बोलणें चांगलें का? आम्ही तुझ्या जिव्हाळ्याचीं माणसें, म्हणून तुझ्या बोलण्याचें कौतुक करीत आलों; पण लोक काय बोलतील अशा बोलण्यामुळें? हेंच म्हणतील कीं, श्रीमंत बापाची लाडानें शेफारलेली एकुलती मुलगी. घरांत वळण लावायला आई नाहीं, कुणी हटकायला नाहीं; तेव्हां बेफाटपणानें वाटेल तसें वागायला लागली, बेजबाबदारपणें बडबडायला शिकली, आणि स्वच्छंदी निघाली! आतांच पहा तुझ्या बोलण्यानें कशी वेळ आली आहे ती! माझे बाबा मला विहिरींत लोटायला तयार झाले, माझा संसार अशा पंथाला लागला, मनोहरांचा हिर-

मोड झाला, माझीं लहान लहान भावंडें संकटांत सांपडलीं ! पण मी तुला बोललें नाहीं; पण आज तुझ्या बोलण्यामुळें तुझ्या स्वतःच्या संसारांत दुःखाचा शिरकाव झाला, तुझ्या बाबांना जीव देण्याची पाळी आली, तुझें घनश्यामाशीं लग्न लावण्याची वेळ आली ! एक नुसतें बोलणें, लतिकाताई, बेजबाबदारपणाचें बोलणें नडतें आहे हें सारें !

**लतिका**—मालतीताई, किती किती कठोर बोलते आहेस तूं !

**मालती**—अजून कठोर बोलूं नको का ? अजून सुद्धां तुझी चूक तुला दाखवायला नको का ? तुला वेळेवर इतकें कठोर बोलायला माझ्याखेरीज दुसरें कोणीही नाहीं, पण पुढें तरी सावधगिरीनें वागायचें तुला समजायला हवें ना ? म्हणून, लाडके लतिकाताई, म्हणूनच बरें मी अशी निर्दयपणें तुझ्याशीं बोलतें आहें. पुन्हां एवढें मात्र लक्षांत ठेव कीं, आमच्या दुःखामुळें मी तुला बोललें नाहीं, तुझ्यासाठींच इतकें बोलण्याचा प्रसंग आला. ताई, मला क्षमा कर; पण केव्हां तरी तुला हें सांगणें भाग होतें.

**लतिका**–ताई, जा तूं आतां; मला एकटीला कांहीं वेळ बसूं दे.

**मालती**–जातें मी; पण रागाच्या भरांत—

**लतिका**–तुझ्या गळ्याची शपथ घेऊन सांगतें कीं, तुला भिण्याचें काहीं कारण नाहीं. पण तूं आधीं जा कशी ! मला अगदीं कोंडल्यासारखें झालें आहे.

**मालती**–(स्वगत) इंदुताईला बसायला सांगतें हिच्याजवळ जरा. (जाते)

**लतिका**–( काहीं वेळ गेल्यावर स्वगत ) मी अशीच्या अशी बहिरून तर गेलें नाहीं ना ? एकदम सारें सुन्न कां झालें ? 'श्रीमंत बापाच्या लाडानें शेफारलेली एकुलती मुलगी, घरांत वळण लावायला आई नाहीं, कुणी हटकायला नाहीं; तेव्हां बेफाटपणानें वाटेल तसें वागायला लागली, बेजबाबदारपणानें बडबडायला शिकली आणि स्वच्छंदी निघाली !' मालतीताई, मालतीताई एकदम इतकें सारें खरें कां ऐकवून गेलीस ? स्वच्छंदी, लाडानें शेफारलेली, वळण नाहीं, बेफाट, बेजबाबदार! लतिके, लतिके, काय तुझ्या नांवाची शोभा ही ! ( हातांनीं तोंड झांकून रडूं लागते. कांहीं वेळ गेल्यावर स्वगत ) असें रडून काय होणार! जन्मभर अशी रडत बसलें तरी काहीं होणार आहे का? कांहींच होणार नाहीं का? माझ्या बोलण्यानें ज्यांना धाईधाई रडत बसण्याची पाळी आली आहे त्यांच्या जन्माचा रडण्याचा पत्कर मीं एकटीनें घेतला तर

देव त्यांच्या नशिबींचें रडणें टाळणार नाहीं का ? पण नुसत्या माझ्या रडण्यानें काय होणार ? मग या सर्व जीवांच्या वरचें संकट टाळण्यासाठीं मी आतां करूं तरी काय ? (कांहीं वेळ स्वस्थ बसून) घनश्यामांना दीनपणें शरण जाऊं ? या दुखावलेल्या निर्दोष जीवांसाठीं त्यांच्याजवळ करुणा भाकूं ? हो, मानी लतिके, हो, याखेरीज दुसरा मार्गच नाहीं तुला. माझ्या बोलण्यानेंच घनश्यामांना दुखविलें, आणि म्हणूनच ते हट्टाला पेटले आहेत. आतां माझ्या बोलण्यानेंच सारें निस्तरायला हवें. घनश्यामांना शरण गेल्याखेरीज—घनश्यामांना शरण ! घनश्यामांना शरण ! देवा, देवा, काय ही वेळ आणिलीस माझ्यावर !

[ राग **भीमपलास**, ताल **त्रिताल** ]

**उलटा हा काळ कसा आला ।।धृ०।। शिर लत्तादानार्थ जयाचें । न पदस्पर्श्य गमे कधिं साचें । तच्चरणीं शिर वांकविणें अतिनम्रपणें ये दैवाला ।। १ ।।**

[ तोंड झांकून बसते. कांहीं वेळानंतर इंदु प्रवेश करिते. ]

**इंदु**—लतिकाताई, लतिकाताई, अशी काय बसली आहेस ? बसूं का जराशी तुझ्याजवळ ? कां आपली फटदिशीं रागावशील कीं अशी वेडीविद्री दिसतेस आणि जवळ कशाला बसतेस म्हणून ? मला तुझ्या बोलण्याची भारी भीति वाटते.

**लतिका**—( स्वगत ) माझ्या बोलण्याची भीति ! ज्याला त्याला माझ्या बोलण्याची भीति वाटते. पण आतां मलाच माझ्या बोलण्याची भीति वाटूं लागली आहे.

**इंदु**—ताई, बोलत कां नाहींस ?

**लतिका**—इंदुताई, आज माझें जरा डोकें दुखतें आहे.

**इंदु**—मग डोकें चेपूं का थोडा वेळ ?

**लतिका**—नको. हें पहा, अशीच जा आणि घनश्याम कुठें असतील त्यांना म्हणावें, मीं बोलावलें आहे, जरा येऊन जा. लवकर पाठवून दे त्यांना.

**इंदु**—बरें; पण डोक्यासाठीं कांहीं औषध आणूं का ?

**लतिका**—नको. ( इंदु जाते. स्वगत ) घनश्यामांच्या पायांवर डोकें ठेवणें हेंच औषध काय तें माझ्या कपाळीं आहे. घनश्यामांना मीं बोलवायला

पाठविलें खरें; पण हें कडू जहर औषध माझ्याच्यानें घेववेल का ? पण आतां नाहीं म्हणून कसें चालेल ? सुस्थितींतल्या उन्मादांतील बडबड या कालकूट औषधाखेरीज कमी व्हायची नाहीं. कोणत्या प्रसंगांत येऊन पडलें ही मी! दीन अनाथासारखें घनश्यामांना शरण जायचें ? सारा स्वाभिमान सोडून—पण हा कसला स्वाभिमान! ज्या स्वाभिमानानें स्वतःची उन्नति होण्याऐवजीं आसपासच्या जीवांची तिसऱ्याच्या हातीं पायमल्ली होते, तो कसला स्वाभिमान! शहाणपणाची दिवटी पाजळण्याच्या भरांत सर्वांच्या सुखाला आग लावली, आणि लाडक्या जीवांना आंच मात्र लागली! जळो तो माझा स्वाभिमान आणि जळो ती बुद्धिमत्ता! माझ्या बुद्धिमत्तेमुळें प्रिय-जनांवर संकटें आलीं! ही लतिका सर्वांच्या दुःखाला कारणीभूत झाली! अभि-मानी लतिके, दुसऱ्यांचे जीव तुझ्यामुळें पिळवटून निघत असतांही मनाचा पीळ उलगडून तुला तुझा निर्जीव स्वाभिमान सोडतां येऊं नये का ? इतकी सुद्धां उदारता तुझ्या ठिकाणीं नाहीं का ? नाहीं; हा भलता स्वाभिमान सोडून दिला! माझ्या जिभेला प्रायश्चित्त हें मिळालेंच पाहिजे. लतिका स्वतःच्या सुखासाठीं कांहीं स्वाभिमान सोडीत नाहीं, स्वतःच्या जिवाच्या भीतीनें अशी गाई-सारखी गरीब झाली नाहीं, तर केवळ माझ्या बोलण्यामुळें दुखावलेल्या जीवांना संकटमुक्त करण्यासाठी, माझ्या उद्दामपणामुळें सालस, निर्दोष प्रियजनांवर आलेली आपत्ति टाळण्यासाठींच मी स्वाभिमान सोडून घनश्यामांच्या चरणीं देह अर्पण करायला तयार झालें, याच गोष्टीमुळें मला आनंद वाटायचा नाहीं का ? या कल्पनेमुळेंच मला किती समाधान, किती आनंद वाटूं लागला आहे ! नुसता आनंदच नव्हे, तर मला यावेळीं अभिमानाचा आनंद वाटत आहे ! घनश्यामांशीं विवाह करून—घनश्याम! घनश्याम! घनश्याम! ज्यांच्या नांवाचा सुद्धां मनोभावानें तिटकारा केला त्यांच्याच नांवानें नटून पतिस्वरूपांत परमे-श्वर समजून त्यांची आजन्म पूजा तरी कशी करतां येईल मला ? त्यांचा मनो-मय द्वेष करीत रहाणें—पण स्त्रीधर्माला हें कसें शोभेल ? नाहीं; तसा प्रसंग आलाच तर त्यांच्यावर प्रेम करायला, भक्तिभावानें त्यांची पूजा करायला मला शिकलें पाहिजे. लतिके, आपल्यामुळें दुसऱ्यांना दुःखांत पाडण्यापेक्षां आपणच दुःखद्वेष पोटांत गिळायला तयार होणें बरें नाहीं काय ? देवा, देवापितरांच्या साक्षीनें लग्नाची माळ गळ्यांत घालतांक्षणींच पहिल्या तरळ स्पर्शामुळें माझ्या

हृदयाला एकदम इतका धक्का बसूं दे कीं, त्यासरशीं साऱ्या गेल्या गोष्टींची आठवण नाहींशी होईल, आणि पुनः डोळे उघडतांच मला घनश्यामांच्या मूर्तीच्या ठिकाणीं, देवा, तुझी प्रेमस्वरूप मूर्तिच दिसूं लागेल.

[ राग **बेहाग**, ताल **पंजाबी** ]

**सकल चराचरिं या तुझा असे निवास ॥ धृ० ॥ पाषाणाच्या असासि जरी मूर्तिमधीं । उपलहृदयिं वससि खास ॥१॥**

[ घनश्याम येतो. ]

**घनश्याम**—आपण पुनः मला बोलावणें पाठविलें ! मला तूर्त आपल्याला भेटण्याची किंवा आपल्यापाशीं बोलण्याची कांहींच गरज नव्हती. आलों म्हणून आलों झालें !

**लतिका**—आपल्याला तसदी दिल्याबद्दल क्षमा करा. आपल्याला माझ्याशीं बोलण्याची गरज नाहीं, पण आज मला आपणांशीं बोलण्याची गरज आहे.

**घनश्याम**—काय बोलणार आहां तुम्ही ?

**लतिका**—माझ्या सर्व प्रियजनांचे प्राण आपल्या हातीं आहेत हें मला माहीत आहे. माझ्या उद्दाम भाषणांमुळें खवळून आपण सर्वांचा छळ करण्यास तयार झालां आहांत. घनश्याम, आज आपल्यापुढें साग उद्दामपणा, सारा स्वाभिमान मीं सोडून दिला आहे. माझ्या निरपराधी प्रियजनांवर दया करा अशी आज मी तुमच्या चरणीं दीनपणानें याचना करीत आहें. माझ्या बोलण्याच्या प्रायश्चित्तासाठीं मी आपल्या देहाचें दान करायला तयार आहें.

**घनश्याम**—पण हें दान मी काय म्हणून घेत बसूं ? जें आज मला हातानें हिसकावून घेतां येतें त्याच्यासाठीं हात पसरण्याचें मला काय कारण आहे ? शिवाय आपल्या देहाचें दान कोणत्या नांवानें घेऊं ? भिक्षा म्हणून, जोगवा म्हणून कीं गोग्रास म्हणून घेऊं ?

**लतिका**—भिक्षा म्हणा, जोगवा म्हणा किंवा गोग्रास म्हणा; काय वाटेल तें म्हणा, पुनः पदर पसरून सांगतें कीं, मला माझ्या अपराधासकट पदरांत घ्या.

[ राग **पूर्वी**, ताल **त्रिताल** ]

**करिं याचना चरणांप्रती । अवमानुं ती नका ही हो**
**विनंति ॥धृ०॥ देहा या व्हा पाति । इष्ट त्या द्या गति ।**
**त्याची मज न क्षिति ॥१॥ मद्दोषाचे धनी । आप्त ते मानुनी ।**
**न छळा अदयमति ॥ २ ॥**

**घनश्याम**—पण मला वाटतें आपणांला पदरांत घेतलें तरी आपल्या हट्टी हृदयाचा तरी मला लाभ होणार नाहीं. आपण मला असें बजावून सांगितलें आहे. आपल्या मनाचा पीळ तसाच राहणार ! कालपर्यंत आपली कुरकूर चालूच होती ! हें मला कसें खपेल ? मी तर असा बेपर्वाईनें वागणारा ! पायांतली वहाण पायांतच बाळगणारा व्यवहारी मनुष्य मी ! आज आपले डोळे उघडल्यासारखे दिसतात ?

**लतिका**—कालच्या बोलण्याची मला क्षमा करा. नव्यानें पायमल्ली होऊं लागली म्हणजे मेल्या कातड्याची वहाणसुद्धां थोडी कुरकूर करिते; मग मी तर जित्या रक्तामांसाची मुलगी आहें ! मला पायांतली वहाण म्हणा किंवा कांही म्हणा ! नाहीं हो, लतिका इतकी दीन कुणापुढेंही झाली नाहीं, लतिकेनें स्वाभिमान सोडला नव्हता; पण प्रियजनांच्या सुखासाठीं मी वाटेल तो कमीपणा घ्यायला तयार झालें आहें. पायांतली वहाणच काय, पण माझ्या अपराधामुळें माझ्या निर्दोष प्रियजनांना आपण पायांखालीं तुडवून टाकूं नये म्हणून आपली पायधूळ व्हायलासुद्धां मी तयार आहें. माझ्या बोलण्यामुळें नाहक दुःख भोगणाऱ्या जीवांसाठीं मी स्वाभिमानशून्य झालें आहें. सांगा, घनश्याम, सांगा, तुम्हांला आणखी किती लाजिरवाण्यासारखी शरण येऊं ?

**घनश्याम**—आपल्या मनांतला खराखुरा पीळ अजून जसाच्या तसाच आहे. तुमच्याआमच्यासारखीं बाणेदार माणसें स्वतःच्या सुखदुःखांची फारशी पर्वा करीत नाहींत, हें मी स्वानुभवानें जाणतों. त्या दिवशीं सुद्धां आपला अभिमान आपल्या प्रियजनांना सुखी करण्याबद्दलच होता. आजही त्याच हेतूनें आपण या स्वार्थत्यागाला पिळदारपणानें तयार होत आहां. **लतिके**, तुझ्या प्रियजनांना सुखी व्हायला सवड करून देऊं काय ? नाहीं. स्वार्थ-

त्यागाचें हें अभिमानी समाधान मी तुला लाभूं देणार नाहीं. तुझ्या प्रियजनांच्या सुखाची माती माती केल्याशिवाय मी राहणार नाहीं.

**लतिका**—घनश्याम, घनश्याम, कांहो असे निष्ठुर होतां ? असा छळ कां करतां ? असें दुःख कां देतां ?

**घनश्याम**—गरजवंताला अक्कल नसते म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. आपल्याला माझ्याशीं बोलण्याची गरज आहे; पण बोलण्याची अक्कल मात्र नाहीं. मी असा निष्ठुर कां होतों, असा छळ कां करतों आणि असें दुःख कां देतों असें विचारतां होय ? शरम नाहीं वाटत असें विचारायला ? त्या दिवशीच्या आपल्या वाग्बाणांचा आपणांला विसर पडला वाटतें ? लतिके, बाण जिथून सुटतो तिथें त्याची कांहींच साक्ष रहात नाहीं; पण जिथें जाऊन भिडतो तिथें जखम होते, आणि जखम बरी झाली तरी कायमचा वण तरी राहतोच. कुठल्याशा आजारांत रोगी देहासाठीं वाटेल त्या दुसऱ्या जित्या मांसाचा पुरवठा केलेला चालतो म्हणतात; पण हृदयाची जखम भरून काढण्यासाठीं मात्र वैरी हृदयाच्याच तडफडत्या तुकड्यांची भर करावी लागते. त्या दिवशीं आपल्या शिकलेल्या कळपांतून एकाद्या नवशिक्या जनावराप्रमाणें माझी हकालपट्टी करितांना आपण कांहीं तरी विचार केला का ? असा काय मोठा अपराध केला होता मीं आपला ? मी हलक्या दर्जाचा असेन, सर्पाप्रमाणें दुष्ट असेन किंवा वाघाप्रमाणें क्रूर असेन; पण म्हणून मला सुखदुःखें, मनोवृत्ति हीं कांहींच नसतील का ? बेजबाबदार मुली, शस्त्रानें वाघाचे सुळे पाडतांना किंवा दगडानें सापाचें डोकें ठेंचतांना माणसाला काय वाटतें कीं त्या प्राण्यांना दुःखच होत नाहीं म्हणून ? अखेरच्या अवसानामुळें वाघाच्या सुळ्यांनीं त्या शस्त्राला करकोचे पडले किंवा दगडाला सापाच्या डोक्यांतलें विष लागलें तर त्याबद्दल जबाबदार कोण ? या प्रश्नाचा आपल्या मनाशीं नीट विचार करा, आणि मग मला आपले बेअकली प्रश्न करा.

**लतिका**—आपलें सारें बोलणें सर्वस्वीं मान्य आहे. मी आपल्याला अतिशय कठोर बोललें खरी; पण त्याबदल माझें मलाच शासन करा एवढीच आपल्याजवळ प्रार्थना आहे. बोलण्याबद्दल शासन त्या गरीब, सालस, निर्दोष माणसांना कां देतां ? माझ्या वडिलांनीं आपला काय अपराध केला होता ? मालतीनें आपल्या मनाला कधीं दुखविलें ? एकाच्या अपराधासाठीं दुसऱ्याला

शिक्षा करण्याचें काय कारण? आपले पाय धरतें, पण त्या बिचाऱ्यांना क्षमा करा.

**घनश्याम**—काळयाकुट्ट अंधाराप्रमाणें काळया अंतःकरणांतही अमक्या-तमक्याचा भेद उरत नाहीं; आणि धगधगीत निखाऱ्यावर पाणी टाकलें म्हणजे त्याचा सर्वस्वीं कोळसा होतो, पण तेजस्वी माणसाच्या आशेवर पाणी पडूं लागलें तर त्याचें अंतःकरण तेवढें काळें ठिक्कर पडतें; या दोन गोष्टींचा एका मेळानें विचार करा म्हणजे झालें! आणखी सांगू का एकाच्या अप-राधासाठीं दुसऱ्याला शिक्षा करण्याचें काय कारण तें? एकीला मागणीसाठीं विचारलेल्या प्रश्नांचीं दुसरीनें उत्तरें देत सुटण्याचें जें कारण तेंच!

**लतिका**—घनश्याम, इतकें आर्जवून जीव तोडून सांगितलें तरी तुम्हांला दयामाया कशी हो येत नाहीं?

**घनश्याम**—काय संबंध दयामाया येण्याचा? ज्या गोष्टीचा मला मुळींच अनुभव नाहीं तिचें मी दुसऱ्याला कसें प्रत्यंतर पटवून देऊं? कोणीं कधीं माझ्यावर दयामाया केली आहे म्हणून मोबदल्याखातर मी दुसऱ्यावर दया करूं? कोणत्या मनुष्यानें माझ्यावर निरपेक्ष, शुद्ध, असंबद्ध दया केली आहे? टीचभर उघड्यानागड्या देहाच्या देणगीखेरीज मानवजातीनें आजवर या एकलकोंड्या घनश्यामावर काय उपकार केले आहेत? जिथेंतिथें मला अनादर, तिरस्कार, साहाय्यशून्यता आणि परकेपणा यांचाच अनुभव येत गेला आहे. अनुदार वृत्तीच्या स्वार्थपरायण अशा या जगांत शुध्द स्वरूपाची दया कुठेंच पहायला मिळत नाहीं. स्वार्थनिरपेक्ष, हेतुशून्य दयेचा एक शब्द मला कुणीं दिला असता तर मी त्याचा सात जन्मांचा ऋणी होऊन बसलों असतों. नाहीं, घनश्यामाला अजून कुठें अशी दिव्य दया दिसली नाहीं. बापानें मुलाला पोसायाचें, आईनें मुलीला जपायचें किंवा नवऱ्यानें बायकोला नटवायची ही काय निरपेक्ष दया झाली? स्वार्थासाठीं एकमेकांना साह्य करायचें, सुखाच्या वेळीं नांवलौकिकासाठीं दुबळ्यांना हात द्यायचा, हीं दयेचीं दरिद्री सोंगें आहेत. माणसाची मादी आपल्या भुकेल्या पिलांना दूध पाजते, आणि राक्षसीण काय आपल्या पोरांचा फराळ करून आपली भूक भागविते? मग एकीला राक्षसवृत्ति कां म्हणायचें, आणि दुसरीला माणुसकीचा दाखला कां द्यायचा? लतिके, दयामाया हे सारे शब्द रिकामटेकड्या भाषापंडितांनीं

कोणाच्या खोगीरभरतीसाठीं तयार केले आहेत. जगाच्या बाजारांत निर्व्याज दयेची हुंडी ओळखीवांचून व्यवहारी मनाला पटत नाहीं.

**लतिका**–घनश्याम, तुम्ही अलौकिक बुद्धीचे पुरुष आहांत. अशी निरपेक्ष दया जगाला अजून दिसली नसेल तर तुम्ही दाखवा, आणि या पहिल्या यशाचे भाग्यशाली अधिकारी व्हा. घनश्याम, क्षमा करा, दया करा! माझ्या प्रिय आप्तांच्या सुखासाठीं, बेजबाबदार बडबडण्याच्या प्रायश्चित्तासाठीं, हें पहा, तुमच्या पायांवर मी मस्तक ठेवतें. घनश्याम, माझ्या दीन दुबळ्या दुनियेकडे दयार्द्र दृष्टीनें पाहिल्यावांचून मी तुम्हांला जाऊं देणार नाहीं. तुमच्या हृदयाला दयेचा पाझर फुटेपर्यंत तुमच्या चरणांवरचा हा अश्रूंचा अभिषेक मी थांबविणार नाहीं. [ त्याला नमस्कार करते ]

**घनश्याम**—असल्या बेवकूब सोंगानें मी फसायचा नाहीं. माझ्या हृदयाला पाझर! हृदयाची क्रिया बंद पडल्यामुळें मनुष्य ताबडतोब मरतो, हा वैद्यशास्त्रांतला सिद्धांत माझ्या बाबतींत सर्वस्वीं चुकीचा ठरलेला आहे. हृदयाची क्रिया तर काय, परंतु मला मुळीं हृदयच उरलें नाहीं. बुद्धिमत्तेच्या विजयांतच सुख मानायची पहिल्यापासून संवय लागल्यामुळें, विचाराप्रमाणेंच माझे विकार, इच्छा, भावना यांचा उद्भवही माझ्या बुद्धिप्रधान मस्तकांत होत असतो; आणि त्या मस्तकाचा अंत आपणांला कधींच लागायचा नाहीं. आपला नुसता हात धरल्यामुळें आपलें हृदय ज्याप्रमाणें माझ्या हातीं लागल्यासारखें नाहीं, त्याप्रमाणें नुसते माझे पाय धरल्यामुळें आपल्याला माझें मस्तकही मिळायचें नाहीं; कारण हातापासून हृदय दोनच हात दूर असेल तर पायांपासून डोकें साडेतीन हात अंतरावर असतें! लतिके, ज्या तोंडानें हे अकलेचे तारे तोडीत होतीस, त्याच तोंडाला असे खडे चारतांना मला कल्पांतापर्यंत सुद्धां दया येणार नाहीं. लतिके, जातों मी. [ जातो ]

**लतिका**—[ उठून स्वगत ] हृदयाच्या चिंधड्या आणि मनाची माती करून घेऊन असें खडतर प्रायश्चित्त जीवाभावानें भोगलें, पण व्यर्थ गेलें. पण सर्वस्वीं व्यर्थ गेलें का? नाहीं. केलेली तपश्चर्या कां म्हणून फुकट जाईल? या प्रायश्चित्तामुळें माझ्या मनाला तरी किती समाधान वाटतें आहे! माझ्यामुळें दुखावलेल्या जीवांच्या सुटकेसाठीं जितकें करतां आलें तितकें मी केलें. माझ्या प्रामाणिक प्रयत्नाला यश आलें नाहीं ही परस्वाधीनची गोष्ट आहे.

अभिमानाच्या भरांत घनश्यामांना दुखविलें आणि त्यामुळें सर्वांना संकटांत लोटलें. आज अभिमान सोडून देऊन घनश्यामांच्या जवळ मोकळ्या मनानें क्षमा मागून आणि सर्वांच्यासाठीं दीनवाणी करुणा भाकून माझ्या बेजबाबदार पातकाच्या ओशाळवाण्या ऋणांतून मी मुक्त झालें. आतां उघड्या डोळ्यांनीं देवाच्या मूर्तीकडे पाहून त्याच्याजवळ दयेची याचना करण्याचा माझ्या मनाला अधिकाराचा धीर आला. देवा, अजून–अजून किती अंत पाहातां? लतिकेनें आणखी किती प्रायश्चित्त भोगायला पाहिजे? प्राणिमात्र परमेश्वराचें स्वरूप असतें असें म्हणतात; मग देवा, अजूनही माझ्यापुढें या घनश्यामाच्या निर्दय अवतारानें कां उभे रहातां? अनंतस्वरूप लीलावतारी परमेश्वरा, या दीन हीन लतिकेला एकाद्या प्रेममय, दयाशील, सौम्य स्वरूपांत दर्शन कां देत नाहीं? आपल्या इतक्या प्रेमळ दर्शनांपैकींच एखादें दर्शन या लतिकेला द्या.

[ प्रभाकर येतो ]

**प्रभाकर**—[ स्वगत ] त्या गवयाची लबाडी सांगण्यासाठीं लतिकेशीं बोलावें कीं नाहीं? पुष्कळ विचार करून सुद्धां ठाम निर्णय होत नाहीं. बोलावें झालें. [ पाहून उघड ] लतिके, लतिके! ( ती रडूं लागते ) लतिके, लता, हें काय? रडायला काय झालें असें एकदम?

**लतिका**—आज हा रडका दिवस कुठून उगवला आहे कुणास ठाऊक!

**प्रभाकर**—पण असें दिवसभर रडत बसण्यासारखें संकट तरी तुझ्यावर कोणतें आलें आहे? आणि कांहींही झालें असलें तरी तें आपल्या माणसाजवळ सांगायला नको का?

**लतिका**—क्षमा करा, प्रभाकर! मीं सर्वांचाच अपराध केलेला आहे; पण त्यांतल्या त्यात तुमची तर मी फारच अपराधी आहें. प्रभाकर, आजवर तुम्हांला प्रेमाचीं अगदीं वेडीं वचनें देऊन आज मी तुमचा विश्वासघात केलेला आहे. प्रभाकर, माझ्या बेजबाबदार बडबडण्यामुळें माझ्या प्रियजनांवर आलेलीं संकटें दूर करण्यासाठीं, त्यांचे गुंतलेले गळे सोडविण्यासाठीं, अगदीं नाइलाज होऊन मीं माझा देह विवाहाच्या वचनानें दुसऱ्याच्या चरणीं अर्पण केला आहे. या पापिणीनें आपणां दोघांचाही पूर्ण प्रेमभंग केलेला आहे. प्रभाकर, तुमचा असा विश्वासघात करण्यापूर्वी मीं तुम्हांला नुसतें एका शब्दानें कळविलें सुद्धां नाहीं. प्रभाकर, माझ्या बाळपणापासूनच्या जिवलग मित्रा! अशा विश्वास-

घातकी, प्रेमपातकी लतिकेची यापुढें साध्या आदरानें तरी आठवण करणें शक्य आहे का? प्रभाकर, मी तुम्हांला काय तोंड दाखवूं? माझ्या नांवाचा सुद्धां तुम्ही तिटकारा करायला लागाल.

**प्रभाकर**—मुळींच नाहीं. तूं काय म्हणतेस हें मला जरी स्पष्टपणें कळलेलें नाहीं, तरी तूं हा स्वार्थत्याग आपल्या प्रियजनांसाठीं करीत आहेस; लतिके, यामुळें तुझ्याबद्दल मला तिटकारा न वाटतां उलट आदरपूर्ण अभिमान वाटेल! भावी कालीं संसारांत संन्यस्त वृत्तीनें कधीं काळीं फिरतांना तुझ्या घरावरून जाण्याचा प्रसंग आला, तर माझ्या शेजारून येणाऱ्या जाणाऱ्या अनोळखी मनुष्याला सुद्धां क्षणभर थांबवीन. तुझी मूर्ति दाखवून त्याला आपल्या प्रेमभंगाची सर्व कथा सांगेन. 'या सर्वगुणसंपन्न प्रेमळ बाळेनें केवळ आपल्या प्रियजनांच्या संसाराच्या सुखासाठीं आपल्या बाळपणापासून रचित आणलेली प्रेमाच्या संसाराची मांडणी धैर्यानें आपल्या हातानें मोडून टाकिली! प्रियजनांसाठीं हिनें स्वतःच्या सुखावर पाणी सोडलें!' थांबविल्याबद्दल शेवटी क्षमा मागून शेवटीं त्याला अभिमानानें सांगेन कीं, ही माझ्या प्रेमाची निवड होती! लतिके, दुर्दैवाच्या ताब्यांत सांपडलेल्या या जगांत मनोभंग, प्रेमभंग आणखी आशाभंग या गोष्टी अगदीं साहजिक होऊन बसल्या आहेत. या चंचल जगांत प्रेमाचे खेळ इतक्या तीव्र त्वरेनें चालत असतात कीं, कधीं कधीं पहिल्या चुंबनानें रंगलेले गाल तत्क्षणींच शेवटच्या विरहाच्या अश्रूंनीं धुवून टाकण्याची पाळी येते. लता, सौंदर्याचा प्रत्यक्ष लाभ होणें हें तर या जगांत अतिशय विरळा आहेच; परंतु खऱ्या सुंदर वस्तूंची मार्मिकपणानें पारख करण्याचें भाग्यसुद्धां फार थोड्यांच्या कपाळीं असतें. स्वार्थत्यागानें जरी तूं मला अंतरलीस तरी निवडीबद्दल मला अभिमान वाटत राहील!

[ राग **काफी**, ताल **त्रिताल** ]

**धन्यता गणीं। त्या सुखीं जें मल्ललाटीं॥ धृ०॥**
**उज्ज्वलादिव्यरूपगुणमंडित मिळत रत्न निरखावया। मूल्य तयाचें पारखण्याचें भाग्य थोर लाधेहि या। समाधान यांताचि या हृदया। तिळ न विषाद शिवे तया। विलसें तें जरि अन्यशिरोहृदिं, उक्ति मानिं नच खोटी॥ १॥**

पण लतिके, सर्व दृष्टीनें विचार करूनही हा स्वार्थत्याग अवश्यच आहे का? या संकटावर कांहीं उपाय नाही का ?

**लतिका**—नाहीं हो; आपल्या त्या दिवशींच्या बेजबाबदार बडबडण्या-मुळें बाबा इतक्या संकटांत सांपडले आहेत कीं त्यांची इच्छा नसतांना ते मला परक्याच्या पदरीं बांधायला तयार झाले आहेत.

**प्रभाकर**—( स्वगत ) मोरेश्वराला त्या दिवशीं वाटेल तें बोलतांना मला सुद्धां वाटतच होतें, कीं यानें हें आपल्या बापाला सांगितलें तर त्याचा परि-णाम ठीक लागणार नाहीं म्हणून. अर्थातच, मुलाच्या झालेल्या अपमानामुळें त्याच्या बापानें आपल्या भागीदाराला आपल्या मुलाला मुलगी न दिल्यास सारीं कुलंगडीं निर्दयपणानें बाहेर काढण्याची भीति घातली असेल. पेढींच्या बाबतींत धनेश्वरकाकांच्याबद्दल बोभाटा आहेच. ( प्रगट ) लतिके, या संक-टाला दुसरा कोणताही उपाय नाहींच का ?

**लतिका**—अगदीं कोणताही नाहीं. घनश्यामांनीं बाबांना काय दहशत घातली आहे न कळे, कीं ते अगदीं आत्महत्येपर्यंत—

**प्रभाकर**—घनश्याम ! यांत घनश्यामाचा काय संबंध ?

**लतिका**—मग हीं संकटें कोणीं आणलीं असें तुम्ही समजतां ? आपल्या दोन्ही घरांना-तुम्हांला कसें कळलें नाहीं कुणास कळे ! घनश्यामच अशी आग लावायला तयार झाले आहेत.

**प्रभाकर**—अस्सें ! जरा थांब. माझी खात्री नसली तरी खात्रीचा तर्क तरी खास, कीं घनश्यामानें आणलेल्या या संकटांना दूर करण्यासाठीं देहार्पणाखेरीज दुसरा इलाज खात्रीनें आहेच आहे. लतिके, त्या आंधळ्या कानड्याच्या पोटांत शिरण्याची कांहीं युक्ति आहे का ?

**लतिका**—त्यानें काय होणार ?

**प्रभाकर**—नीट आठवण कर. धनेश्वरकाकांनीं मराठी माणसांना बंदी केली. त्याच्या दुसऱ्याच दिवशीं मी आणि तो कानडी आंधळा दोघेही तुमच्या घरीं आलों. प्रेमाच्या उतावळेपणामुळें आणि उपजत उतावळ्या स्वभावामुळें माझें येणें स्वाभाविक होतें. पण मला सांग, घनश्याम अशा पडत्या फळाच्या आज्ञेनें दुसऱ्याच दिवशीं त्या आंधळ्याला कां घेऊन आला ? त्या आंधळ्याला गुजराथी येतें हें घनश्यामाला माहीत होतें, एवढयावरून घनश्यामाची आणि

त्याची थोडी तरी पहिली ओळख शावीत होते. आतां दुसरी गोष्ट. बिंदुताईनें मला खात्रीनें सांगितलें कीं, त्याला मराठी चांगलें येतें आणि तो आंधळाही नाहीं म्हणून. घनश्यामानें धनेश्वरकाकांना बजावून सांगितलें होतें कीं, याला मराठी येत नाहीं म्हणून. तिसरें, हा तोतया आंधळा घरांत आल्यापासून थोड्याच दिवसांनीं हा प्रकार सुरू झाला. या सर्व गोष्टींच्या एकदम मिश्रणानें अनुमान काढ पाहूं? सरळ सरळ एवढ्याच गोष्टी निघूं शकतात कीं, हा गवई आंधळा नाहीं, याला मराठी येतें हें सारें घनश्यामाला माहीत आहे, घनश्यामानें धनेश्वरकाकांना पेंचांत आणिलें तें याच्या मदतीनें. म्हणून म्हणतों कीं, आंधळ्याचा अंत लागला, तर काकांच्यावर घनश्यामानें आणलेल्या संकटाचें स्वरूप खात्रीनें लक्षांत येईल. त्याला मनमोकळेपणानें बोलावयाला लावणें शक्य आहे का?

**लतिका**—इतकी सोपी गोष्ट दुसरी कोणतीच नाहीं. तें माझ्याकडे लागलें.

**प्रभाकर**—तर मग याच पावलीं त्याच्याकडे जा. चल, सगळी हकीगत मला स्पष्टपणें सांग. मालतीताई किंवा मनोहर यांना यापैकीं कांहीं माहीत आहे का?

**लतिका**—मालतीताईला माझ्यापेक्षां या सगळ्या गोष्टींची जास्त माहिती आहे.

**प्रभाकर**—मी तिला बोलावावयाला पाठवितों. आधीं त्या गवयाकडे चल. लतिके, वेळ मुळींच घालवूं नको. [ जातात ]

---

# प्रवेश चौथा.

[ स्थळ—**धनेश्वराचें** घर. पात्र—**महेश्वर** बसलेला.]

**महेश्वर**—(स्वगत) कंटाळा आला बुवा या आंधळेपणाचा! या जगांत खरेंखुरें आंधळें असून वावरतां येत नाहीं. डोळस असलें तर डोळसाप्रमाणेंच नेहमीं वागणें हें त्याहीपेक्षां कठिण जातें. पण डोळे असून आंधळ्याप्रमाणें वागणें हें शिकंदर काम आहे. नकली आंधळेपणाची खात्री किती ठिकाणी पटवून द्यावी लागते! काल दुपारींच तो बिचारा म्हातारा नोकर निजला होता.

आंधळेपणा शाबूत करण्यासाठीं मला त्याच्या पोटावर पाय देऊन पुढें जाण्याचा प्रयत्न करावा लागला! बाकी आम्हीं नोकरांनीं एकमेकांच्या पोटावर पाय आणण्याचा प्रयत्न केला तर गैरशिस्त नाहींच म्हणा! बरें, हें झालें; शिवाय कांचसामानाशीं किती लीला करावी लागते त्याची मोजदादच नाहीं. जमिनीवर असलेले बहुतेक कांचेचे पदार्थ मला पायांनीं जमीनदोस्त करावे लागले. माझी नजर आतां धनेश्वराच्या त्या आरशीवर आहे. (पाहून) अरे बापरे, ही लतिका आली वाटतें! चला, डोळे बंद!

[लतिका येते. महेश्वर तंबोऱ्याशीं कारभार करतो.]

**लतिका**—गवईबुवा, तो तंबोरा ठेवा खालीं. तुमची माझ्याबद्दल सहानुभूति आहे म्हणतां, मग हें आंधळ्याचें सोंग कां चालू ठेवलेंत माझ्यासमोर? इंदुताईकडून मला कळलें कीं, तुम्हांला मराठी चांगलें येतें; आणि बिंदुताईनें मला सांगितलें कीं, तुम्ही डोळस आहां म्हणून. अशी प्रतारणा कां करतां? उघडा डोळे एकदम!

**महेश्वर**—(स्वगत) अखेर या दोघी कारट्यांनीं या कानापासून त्या कानापर्यंत गळा अगदीं साफ कापला!

**लतिका**—उघडतां ना डोळे?

**महेश्वर**—तुम्हांला फसविल्याबद्दल क्षमा करा. हे पहा उघडले डोळे! (डोळे उघडतो. पाहून) पण हें काय, लतिकाबाई? तुमचे डोळे किती तांबडेलाल झाले आहेत! एखाद्याला वाटेल कीं, सगळा दिवसभर आज तुम्ही रडत होतां म्हणून.

**लतिका**—खरोखरीच मी रडत होतें. माझ्या बाबांच्यावर आणि स्वतः माझ्यावर घनश्यामांनीं इतकीं संकटें आणलीं आहेत कीं, नकोसें झालें आहे; आणखी या कामांत तुम्हीं त्यांना साह्य करतां आहां!

**महेश्वर**—लतिकाबाई, मी तुमच्याजवळ खोटें बोलत नाहीं; तुम्ही म्हणतां तें खरें आहे. तुमच्यावर घनश्यामांनीं संकट तरी काय आणलें आहे?

**लतिका**—महेश्वर, काय सांगूं तुम्हांला? बाबांना कसलीशी भीति घालून घनश्यामांनीं त्यांना असा गळ घातला आहे, कीं माझें बाबांनीं घनश्यामांशीं लग्न लावून द्यावें; आणि हें लग्न सुद्धां दोन दिवसांच्या आंतच घडवून आणण्याचा कृतनिश्चय झालेला आहे.

**महेश्वर**—घनश्याम स्वतःच तुमच्याशीं लग्न करणार आहे? तुमची खात्री आहे?

**लतिका**—क्षणभरांत वाटेल तर तुमची सुद्धां खात्री करून देईन.

**महेश्वर**—( स्वगत ) ठीक. घनश्यामानें माझा उपयोग तर चांगला करून घेतला! आंधळ्यानें पीठ दळण्यापैकींच हा प्रकार झाला! पण यापुढें असल्या मनुष्यासाठीं या बिचाऱ्या सद्‌गुणी कुटुंबाशीं दगलबाजी करीत बसण्याचें मला काय कारण आहे? [ प्रभाकर येतो ] ( उघड ) बरें, लतिकाबाई, आतां मला सांगा, माझ्याकडून तुम्हांला काय साह्य हवें? मात्र माहिती देण्यापलीकडे माझ्याकडून आपल्याला फारशी मदत होणार नाहीं.

**प्रभाकर**—मी—तुमचें खरें नांव काय?

**महेश्वर**—महेश्वर.

**प्रभाकर**—महेश्वर, मी लतिकेच्या अगदीं विश्वासांतलाच आहें. माझ्याशीं तितक्या मनमोकळेपणानें बोलायला कांहीं हरकत नाहीं. प्रथम हें सांगा, घनश्यामानें तुम्हांला या घरांत आणल्यानंतर तुमच्याकडून कामगिरी करून घेतली काय, आणि धनेश्वरकाकांना घनश्यामानें पेंचांत तरी कोणत्या पकडलें आहे?

**महेश्वर**—इथें आल्यापासून त्यानें मजजवळून एकच काम करून घेतलें; आणि तें म्हणजे काकासाहेबांच्या खाजगी कागदांतले कांहीं कागद चोरणें हेंच होय. माझी समजूत अशी आहे कीं, त्या कागदांतच सर्व कांहीं आहे.

**प्रभाकर**—कशावरून?

**महेश्वर**—ही चोरी करण्यापूर्वी मीं जेव्हां आपल्याला किंचित् भीति वाटल्यासारखें दाखविलें, तेव्हां त्यानें मला तीनतीनदां बजावून सांगितलें कीं, कागद हस्तगत होईपर्यंतच काय ती तुला भीति आहे. एकदां कागद आपल्या हातीं आल्यानंतर आपली चोरी राजरोस उघडकीला आली तर त्यापासून आपल्याला कांहीं एक भय नाहीं. यावरून मला वाटतें कीं ते कागदच सर्व भानगडीच्या मुळाशीं असले पाहिजेत. ह्या कामगिरीबद्दल माझा लतिकाताईशीं विवाह लावून देण्याचें त्यानें मला वचन दिलें होतें; आणि मी सुद्धां मूर्खाप्रमाणें फसून शेवटीं चोरी करायला तयार झालों. स्वार्थामुळें मनुष्य अगदीं आंधळा होता तो असा!

**प्रभाकर**—कागदाबद्दलचा तुमचा तर्क अगदीं बरोबर आहे. लतिके, तुझ्या सगळें लक्षांत आलें असेलच !

**लतिका**—हं ! मला ही धास्ती पहिल्यापासून होतीच.

**प्रभाकर**—महेश्वर, एवढ्यामुळें सगळ्यांची सुटका होत नाहीं. काय करावें आतां ? धनेश्वरकाकाच जर कागद चोरीस गेल्याबद्दल बोभाटा करीत नाहींत तर आपणांला तरी कसा करतां येणार ? घनश्यामाचें दुसरें एखादें कुलंगडें हुडकून काढण्याशिवाय इलाज नाहीं.

**महेश्वर**—मी सांगतों आणखी एक. पोलिसाचा वेष घेऊन एकदां यानें धुंडिराज नांवाच्या वृद्ध गृहस्थाजवळून असाच एक कसलासा कागद लिहून घेतला आहे.

**प्रभाकर**—धुंडिराज ? म्हणजे काकासुद्धां घनश्यामाच्याच पेंचांत सांपडले आहेत तर ? लतिके, फार गोष्टी उघडकीला येतीलसें वाटतें. महेश्वर, या माहितीचा मात्र उपयोग होण्यासारखा आहे खास. पोलिसाचा वेष घेऊन हिंडणें हा चांगलाच सरकारी गुन्हा आहे. पण त्या वेषांत तरी त्याला आपल्याला पुन्हां कसें पकडतां येईल ? कारण मागच्या वेळच्या गोष्टीचा आपल्याला कांहींच उपयोग होण्यासारखा नाहीं; तिथें काका संकटांत पडण्याची धास्ती वाटते. [ घाईनें मालती येते ]

**मालती**—बघितलेंस, लतिकाताई ? तुझ्या वडिलांनीं आत्महत्येची आजच तयारी केली आहे. ( थबकत ) कारण हें बघ त्यांनीं आपलें मृत्युपत्र तयार करून ठेवलें आहे, आणि माझ्या बाबांना ट्रस्टी नेमलें आहे. मृत्युपत्रावर तारीख आजचीच आहे. लतिकेला संभाळा हें मात्र मला आणखी बाबांना ते मधून मधून सारखे काकुळतीनें सांगत होते. आजची रात्र त्यांच्यावर अंगदीं सारखी नजर ठेवली पाहिजे.

**प्रभाकर**—( क्षणभर विचार करून एकंदम ) ताई, खरोखरीच आत्महत्या करणार आहेत का आज धनेश्वरकाका ? अहो महेश्वर, आत्महत्या करून धनेश्वर आज आपल्या हातून कायमचे जात आहेत असें जर घनश्यामाला खात्रीपूर्वक कळलें, तर तो कांहीं तरी उपायानें आत्महत्या थांबविण्याकरितां पुन्हां पोलीसवेषांत येईल का ? कठिण आहे. नेमका पोलीस वेषांतच कां यावा ?

**महेश्वर**–तो मी आणतों. तें काम माझ्याकडे लागलें. त्याला असल्या गाष्टीची फार हौस आहे. पण त्यानें होणार काय?

**प्रभाकर**––आपण खरोखरीच्या फौजदारांना आणून ठेवावें, आणि आत्महत्येच्या ऐन वेळीं घनश्याम काकांना पकडण्यासाठीं पोलीसवेषानें पुढें आला म्हणजे त्याला फौजदारसाहेबांच्या ताब्यांत––द्या–वा; तसें नाहीं; त्यानें घनश्याम पोलीसताब्यांत सांपडेल खरा, पण काका मात्र आत्महत्येच्या प्रयत्नाबद्दल खोटया पोलिसाऐवजीं खऱ्या पोलिसाच्या हातीं खरोखरीच सांपडतील. मोठीच पंचाईत आहे.

**लतिका**––ती नाहीं पंचाईत इतकी. त्याचा उपाय मी सांगतें. हं, ऐका. (मालतीच्या कानांत कांहीं सांगते) अन् आयत्या वेळीं सांगावें कीं सरबत आहे म्हणून. यांत कठिण काय आहे?

**प्रभाकर**––जमली तर ठीक आहे ही युक्ति! बरें, पुन्हा मोठी अडचण आलीच. अशानें काका सुटले आणि एकटा घनश्याम सांपडूं लागला तर तो जिवावर उदार होऊन त्वेषानें काकांना गुंतविण्यासाठीं ते कागद पुढें करील. छेः, ते कागदच हातीं येईपर्यंत घनश्यामाशीं वैर करण्यांत कांही अर्थ नाहीं.

[मनोहर येतो व डबा पुढें ठेवतो]

**मनोहर**––हा पहा एक चमत्कार! या चमत्काराचा जन्म स्मशानांत दगडाच्या पोटीं झाला!

[प्रभाकर, मालती, लतिका डबा उघडून पाहातात व कागद वाचतात]

**महेश्वर**––हेच ते कागद. अन् तो दुसरा जो कागद तो धुंडिराजाजवळून पोलीसवेषांत लिहून घेतलेला.

**प्रभाकर**––सगळेंच काम झालें. पण कागद सगळे आहेत कां हो? दम द्या. (मोजतो. मोजून झाल्यावर) का हो महेश्वर, किती होते कागद?

**महेश्वर**––एकवीस.

**प्रभाकर**–बरोबर एकवीसच आहेत. मनोहर, हा परमेश्वर तुला कुठें पावला! एका झटक्यासरशीं सर्वांचीच संकटांतून मुक्तता झाली. आतां असें करा.

**लतिका**––थांबा आधीं. मालतीताई, तूं बाबांच्यावर नजर ठेव; आणि बाबा काय काय आणतात, कुठें कुठें ठेवतात त्याच्यावर अगदीं सूक्ष्म दृष्टीनें पहारा ठेव.

**प्रभाकर—**महेश्वर, तुम्ही घनश्यामाला पोलीसवेषांत आणण्याची खटपट करा, अन् काय होतें तें ताबडतोब कळवा.

**लतिका**—अन् नंतर मला येऊन भेटा. आणखी एक काम आहे तुमच्याकडे!

**प्रभाकर**—मालतीताई, महेश्वर, आतां वेळ दवडूं नका. आपापल्या कामाला लागा. केवढा सोन्याचा दिवस दाखविला परमेश्वरानें!

**लतिका—**जगन्नाथ, तुझी कोणत्या शब्दानें स्तुति करूं?

[ राग **हिंडोल**, ताल **त्रिताल** ]

स्तव तुझा न करूं शकें। पडताति कोश रिते फिके ॥धृ०॥
तव गुणकीर्तनिं। हतबल सुरमुनि। पटु मति थके।
रसनाहि सुके॥ १॥

[सर्व जातात. पडदा पडतो]

# अंक पांचवा

## प्रवेश पहिला

[ स्थळ—**धनेश्वराचें** घर. पात्रें —**इंदु** व **बिंदु** ]

**बिंदु**—अग, तो म्हातारा शास्त्री मेला कुठें काळेंच करून गेला म्हणे! त्यानें आणाशपथा वाहिल्या होत्या ना चांगल्या! पुरुष हे असेच !

**इंदु**—अग, तो तसाच लबाड होता. आणि दिसायचा तरी किती वाईट, नाहीं ? काय त्याचें तें रूप !

**बिंदु**—अग, रूपाचें राहुं देत. नसतें एकाद्याला चांगलें रूप ! तुझें कुठें अगदीं वायां चाललें आहे ?

**इंदु**—अन् तूं अगदीं पद्मिणीसारखी असशील ? साती अप्सरा ओंवाळून टाकाव्या तुझ्यावरून ! दुसऱ्याचें बरें बघवत नाहीं तर आपले डोळे फोडून घ्यावेत; लोकांना कां नांवें ठेवावीं ?

[ महेश्वर—आंधळा प्रवेश करतो ]

**बिंदु**—तूंच घे आपले डोळे फोडून ! जोडी तरी चांगली शोभून दिसेल त्या आंधळ्या गवयाची आणि तुझी ! तो बघ, आलाच.

**इंदु**—( महेश्वरास ) अहो कामण्णा, तुम्ही असे एकटे कां हिंडतां ?

**बिंदु**—कुणाला सांगावें रस्ता दाखवायला ?

**महेश्वर**—( स्वगत ) गांठलें या काळ्या पोरींनीं ! बाकी लतिकेचा आधार असल्यावर आतां या दोघींची पत्रास ठेवायला नको. ( उघड ) तुम्ही अहांतच ना दोघी ?

**बिंदु**—(स्वगत) आज यांना अखेरचें विचारतें; नाहीं तर टाकतें सांगून सगळ्यांना यांचें चरित्र ! ( उघड ) तुमच्या वचनाची तुम्हांला आठवण आहे ना ?

**इंदु**—बिंदुताई, लागलीस चोमडेपणा करायला ! नका बोलूं हो तुम्ही तिच्याशीं

**महेश्वर**—तुझी आज्ञा मला मान्य आहे.

**बिंदु**—तिच्याशींच नका बोलूं तुम्ही.

**महेश्वर**—तुझी आज्ञा मला मान्य आहे.

**बिंदु**—म्हणजे काय हें? दोघींशींही बोलणार नाहीं तुम्ही? त्सें नाहीं, कुणा तरी एकीशीं बोललें पाहिजे.

**महेश्वर**—'तसें नाहीं, कुणा तरी एकीशीं बोललें पाहिजे!' पण ती एक कोणती हें नक्की करा ना एकदां! हें बघा, मी एकादा स्वयंवराचा पण लावूं का? जी आधीं पृथ्वीप्रदक्षिणा करून येईल तिच्याशीं मी लग्न करीन.

**इंदु**—हें काय कांहीं तरी बोलणें?

**महेश्वर**—तर काय करायचें! मी आपला उगीच पहातों आहें नुसती गंमत! तुम्हांला कांहीं दयामाया, विचार, कांहीं आहे कीं नाहीं? तरुणांना जीवच नसतो कीं काय? पुष्कळ ऐकून घेतलें तुमचें! आतां चला, दोघीही एकदम चालत्या व्हा पाहूं! होतां कीं नाहीं? चला एकदम! त्रास नाहीं तर!

**इंदु**—असे निष्ठुर होऊं नका हो! माझ्या डोळ्यांतल्या गंगायमुना तुम्हांला दिसत नाहींत का?

**महेश्वर**-(डोळे मिटून इंदूस) कशा दिसतील? अग, मी आंधळा आहें ना? डोळे मिटून पुरांत जीव द्यायचा नाहीं ना?

**बिंदु**—माझ्या डोळ्यांतल्या गंगायमुना तरी दिसत आहेत ना?

**महेश्वर**—(डोळे उघडून बिंदूस) तुझ्या गंगायमुना दिसताहेत. पण उघड्या डोळ्यांनीं आगींत उडी टाकावयाची नाहीं ना? मी आंधळा का आहें?

**इंदु**—आंधळे नाहीं मग डोळस का आहां?

**बिंदु**—(स्वगत) पुष्कळ धीर धरला; आतां आंधळेपणाचें गुपित फोडल्याखेरीज यांच्या डोळ्यांत अंजन पडायचें नाहीं. (उघड) अग इंदुताई, यांचें खरें रूप तुला ठाऊक नाहीं. कायसें म्हणतात ना दाखवायचे दांत निराळे, तशांतला यांचा लपंडाव आहे सारा! यांचे दाखवायचे डोळे निराळे आहेत आणि पहायचे डोळे निराळे आहेत! हे कांहीं खरेखुरे आंधळे नाहींत. चल, आतां हा प्रकार काकांच्या नजरेला आणूं, म्हणजे यांचे डोळे चांगले उघडतील.

**महेश्वर**—चला, जा. आतां मला सत्पक्षाचा जोर आहे. आतां तुम्हां दोघींकडे पहाण्याचा दृष्टिकोन मीं बदललेला आहे. हें बघ, बिंदु, माझे डोळे उघडले तरी मी तुझ्या भीतीकडे अशी डोळेझांक करीत आहें.(इंदूकडे वळून) आणि इंदु, माझें आंधळें प्रेम आज तुझ्याकडे असें डोळे भरून पहात आहे.

**इंदु**—अगबाई, खरेंच ! हे आंधळे नाहींत ! [ लतिका येते. ]

**महेश्वर**—लतिकाताई, मी तुमचा जन्माचा गुलाम व्हायला तयार आहें कीं नाहीं म्हणून तुम्हीं विचारलें होतें ना ? भ्रमराच्या त्रासांतून वांचविल्या-मुळें शकुंतला ज्याप्रमाणें दुष्यंताची दासी झाली त्याप्रमाणें बायकांच्या सद्दीच्या या दिवसांत तुम्ही जर माझ्या भोंवतालच्या या दोन गांधिलमाशा पिटाळून लावाल तर मला सुद्धां जन्माची गुलामगिरी कबूल आहे.

**लतिका**—इंदुताई, बिंदुताई, मला यांच्याशीं थोडें बोलायचें आहे.

**बिंदु**—( स्वगत ) आतां आमचें बोलणेंच राहिलें मुळीं ! ( उघड ) इंदुताई, चल. जगांत गुणांची कुठें पारखच नाहीं. साऱ्यांची नजर तेवढी रूपावर.

**इंदु**—लतिकाताई, यांना काकांच्या तावडींत देऊं नकोस बरें !

[ इंदु व बिंदु जातात ]

**लतिका**—हं, सांगा पाहूं काय झालें तें ? सरकारी पोषाखांत येताहेत का घनश्याम ?

**महेश्वर**—हो. काय असेल तें असो, मीं नुसतें सुचविलें, आणि क्षणभर थांबून त्यानें तावडतोब सरकारी पोषाखांत येणें पसंत केलें. तें काम बहुशः झालें.

**लतिका**—बरें, आतां दुसरें काम असें राहिलें; ही सरबताची कुपी तुमच्या-जवळ ठेवा आणि बाबांनीं पिंवळ्या कपाटाच्या चवथ्या खणांत–चवथ्या किंवा पांचव्या असेल–विषारी औषधाची लहानशी कुपी आणून ठेविली आहे. आतां असें करा, हळूच बाबांच्या दिवाणखान्यांत जा; आंधळेपणामुळें बाबा तुम्हांला फिरकतांना पाहून भ्यायचे नाहींत; शिवाय बाहेर उभी राहून मी तुम्हांला सावध करीनच बाबा आले तर; किंवा दुसरीकडे मी बाबांना तास दीड तास बोलण्यांत थांबवून ठेवितें; हो, हेंच बरें ! आतां तुम्हीं एवढें करा-यचें कीं, त्या विषाच्या ऐवजीं त्या कुपींत हें सरबत भरून ठेवायचें. मात्र, फारच जोखमीचें काम असल्यामुळें थोडासा अविश्वास दाखवितें याबद्दल क्षमा करा, पण ही रिकामी कुपी घेऊन ठेवा बरोबर आणि तें विष या कुपींत मला दाखवायला आणा. झालें, आतां काय ? हो, दोन, चार, पांच वेळां विषाची कुपी आधीं सरबतानें धुवून टाका. हें सारें बिनबोभाट होईल ना ?

**महेश्वर**—मीं कागद किती शिताफीनें काढले तुम्हांला ठाऊक आहेच आतां !

**लतिका**—बरें, जा मग तुम्ही.

**महेश्वर**—ठीक, ( स्वगत ) छेः बुवा, या बुद्धिमान् मुलीबरोबर लग्न म्हणजे खरोखरीच जन्माची गुलामागिरी ! किती बारकाईनें पाहते प्रत्येक गोष्टीकडे ! ( जातो )

**लतिका**—आतां राहतां राहिलें एवढें, कीं, हें ऐन वेळीं बाबांना कळ-वायचें कसें ? नाहीं तर बाबांची फसगत व्हायची ! कसें कळवावें हें त्यांना त्या वेळीं ? ( विचार करून ) हो हो ! आजच मोरेश्वर आले आहेत; तेव्हां सर्व हकीकतीचें थोडक्यांत एक पत्र माझ्या सहीनें लिहून काढतें, त्यावर बाबांचा पत्ता लिहितें आणि तें मोरेश्वरांच्या जवळ देऊन ठेवतें. त्यांना नीट पढवून ठेवतें कीं, त्यांच्या वडिलांनीं हें बाबांना द्यायला सांगितलें आहे म्हणून. आत्महत्येचा प्रश्न उभा राहिलाच तर आयत्या वेळीं मोरेश्वरांना तें पत्र बाबांजवळ द्यायला पुढें करावें म्हणजे झालें. वर अर्जंट म्हणून लिहिलें म्हणजे बाबा आधीं तें वाचून पाहतीलच; म्हणजे सर्व भानगड मिटली ! शिवाय धनश्यामांच्या हातीं गेलेले कागदही आपल्याजवळ सुरक्षित आहेत असेंही कळविलें म्हणजे बाबांना कसलीच भीति उरणार नाहीं. हो, हीच युक्ति बरी ! आणखी महेश्वरावर नजर ठेवायला मालतीताईला सांगावें म्हणजे त्याही गोष्टींत मन निःशंक झालें ! (जाते) [पडदा पडतो]

---

# प्रवेश दुसरा

[ स्थळ–**धनेश्वराचें** घर. पात्रें–**धनश्याम, धुंडिराज, प्रभाकर, मनोहर, मालती, लतिका, मोरेश्वर, महेश्वर, फौजदार** वगैरे.]

**फौजदार**—धनश्याम, कांहीं झालें तरी आतां तुमच्या कपाळाची शिक्षा चुकत नाहीं. तुम्ही पेंचांत पाडलेल्या या गरीब लोकांच्यापैकीं एकालाही पकड-ण्याचा प्रयत्न करूं नका, आणि स्वतः सुटण्याचा तर मुळींच यत्न करूं नका. धुंडिराजपंताची ही लेखी साक्ष तुमच्याविरुद्ध असतांना तुमचें काय चालणार ? हिनें आतां तुमच्या जन्माचा सत्यानाश होण्याची वेळ आली !

**धुंडिराज**—काय ? माझी साक्ष ? ती कोणची ? आणि तिच्यामुळें धन-श्याम संसारांतून उठणार ? छे ! असें कदापि होणें नाहीं,

**फौजदार**—(कागद हातीं घेऊन) हा पहा! हा तुमच्याजवळून लिहून घेतलेला खोटा कबुलीजबाब!

**धुंडिराज**—आहे खरी पंचाईत!

**प्रभाकर**–[हळूच धुंडिराजास एकीकडे] काका, गोंधळांत कसले पडलां! याला वांचवावयाचें ठरलेंच का? तेवढा कागद फाडून टाका म्हणजे झालें. म्हणजे घनश्याम सुटला. [धुंडिराज कागदाचे तुकडे करतो] गेला काहो पुरावा?

**फौजदार**—काकासाहेब, काय केलेंत हें! पंचनाम्यांत सांपडलेल्या केवढ्या पुराव्याचा कागद फाडलात! केवढा गुन्हा झाला हा!

**धुंडिराज**—मग त्याबद्दल शिक्षा भोगायला मी तयार आहें! मुलांना का पुढें करायचें? अहो, घनश्याम झाला तरी आमच्यापैकींच–आमच्या धनेश्वरांचा मुनीम!

**घनश्याम**—काकासाहेब, काय केलेंत हें? लतिकाताई, ही खरी दया, ही निरपेक्ष दया! प्राणिमात्र गोगलगाय बनतो तो याच दयेमुळें! फौजदारसाहेब, काय वाटेल तें होऊं द्या, पण या सत्पुरुषाच्या केसाला सुद्धां धक्का लागूं देऊं नका!

**फौजदार**–त्याला तुमच्या वांकड्या मार्गाची मदत नको आहे.

**घनश्याम**–आतां मला आपल्या टोंचून बोलण्याचा राग कां यावा? मी एकदांच सांगितलें कीं माझा स्वाभिमान गेला.

**महेश्वर**—अरेरे, आमचा व्हिलन पार पडला! धनेश्वरमहाराज, न विचारतांना आपल्या घरांत मी इतका गोंधळ घातला आहे कीं, अखेर पेशवाईत त्रिंबकजी डेंगळ्यानें सुद्धां इतका घोंटाळा माजविला नसेल. मला एक क्षमा करा म्हणजे झालें. आतां हेंच उदाहरण पुढें चालू ठेवायचें म्हणजे व्हिलनचा पश्चात्ताप हें नाटकाचें एक अंग झालें. त्यावर दुसरें अंग प्रसन्न झालेल्या नायिकेच्या बापानें आपल्या मुली नायकांना देणें. काकासाहेब, एक नायकांची जोडी आणि एक नायिकांची जोडी येथें आहेच. तेव्हां हा समारंभ उरकून टाकावा म्हणजे झालें! आमची खात्री झाली कीं आम्हीं सुद्धां आतां नायक नव्हे. आमचे जे साथीदार मोरेश्वर तें नुसतें नांवापुरतें बोलणारें पात्र आहे. घनश्याम कसचा नायक! त्याचे मुळीं पाय

मोडले. तर आतां प्रभाकरपंत आणि मनोहरपंत यांना एकदा आतां नायक करून भरत-वाक्य म्हणा म्हणजे झालें.

**घनेश्वर**—त्याचा निर्णय मीं करतों.

( पडदा पडतो )

---

ईशप्रशंसा

[राग भूप, ताल झपताल]

प्रभु जगतिं आधार । तोच हरि भवभार ।
चिंता न निस्सार । बालांसि शोभे ॥ धृ० ॥
गगनिं ताराप्रसर । पंकिं मुक्तानिकर । तरि
शुभ्र संसार । उभयांहि लाभे ॥ १ ॥ न्याय
सदयाचि करी । प्रभु अयाचित जरी । याच्या
न योग्य तरि । अतिमात्र लोभें ॥ २ ॥ भव-
दाविं तपनाधि । सुखवील निरवधि । तोचि
करुणानिधि । सकलां कृपांभें ॥ ३ ॥

*　*　*

ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।
ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥

---

# पाठभेदांची पुरवणी

## १

## वाक्यें व वाक्यसमूह

| पृष्ठ | ओळ | रंगावृत्तीची प्रत | मूळ प्रत |
|---|---|---|---|
| ४८ | ८ | कोण कशाला पाहिजे धुंडिराज भित्रा आहे, | ' .ण कशाला पाहिजे ? मालती धनेश्वराच्या काबूंत देऊन मी लतिकेचा उद्दामपणा संभाळतो. लतिके, माझ्या कंठालिंगनाच्या मगरमिठींत सांपडल्यामुळे तुझे प्राण कंठाशीं आले म्हणजे तुझ्या बाहेर पडलेल्या व्याकुळ डोळ्यांना धनेश्वराच्या नाखूष मिठींत सांपडलेल्या मालतीचा कासावीस संसार दाखवीन तरच नांवाचा घनश्याम ! मानी पोरी, तिरस्कारानें हंसून असें होणार नाहीं म्हणून म्हणतेस ? कां होणार नाहीं ? तुम्हां दोघींचीं नशिबें तुमच्या बापांच्या नांवांशीं जोडलेलीं आहेत ना ? मग माझ्या अकलेचें अमली पाणी पाजून या साऱ्या पंचक्रोशीवर अंमल चालविण्याला मला वेळ तो कशाला लागणार ? धुंडिराज भित्रा आहे, |
| ,, | १० | गुंतवितों म्हणजे झालें. नुसत्या कल्पनेनेंच | गुंतवितों म्हणजे झालें. उद्यां मोरेश्वर जाणार आहे, आणि धुंडिराजही कुठेंसा जाणार आहे. जुन्या वळणा- |

| पृष्ठ | ओळ | रंगावृत्तीची प्रत | मूळ प्रत |
| --- | --- | --- | --- |
| | | | मुळें तो दोन दोन घंटे स्टेशनवर आधींच जाऊन बसतो हें मला माहीत आहे वा:, थट्टेनें स्वत:ला नाटकांतलें नीच पात्र म्हणवितां म्हणवितां मी खरो-खरीच स्वगत भाषणांनीं माझे बेत रचायला लागलों. धुंडिराजानें मोरे-श्वराबद्दलची जी कुळकथा सांगितली ती महेश्वराला पढवून त्याला मोरेश्वर म्हणून—पण आतां ही रचना मोरेश्वरा-सारख्या जडमूढ अजागळाला स्पष्टपणें दिसावयाला लागेल. हां! पुढें मोरे-श्वराला कानडी वेषानें आणि आंधळ्या वेषानें धनेश्वराच्या घरांत कोंबतों, आणि धनेश्वराच्या कुलंगड्यांची महे-श्वराच्या हस्तें जमा करून घेतों. त्या धनेश्वराच्या पाजी नीचपणाबद्दल आणि रंगेल स्वार्थाबद्दल जो डंका गाजतो आहे त्याचा मूळ नाद त्या चोरट्या वह्यांच्या रूपानें त्यानें आपल्या खानगी खोलीच्या कपाटांत कोंडून ठेवलेला आहे. मोरेश्वर आंधळ्याच्या रूपानें आंत शिरला म्हणजे त्याला कोणतीही गोष्ट बारकाईनें पहावयाला हरकत नाहीं. त्या वह्या तेवढ्या हातीं लागल्या म्हणजे संपलें. धुंडिराज सांपडला म्हणजे मालती बिनबोभाट' धनेश्वराला मिळाली, आणि |

| पृष्ठ | ओळ | रंगावृत्तीची प्रत | मूळ प्रत |
|---|---|---|---|
| | | | धनेश्वराच्या वह्या तारल्या म्हणजे लतिका बुडाली. नुसत्या कल्पनेनेंच |
| ५३ | २० | नक्कल तयार कर. थांब, एक साक्षीदार | नक्कल तयार कर. तुझें नाव घाल, या स्टेशनाचें नांव घाल, आजची तारीख घाल, चोरीचा माल नमूद कर, थांब, एक साक्षीदार |
| ५४ | ८ | अपट्रेन आली वाटतें? | अपट्रेन आली वाटतें? (पडदा पडतो.) |
| ६९ | २७ | कारटीं! धुंडिराज, क्षणार्धांत | कारटीं! तुम्ही मनांत आणाल कीं, आपणच चटदिशीं जिव देऊन सर्व संकट दूर करावें म्हणून! तसेंहि व्हायचें नाहीं. मी अष्टौप्रहर तुमच्यावर उघड्या डोळ्यांनीं सारखी पाळत ठेवणार आहे. आत्महत्येच्या अर्धवट प्रयत्नानें आणखी कायद्याच्या अडचणींत मात्र पडाल. धुंडिराज, क्षणार्धांत |
| ७२ | १० | मुख्य कारण. कोणाला खरें— | मुख्य कारण. शिवाय खर्च कमी. कोणाला खरें— |
| १०२ | २२ | ज्या जगांत क्षणमात्राच्या धरणीकंपानें | ज्या जगांत एका रात्रींत तिकडचा सूर्य इकडे येतो, आणि क्षणमात्राच्या धरणीकंपानें |
| १०५ | ११<br>१२ | शब्द कसा ऐकवूं? मालती, तुझी विनंति | शब्द कसा ऐकवूं? प्रेमभंगामुळें स्त्रीजातीच्या देवयानीनें स्वाभाविकरीत्या शाप दिल्यानंतर बृहस्पतिपुत्र दिव्य कचदेवानें शापास शाप दिला त्याचें |

| पृष्ठ | ओळ | रंगावृत्तीची प्रत | मूळ प्रत |
|---|---|---|---|
| | | | कारण त्या वेळीं त्यानें खाल्लेलें दैत्यांच्या घरचें दुष्टान्न. (स्वगत) पण मग मी तरी—जाऊं देत ही कृतघ्नविचक्षणा. (उघड) मालती, तुझी विनंति |
| ११८ | २७ | मला कळत नाहीं ? या लग्नानें तिच्या | मला कळत नाहीं ? तिच्याशीं तुम्ही लग्न करीत आहां हें मला कळत नाहीं ? या लग्नानें तिच्या |

# शब्द व शब्दसमूह

| पृष्ठ | ओळ | रंगावृत्तीची प्रत | मूळ प्रत |
|---|---|---|---|
| २ | २१ | मला ठासून | मला अगदी ठासून |
| ७ | १५ | अलंकार लाभतो | बाळलेणें लाभतें |
| ८ | ९ | एकच गोष्ट तीनतीन शब्दांनी | एकच गोष्ट तीनतीनदा लोळवणारी आणि एकच अर्थ तीनतीन शब्दांनी |
| ९ | ३ | प्रभाला इंग्रजींत | प्रभाला फडाफड इंग्रजींत |
| ९ | ७ | यांच्या | याच्या |
| ,, | १२ | होय नव्हे किमानपक्ष | होय नव्हे तरी किमान पक्ष |
| ,, | १५ | मला हें चऱ्हाट | मला मात्र हें चऱ्हाट |
| २० | १८ | इकडे | माझ्याकडे |
| २६ | ७ | तुझ्या उत्तराचा | तुझ्या तिहेरी उत्तराचा |
| २७ | १३ | राग कसा | राग मला कसा |
| ३० | १७ | म्हणावें, कीं भावि | म्हणावें, भावि |
| ४४ | १६ | हतभागी | कुमारश्री |
| ४६ | २८ | सुद्धां तोंडून | सुद्धां माझ्या तोंडून |
| ४७ | ७ | मी खऱ्या | मी तुझ्या खऱ्या |
| ,, | १८ | प्रवेशापासून | प्रवेशापासूनच |
| ४८ | ११ | निशा और | निशा कांहीं और |
| ५० | १३ | हातावर | कपाळावर |
| ,, | १८ | काका, | नाहीं, काका, |
| ५१ | ५ | चोराचिलटांचा फार | चोराचिलटांचा येथे फार |
| ,, | १६ | महेश्वर:-गॉड | महेश्वर:—( स्वगत ) गॉड |
| ५७ | १७ | आमच्या | आणि आमच्या |
| ६४ | २४ | स्वच्छ, स्वच्छ बोला | स्वच्छ, स्पष्ट बोला |
| ६६ | २४ | श्रीकृष्णानें राधेसारख्या | श्रीकृष्णानें बालवयांत राधेसारख्या |

| पृष्ठ | ओळ | रंगावृत्तीची प्रत | मूळ प्रत |
|---|---|---|---|
| ७० | ४ | देवाचीं | देवांचीं |
| ,, | ८ | देवाइतकाच | देवांइतकाच |
| ७२ | ७ | तुमच्या | तुमच्याच |
| ७३ | ४ | वाटतें | वाटेल |
| ७६ | २२ | म्हाताऱ्याला | म्हाताऱ्यालाच |
| ७७ | १० | तें | तो |
| ८१ | ७ | आजच्या स्थितीला | आजच्या समाजस्थितीला |
| ८३ | १७ | बाबांना | काकांना |
| ८४ | ४ | आतां | आपला |
| ८६ | ४ | शब्दानें | शब्दांनीं |
| ८६ | ५ | हें कुणाला | हें आतां कुणाला |
| ९० | १० | धनेश्वरांच्याच | वृद्ध धनेश्वरांच्याच |
| ९३ | ७ | कुसुमताई | कुसुमताईच |
| १०० | १६ | पडेल. या मुखानें | पडेल. प्रेमळ चित्रा, या मुखानें |
| १०१ | ३ | मला बोध | मला हा बोध |
| १०८ | ६ | लोक चिरंजीवांच्या | लोक सत चिरंजीवांच्या |
| १११ | १७ | जन्मापासून | जन्मापासूनच |
| ११८ | १९ | कांहीं आल्यावांचून | कांहीं अक्कल आल्यावांचूनच का ? |
| ,, | २८ | तुमची बेअब्रू | तुमची जन्माची बेअब्रू |
| ११९ | २ | सरळ एक | सरळ एक कसायाचा |
| ,, | ७ | तुम्हांला | तुला |
| ,, | ७ | किती सांगूं ? | किती स्पष्ट सांगूं ? |
| ,, | २१ | तरी समाधान | तरी मला समाधान |
| १२४ | २० | आंधळेपणाचें उगीच | अंधळेपणाचें सुद्धां उगीच |
| १२८ | २७ | मालतीच्या— | मालतीच्याहि— |
| १३४ | ९ | कुणाची | कुळाची |

# शुद्धिपत्रक

| प्रस्तावना पृ. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | ५ | मातेचे | भाषेचे |
| २ | १८ | त | तें |
| २ | २० | विश्वप्रदर्शन | विश्वदर्शन |
| ४ | १५ | केशवशास्त्राच्या | केशवशास्त्री यांच्या |
| ५ | १६ | स्वयंनिर्मिती | स्वयंनिर्मीत |
| ६ | १३ | सौभद्व | सौभद्र |
| ८ | ९ | येथें | या नाटकांत |
| १२ | ६ | सत्रे | सुत्रें |
| १८ | ११ | उडविला | उलटविला |
| २३ | १० | मोठा | थोडा |
| २५ | ८ | समधौत | समधात |
| २६ | ७ | कलेला | केलेला |
| २८ | ८ | चतुरस्त्रपणान | चतुरस्त्रपणानें |
| २८ | १६ | स्वभावधम | स्वभावधर्म |
| २९ | १७ | ओळण्यापलीकडे | ओंळखण्यापलीकडे |
| ३० | २ | सव | सर्व |
| ३१ | १२ | प्रक्षकांच्या | प्रेक्षकांच्या |
| ३३ | ९ | ठेवल्यान | ठेवल्यानें |
| ३५ | १२ | वेळीं अवळीं | वेळीं अवेळीं |
| ४० | ८ | धुगधुग | भावना |
| ४१ | ९ | आहे. या | आहे, म्हणून या |
| ४२ | १९ | सगनमत | संगनमत |
| ४२ | २२ | बराल | वरील |
| ४४ | ७ | आढळच | अढळच |
| ४८ | १ | सव | सर्व |

| पृ. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | १२ | गाड | गोड |
| ३ | ८ | चालता | चालत |
| २१ | ५ | तर | तरी |
| ३१ | ५ | सदगुणांची | सद्‌गुणांची |
| ३२ | ४ | ताडंच | तोंडच |
| ४४ | २९ | उप्तन्न | उत्पन्न |
| ५० | ४ | करमध्ये | करमध्ये |
| ५७ | ४ | कघी | कधीं |
| ५८ | १८ | प्रभाकर | प्रभाकर |
| ७६ | २९ | दणें हें | न दणें हें |
| ८७ | १४ | उर्मी | ऊर्मी |
| ९१ | २४ | शंकं | शंकूं |
| ९१ | २५ | स्मरण | स्मरणें |
| ९१ | २६ | का आम्हांल | कीं आम्हांला |
| ९४ | २२ | अनथनाथे | अनाथनाथे |
| ९५ | २० | शंमर | शंभर |
| १०३ | १० | वचनाबदल | वचनाबद्दल |
| १०४ | २३ | धिक्कारण्यासारखे | धिक्कारण्यासारखें |
| १३२ | २९ | थेरड्याच्या | थेरड्या |
| १३७ | २९ | रे | तर |
| १४४ | २३ | ओखळही | ओळखही |
| १४७ | १७ | माटते | वाटते |
| १५१ | २६ | त्याबदल | त्याबद्दल |